# संजीवनी

[ लघुकथा व एकांकिका संग्रह ]

लेखक

म. ना. अदवंत

बी. ए. (ऑनर्स)

किंमत १।। रुपया

प्रथमावृत्ति, फेब्रुवारी १९३८

माझे परमपूज्य तीर्थरूप

श्री. ना. अ. ऊर्फ तात्यासाहेब अदवंत

यांच्या चरणीं

अत्यादरपूर्वक

**समर्पण**

# ओळख

श्रीयुत म. ना. अद्वंत यांनीं लिहिलेल्या स्फुट लघुकथांचा व लघुप्रहसनांचा एकत्रित संग्रह 'संजीवनी' या नांवानें आज प्रसिद्ध होत आहे. श्री. अद्वंत हे एक बुद्धिमान् व कल्पक तरुण लेखक आहेत व त्यांचा हा संग्रह वाचून पहातां त्यांच्याकडे यापुढें अधिक आशेच्या दृष्टीनें पहावयास कांहीं प्रत्यवाय नाहीं याबद्दल कोणाहि वाचकाची निश्चिती होईल. आज मराठी वाङ्मयांत उत्तम तऱ्हेचे लघुकथा-लेखक उपलब्ध आहेत व लघुकथालेखनाचें तंत्र व शास्त्र आज पुष्कळच प्रगतावस्थेंत आहे. यामुळें लघुकथालेखन हा महाराष्ट्र शारदामंदिरांत प्रविष्ट होण्याचा तितकासा सुलभ राजमार्ग राहिलेला नाहीं.

श्री. अद्वंत यांच्या लघुकथांचे व प्रहसनांचे विषय आजकालच्या सामाजिक आयुष्यक्रमांतूनच निवडलेले आहेत. त्यांचा जीविताचा दृष्टिकोण आशादायक व प्रसादपूर्ण आहे. त्याचें प्रतिबिंब त्यांच्या लेखनांत पूर्णपणें उतरलेलें आहे. त्यामुळें त्यांच्या कथा वाचतांना वाचकांची मनोवृत्ति उल्हासित राहील यांत शंका नाहीं. सध्यां दुःखान्त लघुकथांची एक लाट आली आहे. दीड दोन पानांच्या मर्यादेंत शक्य तितक्या पात्रांची कत्तल करून वाचकांच्या भावनांची 'कुलपी मलाई' करून टाकावयाची हा या लघुकथाकारांचा उद्योग असतो. असल्या ओंकारेश्वरी वृत्तीच्या लघुकथाकारांना कंटाळलेल्या वाचकांना ही 'संजीवनी' खरोखरच संजीवक वाटल्याविना राहणार नाहीं.

श्री. अद्वंत यांचें संवादलेखनचातुर्य प्रशंसनीय आहे. त्यांची

विनोदवृत्तीहि मार्मिक आहे. बारीक सारीक गोष्टी लक्षांत ठेवून त्यांचा योग्य ठिकाणीं अचुक उपयोग करून घेण्याचें कौशल्य त्यांच्यांत आहे. कॉलेजच्या सृष्टींतून नुकत्याच बाहेर पडलेल्या व आयुष्यांच्या उंबरठ्यावर पदार्पण करणाऱ्या तरुण लेखकाचा जीवितकडे बघण्याचा जो अतिशयोक्त आशावादी दृष्टिकोन असतो तो श्री.अद्वंत यांचा असल्यानें पुष्कळ वेळां त्यांच्या लेखनांत अद्भुत रम्यतेचे प्रसंग आलेले आहेत. आपल्या हाडकुळ्या वल्लभाची प्रकृति सुधारण्यासाठीं त्याच्याशीं कृतक कलह करणारी विमल, केवळ पंढरपूरची म्हणून सुधीरनें नाकारलेली मुलगी पुढें पंढरपूरला गेल्या नंतर त्याच्या गळ्यांत पडणें,'ज्ञानप्रकाश'च्या मुद्रणचुकीनें(ज्ञानप्रकाश पेक्षां दुसरे अधिक लायक पत्र कल्पिलें असतें तर योग्य झालें असतें !) नापास म्हणून जाहीर झालेला विद्यार्थी पुन्हां पास होणें किंवा जिच्या वर प्रेम बसलें तिच्याशींच वसंताचें त्याच्या वडिलानें लग्न ठरवणें,या घटना पुष्कळ अंशी अद्भूतरम्यच समजावयास पाहिजेत. तथापि अद्भुतरम्यता हा दोष आहे असें मी समजावयास तयार नाहीं. वास्तवतेचें स्वरूप नेहमीं रुक्ष, नीरस व अनाकर्षक भाषेंत व घटनेंत प्रकट व्हावयाला पाहिजे असें थोडेंच आहे? अद्भुतरम्यता जर अतिशयोक्त नसेल तर तिनें वास्तवतेची हानी होते असें मला वाटत नाहीं. 'अंजन' या गोष्टींत प्रीतिविवाहाबद्दलची लेखकाची जी कल्पना ती मात्र फारशी 'पुरोगामी' स्वरूपाची नाहीं; त्यांत लेखकाचा पारंपरिक पुरुषी दृष्टिकोण दिसून येतो. ' उलटलेला डाव ' फारसा रंगलेला नाहीं. ' रंगीत तालीम ' हें प्रहसन मात्र फारच मार्मिक आहे व त्यांत प्रकट झालेला विनोद बहारीचा आहे. संमेलन प्रसंगीं प्रयोग करण्यास सर्वस्वी अनुरूप असेंच हें प्रहसन आहे.

पांढरपेशा मध्यमवर्गांतील जीवनक्रमाशी लेखकाचा विशेष परिचय असल्यानें त्याची दृष्टि सहाजिकच त्याच्याकडे जाणार! वाढत्या वयाबरोबर व अनुभवाबरोबर हा दृष्टिकोण अधिक विशाल होईल हें क्रमप्राप्तच आहे. पुष्कळ गोष्टी शृंगाररसात्मक असून लेखकानें कल्पनेचें व भाषेचें जें नियंत्रण पाळलेलें आहे त्यामुळें त्या शृंगारांत एक प्रकारचें मुग्ध सौंदर्य उत्पन्न झालें आहे. लेखकाचा हा विशेष उल्लेखनीय गुण आहे.

महाराष्ट्रांतील उद्योन्मुख व होतकरू लघुकथाकारांत श्री. अद्वंत यांना त्याच्या या संग्रहानें स्थान मिळेल अशी आशा आहे.

४ फेब्रुवारी १९३८
सारस्वत वसाहत
पुणें १

प्रल्हाद केशव अत्रे

# आशीर्वचन

( प्रो. शं. के. कानेटकर यांचें पत्र )

सप्रेम नमस्कार वि. वि.

आपण मला आपल्या ' संजीवनी ' या लघुकथासंग्रहाबद्दल मत विचारलें. वास्तविक या विषयावर मत देण्याचा माझा अधिकार नाहीं. परंतु आपले माझे संबंध केवळ ' आपलेपणाचे ' असल्यानें, त्याच आधारावर मी आपलें मत खालीं नमूद करीत आहे.

सध्याचें युग लघुकथांचें आहे असें नेहमीं म्हणण्यांत येतें. यापुढील युग कदाचित् ' लघुत्तम-कथांचें'हि येईल; परंतु या विषयीं विचार करतांना ' लघुता ' या शब्दासंबंधीं बराच गैर-समज आहे, अशी माझी समजूत आहे. भावगीताप्रमाणें लघुकथांत लघुता ही तंत्रदृष्ट्या एक विशेष महत्त्वाची गोष्ट आहे, हें खरें आहे; परंतु या शब्दाच्या अर्थालाही एक मर्यादा आहे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. लघुकथा या आपल्या जीवनांतील छोट्या छोट्या प्रसंगावर रचलेल्या असतात. अर्थात् त्या प्रसंगाची किंवा घटनेची व्याप्ती ज्या मानानें कमी अधिक असेल, त्यामानानें त्यांची स्वनिष्पत्ति करावी लागते, व म्हणून लघुकथांची लांबी त्यामानानें कमजास्त होत असते. केवळ पानावर लघुकथेची लांबी मोजणें वेडे-पणाचे होईल. कित्येक वेळां एखाद्या प्रसंगांत अतिशयित क्षमता असूनहि तिचा योग्य विस्तार न झाल्यानें ती आपणाला अपुरी अशी वाटते, तर दुसऱ्या एखाद्या प्रसंगांत ती मर्यादेबाहेर

फारशी नसल्यानें लिहिलेली लघुकथा ( ? ) पातळ व नीरस वाटते. लेखकानें आपल्या लघुकथेंत एकहि शब्द फाजील अगर वायफळ घातलेला नाहीं, असे टीकाकाराला ( व लेखकालाहि ) वाटलें पाहिजे. प्रसंगाच्या अनुरोधानें रसपरिपोष करणाऱ्या कुशल लेखकाला हें सहज साधते व म्हणूनच त्याच्या लघुकथा समर्पक वाटतात. याद्दष्टीनें तुमच्या लघुकथाकडे पाहिले म्हणजे त्या लांब वाटणार नाहींत. तुम्ही या कामी पुष्कळ यश मिळविले आहे असे मी म्हणेन.

तुमच्या लघुकथेंतील दुसरी एक बाब मला विशेष आवडते. ती ही कीं तुम्ही आपले कथाप्रसंग रोजच्या जीवनांतून निवडले असून त्यांची सजावट तुम्ही कलात्मकतेनें व तन्मयतेनें केली आहे. नाजुक भावनांचें आविष्करण करतांना कुंचली जरा हलक्या हातानें फिरवून, तुम्ही मानवी जीवनाच्या अन्तर्व्यापाराचें सूक्ष्म चित्रण केलेलें आहे. हें चित्रण मानसशास्त्राच्या दृष्टीनें समर्थनीय ठरणारें असल्यामुळें तुमच्या लघुकथा वाचतांना आपण आपल्याच जीवनांतील कुठल्या तरी एकाद्या प्रसंगाचें शब्दचित्र पहात आहों असें वाचकास वाटेल. त्यांत अस्वाभाविक असे कांहींहि वाटणार नाहीं. गोष्ट वाचतां वाचतां तिच्या पुढील ओघाची अगाऊ कल्पना येते; व आपण तर्क करावा त्याचप्रमाणें नेमके पुढें घडलेलें असतें असा वाचकांस अनुभव येतो. अपेक्षा निर्माण करणें आणि अपेक्षापूर्ति करतांना सुद्धां जरा वाचकांच्या कल्पनेला आश्चर्याचा गोड धक्का देणें ह्यांत लेखकाचें फार मोठें कौशल्य असतें. हें यश तुमच्या लेखणील लाभलेलें आहे याची साक्ष 'भांडण' 'संजीवनी' 'निकाल' 'सुलूच फोटो' 'परीक्षा' वगैरे कथा देतील.

तुमच्या एकांकिका चटकदार आहेत; त्यांतील संवाद आकर्षक व वाचकांच्या मनाला पुढें पुढें ओढीत नेणारें आहेत. पण पात्रां-च्या तोंडचीं वाक्यें याहिपेक्षां सुटसुटीत व संभाषण सुलभ असतीं, तर अधिक बरें झालें असतें. पण आहे या परिस्थितानें कसलाहि रसापकर्ष होत नसल्यानें हा केवळ वैयक्तिक मताचा प्रश्न आहे म्हणून आपण तो सोडून द्यावा. मराठीत आजवर पुष्कळ एकां-किका लिहिल्या गेल्या आहेत. पण त्याच्या तंत्राचा कांहीं थोड्या व्यक्तीखेरीज फारसा कुणी विचार केलेला नाहीं. तुम्ही या तंत्राचा थोडाफार विचार केलेला आहे व आधुनिक पाश्चात्य वाङ्मयांतील एकांकिकांचा अभ्यासही केलेला आहे हे तुमच्या या पुस्तकांतील एकांकिकांवरून स्पष्ट दिसते. या क्षेत्रांत तुमची लेखणी विशेष यशस्वी होईल असें वाटतें.

मला आपणाला एक सूचना करावीशी वाटते, व ती अस्थानी होणार नाहीं अशी आशा आहे. लघुकथेला मधून मधून संभाष-णाची जशी अपेक्षा असते त्याचप्रमाणें संभाषणाला विनोदाची अपेक्षा असते. आपण असें पाहतों कीं सहज बोलतांना देखील आपण एकमेकास हरतऱ्हेनें रिझविण्याचा प्रयत्न करतों. ही स्वाभाविकता कथातंत्रांत उतरल्यास कथा प्रसंगाला गति येते व तें आपोआप आकर्षक व चुरचरित होतें. अर्थात् विनोदाची जोड देतांना शब्दनिष्ठ किंवा पात्रनिष्ठ विनोदानें चित्र प्रसंगनिष्ठ विनो-दाच्या पार्श्वभूमीवर काढावें व तें एका विशिष्ठ दर्जाच्या खालीं येवूं देऊं नये, एवढी काळजी घ्यावी ही सूचना आहे. एकदां ही दृष्टी उत्पन्न झाली कीं सर्व कांहीं आपोआप सुचूं लागतें.

या विषयावर लिहिण्यासारखें पुष्कळ आहे, पण तें हें स्थळ नव्हें.

या पुस्तकांत नेहमीच्याच जीवनांतील गोष्टी पण त्या अगदीं स्वाभाविकतेनें व तन्मयतेनें सांगतांना तुम्ही आपल्या लेखणीचा तोल फार छान संभाळला आहे, याबद्दल मी तुमचें अभिनंदन करतों. उत्तरोत्तर असेंच सरस वाङ्मय तुमचे हातून निर्माण होईल असें 'संजीवनी' वरून वाचकास वाटेल, अशी मला अपेक्षा आहे. इतकें सांगून मी हें पत्र पुरें करतों. कळावें.

आपला.

गिरीश

५९५ बुधवार,
किर्लोस्कर वाडा पुणे २
ता. ६।२।३८

## हितगूज

या चार वर्षांत निरनिराळ्या मासिकांतून, पाक्षिकांतून वगैरे प्रसिद्ध झालेल्यापैकीं कांहीं लघुकथा व एकांकिका मी आज एकत्रित स्वरूपानें वाचकापुढें ठेवित आहे. वास्तविक हा संग्रह पूर्वीच प्रसिद्ध व्हावयाचा ! पण कांहीं 'अपरिहार्य' अडचणी या संग्रहप्रकाशनाच्या आड आल्यानें तो योग येऊं शकला नाहीं. आणि आजसुद्धां श्री. ताम्हणकर यांनीं उत्साहपूर्वक संग्रहप्रकाशनाची कामगिरी अंगावर घेतली म्हणूनच ही 'संजीवनी' वाचकांच्या पुढें येऊं शकली.

यांत असलेल्या लघुकथाविषयीं मला कांहींच बोलावयाचें नाहीं. जें कांहीं सांगावयाचें ते प्रि. अत्रे व प्रो. कानेटकर यांनीं अगोदरच सांगून टाकल्यामुळें माझ्या वांट्याला शिल्लक कांहींच उरलें नाहीं. एकांकिकेविषयीं बोलावयाचें म्हणजे हा प्रकार मराठी वाङ्मयांत अद्याप तितकासा रूढ नसल्यानें वाचकांना तो कितपत रुचेल हें सांगतां येत नाहीं. वास्तविक पाश्चात्य देशांत एकांकिका(One-Act-Plays) हा एक स्वतंत्र वाङ्मय प्रकार असून त्याचें एक निराळें तंत्रही आहे. आणि अशा प्रकारच्या एकांकिका तिकडे बऱ्याच लिहिल्या जातात. पण इकडे कुणाचें त्याकडे लक्षच न गेल्यानें तो वाङ्मय प्रकार अगदींच बाजूला पडला आहे, असो. मला येवढंच सांगायचं होतं कीं, वाचकांना जरी या एकांकिका रुचल्या नाहींत तरी रुचिपालट या दृष्टीनें त्या अगदींच रसहीन ठरणार नाहींत असें वाटतें.

तसेंच 'संजीवनी' या संग्रहाच्या नांवासंबंधीं ! संग्रहाला कोणतें तरी नांव द्यायचें म्हणून आणि 'संजीवनी' ही माझी आवडती गोष्ट आहे म्हणूनच केवळ 'संजीवनी' हें नांव दिलें आहे. यांत वाचकांना या लघुकथा वाचनानें संजीवनी मिळेल असेंहि मला ध्वनित करावयाचें नाहीं किंवा कुणा व्यक्तीचा नामनिर्देश करण्याचाहि उद्देश नाहीं. चोखंदळ टीकाकारांना संग्रहाच्या नांवांतच कित्येक वेळां गूढार्थ दिसूं लागतो, आणि त्या नांवावर कित्येक वेळीं कोट्या, प्रतिकोट्या लढविल्या जातात. तेव्हां तसें कांहीं होऊं

नये म्हणून अगोदर स्पष्टच खुलासा केलेला बरा, नाहीं कां ? मागाहून गैर समजाचें वादळ नको.

शेवटीं एकच गोड काम राहिले. आणि ते म्हणजे आभारप्रदर्शनाचे ! माझी आभारप्रदर्शनाची यादी फार मोठी आहे. पण त्यांत प्रथमच जर कोणी माझ्या डोळ्यासमोर येत असतील तर ते म्हणजे प्रि. अत्रे ! मला अद्याप प्रि. अत्रेंची प्रस्तावना माझ्या संग्रहाला कशी मिळाली याचे आश्चर्य वाटते. त्याचान् माझा प्रत्यक्ष परिचय फारच थोडा—म्हणजे जवळ जवळ नव्हताच. अशा स्थितींत साहित्यिकांच्या शिशिर वनविहाराच्या प्रसगीं मी त्यांना जरा दबकतच प्रस्तावना लिहिण्याची विनती केली. ' सध्यां कामे फार आहेत ' किंवा ' वेळ नाहीं ' अशा अर्थाचे उत्तर ऐकण्याची मी मनाची तयारी केली होती. पण त्यांनीं आपल्या गोड स्वभावानुसार ती विनति तात्काळ मान्य केली आणि सारखी कामे असतांना देखील वेळांत वेळ काढून त्यांनीं हा सर्व संग्रह वाचून काढून ' ओळख ' लिहिली व माझ्या स्वाधीन केली. याबद्दल त्याचें या ठिकाणीं अगदीं मनापासून आभार मानावेसे वाटतात. प्रो. कानेटकर तर माझे प्राध्यापकच ! कॉले· जांत ज्यांनीं आम्हाला दोन वर्षे मराठी शिकविले त्यांच्याकडून आशीर्वचन-पर पत्र घेण्याचा शिष्य या नात्याने मला अधिकारच आहे. तरी पण कामाच्या अतिशय गडबडींत असूनसुद्धां सवड काढून संबंध पुस्तक वाचल्याबद्दल व आशीर्वचन लिहून दिल्याबद्दल मला त्यांचे आभार मानावयास पाहिजेत. श्री. ब्राम्हणकरानीं पुस्तक प्रकाशनाचे धाडस केल्या बद्दल त्यांचें आभार मी प्रथमच मानिले आहेत पण इंदिरा प्रेसचे मॅनेजर श्री. दिवाकर यांच्या सहाय्यावांचून हें पुस्तक इतक्या आकर्षक स्वरूपांत निघाले नसते हेंहि मला विसरून चालावयाचें नाहीं, तेव्हां त्यांचें आभार नमूद करून ठेवणें जरूर आहे. आणि खरंच ! एक विसरलोंच ! संग्रहाकरितां गोष्टी निवडण्याच्या वेळीं माझा अगदीं गोंधळ उडून गेला होता. या माझ्या मानसिक गोंधळांतून मला माझे मेहुणे श्री. विष्णुपंत मणगे, श्री. भदे व माझे मित्र श्री. श्रोत्रिय व श्री. अ. ह. जोशी यांनीं

वांचविले आणि गोष्टींची निवड करून त्यांना योग्य तो क्रम लावून दिला. माझे मित्र श्री. सोमण व श्री. मोकताली यांनीं सुद्धां बऱ्याच उपयुक्त सूचना केल्या. अर्थात् या सर्वांचे आभार मानणें औपचारिक दिसेल. तरी पण त्यांच्या मदतीचा कृतज्ञतापर उल्लेख करणें अनुचित होणार नाहीं.

शेवटीं जातां जाता वाचकांना या संग्रहाकडे तिऱ्हाईत नजरेनें न पाहता आपुलकीच्या भावनेने पहाण्याची मला विनंति करावयाची आहे. आपण मित्र मित्र जमलो म्हणजे नाहीं का करमणुकीकरितां एकमेकांना गोष्टी सांगत ! त्याप्रमाणें आपल्यापैकींच एक आज आपणाला गोष्टी सांगत आहे अशी भावना त्यांनीं संग्रह वाचतांना मनामध्ये ठेविली तर संग्रह—प्रकाशनाचा उद्देश साध्य झाल्यासारखा मला वाटेल.

म. ना. अदवंत.

७ फेब्रुवारी १९३७
विहंग मंडळ
शांतानंदाश्रम, टिळकरोड
पुणे २

# अनुक्रमणिका

आकलन— प्र. के. अत्रे, बी. ए. बी. टी. टी. डी. लंडन

आशीर्वचन— प्रो. शं. के. कानेटकर, एम. ए.

हितगूज

# संजीवनी : १

तारीख ६-७-३५

आजच्या इतकी तीव्रतेने मला माझ्या दुर्बळतेची जाणीव कधींच झाली नव्हती.

वेस्टएंडला कोणतातरी एक सुंदर बोलपट लागला होता. कालपासूनच विमलनें आजच्या सहाच्या खेळाला येण्याविषयीं मला आग्रह चालविला होता. मी एकदां तो बोलपट पाहिला होता, तरीहि तिच्या हट्टीपणा-मुळें मला आज तिच्याबरोबर जावेंच लागलें.

थिएटर प्रेक्षकांनीं अगदीं पूर्णपणें भरलें होतें. ओळखीचे चेहेरे त्या गर्दींत बरेच आढळत होते. विमलच्या कांहीं मैत्रिणीहि आमच्या अगदीं मागेंच बसल्या होत्या.

विश्रांतीच्या वेळीं आंतल्या गर्दीनें अगदीं कोंडल्यासारखें झाल्यानें आम्ही बाहेर मोकळ्या हवेंत गेलों. एखादें पेय घ्यावें किंवा नाहीं याबद्दल बाहेर आमची बरीच चर्चा झाली, पण त्या चर्चेचा समाधानकारक निकाल न लागल्यानें कांही न घेतांच तिसरी घंटा होण्याच्या सुमारास आम्ही आंत आलों.

आणि त्यावेळीं आम्हांस कळून आलें कीं, आमची जागा दोन सोल्जरांनीं घेतली होती.

मी जरा आश्चर्यानें पुढें झालों व शक्यतों सौम्य शब्दांत ती जागा सोडण्याची त्यांना विनंति केली.

त्या सोल्जराने बऱ्याच संतापाने माझ्याकडे दृष्टि फेकली. जागा सोडा-

यला सांगण्यांत आपला केवढा केवढामोठा अपमान झाला असेंच जणूं कांहीं त्याला वाटत होते !

मी पुन्हां त्याला तीच विनति केली. आतांपर्यंत बहुतेक आजूबाजूच्या लोकांचें लक्ष आमच्याकडे वेधले होते. तो सोल्जरही या प्रकाराने खूपच संतापला व ओरडला, " दुसरीकडे बसा हवं तर. का हवेत दोन गुद्दे ? "

आणि इतक्यांत तिसरी घटा होऊन सगळीकडे अंधार पडला.

झालेल्या अपमानामुळें मी संतापानें अगदीं लाल होऊन गेलों होतों. विशेषतः सर्वांचें लक्ष आपणाकडे असतांना अन् विमल शेजारीं असतांना सोल्जरानें माझा अपमान करावा हें मला अगदीं असह्य झाले ! काय करावें हेंच क्षणभर मला सुचेना.पण इतक्यांत विमलनें मला हाताला धरून मागें ओढले, व त्याच रांगेंत शेवटीं दोन खुर्च्या रिकाम्या होत्या, तिथें आम्ही बसलों.

आणि नंतर माझ्या लक्षांत आले कीं मला कांहींच करतां येणें शक्य नव्हतें. काय केले असते मी नाहींतरी ! त्या सोल्जराशीं दोन हात ! अन् कशाच्या जोरावर !! त्यानें मारलेला एक तरी गुद्दा परत करण्याची ताकद माझ्या मनगटांत होती का ? केलेल्या अपमानाचा जाब मागायला मनगटांत जोर असावा लागतो. व तो नसला म्हणजे विनाकारण एकाद्याचें हंसें मात्र होतें.

बोलपट चालू होता, पण तिकडे माझं बिलकूल लक्ष नव्हतें. मन निरनिराळ्या विचारांनीं पूर्ण गोंधळून गेलें होतें. मला वाटलें, आपण सिनेमाला आलों नसतों तर किती बरें झालें असतें !

मी विमलकडे पाहिलें. तिचेंहि लक्ष बोलपटाकडे नव्हतें ! माझ्या झालेल्या अपमानामुळें तिचेंहि मन बरेंच अस्वस्थ झाल्यासारखें दिसतें. आम्हीं दोघांनीं एकमेकाकडे पाहिले. कांहींच अर्थ नव्हता दोघांच्या दृष्टींत ! कदाचित् अंधारामुळें तिच्या दृष्टींत कसली भावना असल्यास मला कळली नाहीं.

थोड्याच वेळांत ती हलकेच म्हणाली, " जाऊं या आपण परत ! "

मीहि मुकाट्यानें मान डोलावून संमति दिली.

आणि आम्ही दोघेहि बोलपट चालू असतांनाच बाहेर पडलो.

टॅक्सीतून खोलीवर येईपर्यंत आमचे कांहीं बोलणे झाले नाहीं. मनांत वाललेल्या विचारांच्या वादळाने बोलण्याच्या मनःस्थितीत आम्ही दोघेंहि नव्हतों. तिला वसतिगृहांत पोंचवून मी खोलीवर आलो. खोलीचा दरवाजा लावून अर्धा तास मी विषण्ण चित्ताने बसून राहिलो. पण अशानें असले अपमान पुसले जातात थोडेच!

* * *

तारीख १४–७–३५

मी हें पाऊल टाकतों आहे खरें, धाडस करतो आहे खरें, पण बरोबर आहे कां ते? विनाकारण त्यापासून गैरसमज तर उत्पन्न होणार नाहींत ना? नाहींतर करायला जावें एक आणि व्हावें भलतेंच!

मला कित्यक वेळा असे वाटते कीं, सारा आभास आहे हा! मनाची निव्वळ फसवणूक करून घेतो आहे मी! मनमोकळेपणाचा अर्थ आंधळेपणानें मी प्रेम असा करतों आहे. कदाचित् रंगीत चष्मा घातल्यानें माणसाला ज्याप्रमाणें सारे पदार्थ त्या रंगाचे दिसतात, त्याप्रमाणे विमलकडे पाहातांना मी प्रेमाचा चष्मा चढविल्याने कदाचित् तिच्या प्रत्येक वर्तणुकींत मला प्रेम प्रतिबिंबित झाल्यासारखे दिसत असेल. आणि असे विचार मनांत आले कीं, मन सारखे ओरडून मला सांगते, 'विचार कर! शुद्ध मैत्रीला प्रेमाचें स्वरुप देतांना तूं चूक करतो आहेस, ज्या प्रेमाच्या आधारावर तूं तिला आज पत्र लिहिण्याचे धाडस करतो आहेस, ते प्रेम तुझ्या मनानें उभें केलेलें एक मृगजळ आहे; आणि कल्पनासृष्टींत त्या मृगजळाच्या आधारावर तूं बांधलेले मनोरे सत्यसृष्टींत नक्की ढांसळून पडतील.

पण पुन्हां वाटते कीं, असेलहि तिचे माझ्यावर प्रेम! कुणी सांगावें? स्त्रियांचें हृदय म्हणजे अथांग महासागरासारखे आहे. त्याचा सहजासहजी ठाव लागणे शक्य तरी आहे का? प्रेम आहे अशी कल्पना करण्यास एखादे सबळ कारण नसेल. कबूल! पण प्रेम नाहीं असें समजण्यास तरी एखादे सबळ कारण तिच्या वर्तणुकींत आढळून आले का? मग प्रेम नाहीं असे म्हणावयाचे तरी कोणत्या आधारावर?

शिवाय हा लपंडावाचा खेळ तरी कुठपर्यंत चालायचा ? प्रेम करणाराला आपलें प्रेम दुसऱ्या व्यक्तीजवळ व्यक्त करण्याचें धैर्य पाहिजेच नाहींतर नुसतेच तुम्ही प्रेम करीत असलां तर दुसऱ्या पक्षाला तुम्ही प्रेम करीत आहांत हें समजण्यास मार्ग काय ? प्रेम व्यक्त करण्याचे धाडस दोघांपैकीं कुणालाच न झाल्यानें दोन प्रेमी हृदयांची फाटाफूट झाल्याची किती तरी उदाहरणें मला माहिती आहेत. आमचीहि गत त्या उदाहरणासारखीच होऊं नये अशी माझी इच्छा आहे. आणि त्या दृष्टीनें मी टाकलेले पाऊल योग्य दिशेनेंच टाकलें आहे असें वाटूं लागते. पत्राचें मनासारखे उत्तर आलें तर ठीकच; नाहीं आलें, तर निदान मनाला पुढें हुरहूर तरी वाटायला नको;

ठरलें ! टाकायचेंच हें उद्यां ! विमलला खूपच आश्चर्याचा धक्का बसेल, नाहीं ? तिच्या उत्तराची किती अधीरतेनें वाट पहाट असेन मी ! फर्स्ट एलएल. बी. च्या निकालाचीसुद्धां इतक्या उत्सुकतेने वाट पाहिली नसेल मी ! दोन दिवस आहेत मध्ये—जाणार तरी कसे. कुणास ठाऊक ? असे वाटते कीं उद्या गुरुवार उजाडावा एकदम ! वेडे मन !— अधीरतेनें मृगजळामागे तर धाव घेत नाहींना ना ?

× × ×

तारीख १८–७–३५

विमलचें पत्र शेवटी आज आलें. पत्र—छे ! पत्र कसलें तें ? जळजळीत निखाराच होतां जणु कांहीं तो ! पत्रांतील प्रत्येक वाक्य शल्याप्रमाणें हृदयांत कसें अगदीं खोल जाऊन बसलें आहे. पत्र उघडलें कोणत्या अपेक्षेनें आणि त्यांत निघालें काय ? रत्नमाला निघण्याच्या आशेनें उघडलेल्या पेटींत कृष्णसर्प सांपडावा, तसें झालें माझें ! पत्रांतील एकेक वाक्य म्हणजे तप्त सांडसानें हृदयाला दिलेला एकेक चटकाच जणुं कांहीं ! हृदयाच्या साऱ्या आकांक्षा त्या पत्रानें होरपळून निघाल्या. कल्पनेचें सारें मनोरे धुळीला मिळाले. मृगजळाच्या पाठीमागें आशेनें धांवणारे तहानलेलें मन धांपा टाकीत बेशुद्ध झाले.

–तिनें लिहिलेली कांहीं वाक्यें हृदयांत इतकी खोल रुतून बसली आहेत कीं तीं या जन्मीं तरी विसरणें मला अशक्यच दिसतें. तिनें लिहिलें आहे–

' तुमच्याकडून असें पत्र येईल अशी माझी बिलकूल कल्पना नव्हती. शद्ध मैत्रीचा अर्थ कोणत्या कोशांत ' प्रेम ' असा होतो हेंच समजत नाहीं माझ्या मनमोकळ्या वर्तणुकीचा अर्थ असा भलता कराल असें वाटलें नव्हतें. एकीकडे खरें सहशिक्षण पाहिजे म्हणून ओरड–आणि दुसरीकडे मन· मोकळ्या वर्तणुकीचा होत असलेला हा भलता अर्थ, त्यामुळें मुलींनीं वागावे तरी कसें, हाच प्रश्न आहे !—

' श्रीयुत पराजपे, मी तुम्हांला जरा स्पष्टच विचारतें, रागावूं नका हं ऽ! तुम्ही कधीं आरशात स्वत:कडे पाहिले आहे का हो ? नसेल तर पहा ना एकदा, आणि अगदीं प्रामाणिकपणे सांगा, तुमच्यावर कुणी मुलगी प्रेम करूं शकेल असे तुम्हांला वाटतें का ? तुम्ही स्वत: तरी अशा शरिरावर प्रेम करूं शकतां का ? .... मुलींना भित्र्या आणि दुर्बळ माणसाविषयीं फार तिटकारा वाटत असतो, ही मी तुम्हाला एक कानगोष्ट सांगतें. एका आठ-वड्यापूर्वीं वेस्टएंडमध्यें सोल्जरनें केलेला तुमचा अपमान आणि तुम्ही दाखविलेला भित्रेपणा तुम्ही विसरला असाल, पण मी नाहीं विसरलें. त्या वेळीं त्या मेल्याच्या तुम्ही तोंडांत दिली असती तर तुमच्याविषयीं मला कांहीं तरी वाटलें असतें ! पण तुम्ही अपमान मुकाट्यानें गिळून मागें आलांत ! अशा भित्र्या माणसाविषयीं मला कधीं तरी प्रेम वाटणें शक्य आहे काय ? जातां जातां आणखी एक सूचना देते मी ! कधीं काळीं तुम्ही कुणावर प्रेम करावयाचें ठरवलेंच तर अगोदर सशक्त व्हा ! दुर्बळांना प्रेमाच्या राज्यांत जागा मिळत नाहीं हे विसरू नका,....

मी दोनदां पत्र वाचलें, तीनदां वाचले, प्रत्येक शब्द सलणाऱ्या काट्या प्रमाणे बोंचत होता. मला वाटलें, विमलनेंच का हें पत्र लिहिलें आहे? नेहमीं हंसत खेळत गप्पा मारणारी विमल–पत्रांत प्रत्येक वाक्याला कोटी करून हंसविणारी विमल–तिनेच लिहिलें असेल का हें जहाल पत्र ? छे ! ती विमल नव्हती ही !–अगदींच निराळी विमल आहे ही !

सहज समोरच्या आरशाकडे माझें लक्ष गेले! मी दचकलों! पुन्हां आरशांत पाहिले, आरशाजवळ गेलो व नीट स्वत:चें निरीक्षण करूं लागलो. स्वत:चें लक्षपूर्वक निरीक्षण करण्याची माझी ही पहिलीच वेळ! मला प्रश्न पडला, विमलवर प्रेम करणारा तो हाच का परांजपे? अशाच फाटक्या शरिरानें का त्यानें तिला मागणी घातली? आणि याच परांजपेवर तिचें प्रेम असावें अशी मनानें प्रामाणिक समजूत करून घेतली होती तर! बिचारें मन! मन वेडें असते, पण त्याबरोबर आंधळेंहि पण असतें तर! पुन्हां एकदां मी आरशांत पाहिलें. मला स्वत:चीच लाज वाटली. माझ्या आकृतीकडे मला फार वेळ पाहवेना. मी ओशाळून मागे वळलों व खुर्चीवर बसलों. मला विमलच्या पत्रांतील शब्द आठवले, 'दुर्बळांना प्रेमाच्या राज्यांत जागा नसते!' किती खरें!

आणि याच वेळेला ओशाळलेल्या मनाने एक निश्चय केला—प्रतिज्ञाच जवळ जवळ ती! शरिराने आणि मनानेसुद्धा सबळ झाल्याखेरीज विमलला तोंड दाखवायाचें नाहीं मनाच्या दुर्बलतेमुळे प्रतिज्ञा मोडेल अशी मला भीति वाटली, म्हणून प्रतिज्ञा कागदावर लिहून काढली. आणि साक्षीदार म्हणून विमलचाच फोटो खाली डकविला. तिचे प्रेम मिळणें आतां अशक्य होते—तरी पण तिच्या प्रेमाला पात्र होण्याचा प्रयत्न कां नको?

* * *

तारीख २१।७।३५.

मला ही हीन व्यक्तित्वाची भावना हल्लीं फारच नडायला लागलीय्! कावीळ झालेल्या माणसाला जसे सगळे पदार्थ पिवळे दिसूं लागतात, तसेंच झालें आहे माझें! कुणीहि माझ्याकडे जरा टवकारून पहायला लागला कीं माझ्या अशक्ततेकडेच त्याचे लक्ष आहे असें वाटून मी अस्वस्थ होतो. कुणी दोघेजण माझ्याकडे पहात गप्पा मारत असले, कीं त्यांच्यांत माझ्या अशक्ततेबद्दलच चर्चा चालली आहे असे मला वाटूं लागतें! थोडक्यांत म्हणजे, साऱ्या जगाचे डोळे माझ्या अशक्ततेवर खिळले आहेत अशी

समजूत झाली आहे माझी ! त्यामुळें कुणांत मिसळावेसेंहि वाटत नाहीं फारसें ! कधीं कधीं 'फिजिकल कल्चर' चे अंक मी चाळतो, त्यांतील एकेका मल्लाचे पिळदार उघडे शरीर पाहून मला स्वतःचीच कींव वाटूं लागते. असे आपणाला कधीं तरी होतां येईल कां, असा विचार मनांत येतो आणि मन अस्वस्थ होतें. किती उशिरां जागा झालो आहे मी ?

परवां शरीराची मापें घेतलीं. छाती फक्त साडे अठ्ठावीस इंच, दंड दहा इंच, मान वगैरे त्याच प्रमाणांत ! हें आमचें शरीर आणि या शरिरानें मी 'फिजिकल कल्चर' मधील मल्लासारखा होण्याची आकांक्षा धरणार ! छान विनोद आहे हा !

परवांपासून सुरुवात केली व्यायामाला ! नमस्काराच्या साध्या व्यायामापासून सुरुवात करण्याचें ठरवलें आहे मी ! काल अन् आज खूप त्रास झाला ! माझ्या मांड्या दुखूं लागल्या ! पण तसाच नेटानें व्यायाम सुरूं आहे.

लहानपणापासून नेमानें व्यायाम घेत आलों असतों तर ? पण आतां त्याचें काय ? तरी बरें ! आतां तरी डोळे उघडले ! त्याचें सारें श्रेय विमलचाच !

* * *

तारीख ४–१०–३५

विमलचें पत्र आलें आज ! एकदां तरी भेटून जाच, अशी विनंति केली आहे तिने पत्रांत ! तिची कल्पना, मी तिच्यावर खूप रागावलों आहें अशी ! वेडी मुलगी ! कधीं तरी रागावणें शक्य आहे का मी तिच्यावर ? त्यांतून तिनें माझ्या डोळ्यांत झणझणीत अंजन घालून केवढे मोठे उपकारच केले नाहींत का ?

खरेंच, जावें का विमलकडे एकदां ? सहज भेटून यायला काय हरकत आहे ? छे, पण माझा निश्चय ! त्याची काय वाट ? त्यापेक्षां तिला पत्र लिहिलें तर ?... नकोच तें पण ? पत्रव्यवहारसुद्धां बंद !

मी विमलला विसरण्याचा किती प्रयत्न करतों, पण साधतच नाहीं तो !

जों जों तिला विसरण्याचा जास्त जास्त प्रयत्न करतों, तों तों ती जास्त जास्तच मनश्चक्षूंपुढें उभी राहते ! तिच्या प्राप्तीची अशक्यता दिसत असतांहि अद्याप मी तिच्यावर प्रेम करतों आहें, हें नवल नाहीं का ! पण... पण हें असें एकांगी प्रेम काय उपयोगी ?

* * *

तारीख २३—३—३६

या विसंगतीचा मेळ कसा घालावा, हेंच मला समजेनासें झालेलें आहे. स्त्रियांचें हृदय म्हणजे एक न उलगडणारें कोडें आहे हेंच खरें. आज कॉलेजकडे जात होतों. उलट बाजूनें विमल येतांना दिसली. दोघांनींहि एकमेकांना पाहिलें ! माझ्यांशीं बोलण्याची उत्कट इच्छा दिसत होती तिच्या नजरेंत ! मलाहि माझ्या निश्चयाचा क्षणभर विसर पडला. वाटलें, खूपखूप गप्पा माराव्यात आतां हिच्याशीं ! त्या दृष्टीनें मनाची तयारी करून मीं सायकलचा वेगसुद्धां कमी केला; पण इतक्यांत प्रतिज्ञेच्या त्या कागदाची मला आठवण झाली. त्या फोटोंतील विमल माझ्या नजरेसमोर उभी राहिली. माझ्या मनाच्या दुबळेपणाबद्दल ल ती हिणवते आहे असाच मला क्षणभर भास झाला. मी शुद्धीवर आलों. रस्त्यांतून जाणाऱ्या विमलकडे दुर्लक्ष करून मी पुढें गेलो. तिच्या बाजूनें जातांना क्षणभरच तिच्याकडे नजर टाकली. खालचा अधर दातांनीं आंवळून आपली निराशा लपविण्याचा ती प्रयत्न करीत असावी, असा मला भास झाला. पुन्हां वाटलें कीं, उतरावें सायकलवरून ! पण छे ! निश्चय तो निश्चय !

मला समजत नाहीं कीं माझ्याशीं बोलण्याचा तिचा येवढा प्रयत्न कां चालला आहे तें ! काय सांगायचे असेल तिला येवढें ? मागें लिहिलेल्या बोचक पत्राबद्दल तिला पश्चात्ताप तर होत नसेल ? पण छे ! मोठी मानी मुलगी आहे ती ! तिच्या मतें मी केवढासा क्षुद्र प्राणी ! मग काय असावें तिच्या मनांत ? न सुटणारें कोडेंच आहे हें एक !

जिमखान्याच्या वार्षिक खेळांमध्यें टेनिसच्या चार मॅचेस आत्तांपर्यंत जिंकल्या; आज सेमि-फायनल ! बहुतेक फायनलला येईन मी हें नक्की ! पण तिथें चांगलाच मार मिळेल हेंहि तितकेंच खरें !

* * *

तारीख १७-७-३६

लिहितांना किती नाना तऱ्हेचे भावनातरंग माझ्या मनांत उमटताहेत ! कुठून लिहिण्यास सुरवात करावी हेंच समजेनासें झाले आहे मला ! मला वाटतें, घडलेल्या प्रसंगानें मनांत विचाराचे वावटळ उठविले आहे. अशा गोंधळलेल्या मनःस्थितींत जर मीं लिहायला सुरवात केली तर कांहींच लिहितां येणार नाहीं मला नीट ! थोडा वेळ विचार करून विचारांत सुसंगता आणावी हेंच ठीक !

आज घडलेला प्रसंग जशाचा तसाच मी लिहिणार आहे. आत्मस्तुतीचा दोष पदरीं येईल त्यामुळे, पण त्याला इलाज नाहीं.

सकाळीं लॉ कॉलेज लायब्ररींत अभ्यास करीत बसल्यानें मला परत निघण्यास बराच उशीर झाला होता. त्यांतून घरीं जाण्याची कांहीं विशेष गडबड नसल्याने मी भांडारकर इन्स्टिटयूटवरून सर्व्हंट्स् ऑफ इंडिया सोसायटीच्या रस्त्याने सावकाश सायकल चालवीत निघालों होतों. सकाळच्या दहाचा सुमार असल्याने रस्ता जवळ जवळ ओसच होता. बऱ्याच अंतरावर दोन मुली किंवा बायका मला त्या वेळीं नक्की कळले नाही—जात असतांना दिसत होत्या. मी आपल्याच तंद्रींत सायकल चालवीत होतों. पण इतक्यांत समोर चाललेल्या प्रसंगानें माझें लक्ष वेधलें.

मध्येंच आडव्या रस्त्यानें एक गृहस्थ खूप वेगानें सायकल चालवीत आला आणि त्यानें आपला मोर्चा थेट त्या मुलींच्याच दिशेला वळविल. त्या मुली रस्त्याच्या ज्या बाजूनें जात होत्या, त्याच बाजूने त्याने जोरांत सायकल मारली. मला आश्चर्य वाटलें प्रथम ! इतका सबंध रस्ता मोकळा असून रस्त्याच्या उजव्याच बाजूनें जाण्याचा त्याचा येवढा अट्टाहास कां

त्याचेंच मला कोडें पडलें. मुली अगदीं त्याच्या वाटेंत होत्या, मला वाटलें आतां तो घंटा वाजवील ! पण छे ! त्याने सायकल सरळ एका मुलीच्या अंगावर घातली. त्या मुलीला सायकलचा जोरांत धक्का लागला. अनपेक्षित-पणें आलेल्या हल्ल्यानें घाबरून ती खूप मोठ्याने ओरडली व रस्त्यांत कोलमडून पडली. तो सायकलवालाही त्या धक्यानें सायकलसह रस्त्यावर पडला.

सायकलवाल्याचा फाजील उद्देश ताबडतोब माझ्या लक्षांत आला. अर्ध्या मिनिटांतच त्या ठिकाणीं मीं सायकल आणली, सायकल रस्त्यावर फेंकून दिली व नुकत्याच उठून उभ्या राहिलेल्या गृहस्थाच्या जाकिटाची कॉलर पकडून त्याच्या दोन झणझणीत कानशिलांत ठेवून दिल्या.

' शरम नाहीं वाटत ए, त्यादुकट्या मुली पाहून त्यांच्या अंगावर सरळ सायकल घालायला ! ' मीं रागाने म्हटलें व आणखी एक कानशिलात ठेवून दिली.

माझ्या आकस्मिक आगमनाने खूपच गडबडला तो गृहस्थ ! या रस्त्यावर कुणी असेल अशी त्याची कल्पनाच नव्हती जवळ जवळ ! मला पाहिल्याबरोबर त्या दोघां मुलींनासुद्धां बराच धीर आला; व दुसरी मुलगी जमिनीवर पडलेल्या मुलीच्या पातळावरील धूळ झाडू लागली.

' निर्लज्ज ! पाजी ! चांगले बडवले पाहिजे अशा बदमाषांना ! ' पहिली मुलगी उसळून म्हणाली.

' चूक झाली माझ्या हातून, क्षमा करा ! ' तो गृहस्थ—मवालीच होता कुठला तरी तो—गयावया करीत हात जोडून म्हणाला, ' चुकून सायकलचें चाक एकदम वळलें.'

' हरामखोर ! ' मी त्याच्या जाकिटाची कॉलर हिसकावीत म्हटलें, ' मी माणून पहात होतों सगळें ! बोल, याच्या अंगावर मुद्दाम सायकल घात-लीस कीं नाहीं ? सबंध रस्ता मोकळा असतांना उजव्या बाजूनें मुद्दाम सायकल नेण्याचें कारण काय तुला ? बोल ना आतां !,' मीं पुन्हा त्याची कॉलर हिसकली.

'आतां कुठें मेल्याला बोलायला तोंड आहे ?' दुसरी मध्येंच म्हणाली, 'पाठ चांगली मऊ केली पाहिजे अशा हरामखोराची !'

'थांब ! पोलीस स्टेशनवरच न्यायला पाहिजे तुला आतां ! त्याशिवाय नाहीं घडा मिळायचा तुला ! आम्ही दोघं या प्रकाराला साक्षीदार आहोंतच !'

पोलिसपर्यंत जाण्याची धमकी ऐकतांच तो मवाली चांगलाच घाबरला आणि अगदीं गयावया करूं लागला. पोलिसपर्यंत प्रकरण नेणें त्या दोघी-नांहि इष्ट वाटले नाहीं. म्हणून त्याला तिथेच सोडून द्यावयाचें ठरवलें. मात्र सोडण्यापूर्वी त्याला त्या दोघींची क्षमा मागायला लावले.

'पुन्हा असा कुठं सांपडलास तर तुरुंगाची हवा चुकायची नाहीं हंऽ !' मी जातां जाता त्याला बजावले. त्याने मुकाट्याने सायकल उच-लली व यःपलायतें केले.

'लागले नाहीं ना तुम्हांला कुठें ?' मीं पहिल्या मुलीला विचारलें.

'छे ! मुळींच नाहीं ! थोडंस पायाला खरचटलं येवढंच ! सायकल आल्याबरोबर चटकन् बाजूला झाले म्हणून बरं !" ती म्हणाली, 'पण खरंच, तुम्ही ऐन वेळीं आलांत म्हणून तर आम्हीं बचावलो.'

'हो, नाहींतर काय ! आणि आजूबाजूला ओरडलं तरी कुणी माणूस नाहीं !' दुसरीनें टेकूं दिला. 'फार फारच उपकार झाले तुमचे आमच्यावर !'

'छे हो ! उपकार कसले त्यांत ? ऐन वेळीं माझा उपयोग झाला याचच मला समाधान वाटतं !' मीं सायकल हातांत घेत म्हटलें, 'कर्त-व्यच होतें माझें तें एक !'

'पण तुम्हांला तरी याच रस्त्यान येण्याची बुद्धि बरी झाली' पहिली म्हणाली. "आतां तसंच आमच्याबरोबर रेसिडेन्सींत चला ना आम्हांला सोबत ! नाहींतर पुन्हा तोच मवाली यायचा !' आम्ही तिघेहि यावर हंसलो व कॉलेजच्या रस्त्याने चालूं लागलों.

आणि जातां जातां मला कळलें कीं, त्या दोघीहि फर्ग्युसनला फर्स्ट इयरला होत्या. एकीचे—पहिलीचे—नांव इंदु कुलकर्णी व दुसरी सुशीला

भिडे! दोघीहि सकाळींच येरंडवणें कॉलेजांतील आपल्या मैत्रिणीला भेटून परत येत होत्या. मींहि माझें नांव व माझ्याविषयीं थोडी माहिती सांगितली. थोड्याच वेळांत आमच्यामधील परकी भाव बराचसा नष्ट होऊन आम्ही मनमोकळेपणीं गप्पा मारूं लागलो. रस्ता सरला तरी गप्पा सरण्याचीं चिन्हें दिसेनात! गेटजवळ उभा राहून खूप वेळ गप्पा मारल्यावर शेवटीं कुलकर्णी म्हणाली 'अशाच किती वेळ तारकळत गप्पा मारणार आतां! या ना तुम्ही पुन्हां केव्हांतरी गप्पा मारायला. आतां नाहीं म्हणायचं नाहीं, अं? केव्हां येतां!'

'येईन असाच केव्हांतरी!' मी हंसत म्हटले.

'असाच केव्हांतरी म्हणजे असा केव्हांतरी आमच्यावर मवाल्याचा हल्ला झाला म्हणजे वाटतं?' कुलकर्णीने विचारले. आम्ही तिघेहि यावर हंसलो. 'बाकी खरे धैर्यवान् बाई तुम्ही! इतर कुणा एकट्या दुकट्याची छाती झाली असती का, कोण जाणे!'

'तुम्ही अशीच माझीं स्तुतिपुराण गाणार असाल तर कधींच येणार नाहीं हं तुमच्याकडे!' मीं जरा हसत म्हटले, 'बरं जातो मी! परवां सकाळीं येईन तुमच्याकडे.'

'नक्की ना? विसरलांत तर पाहा हं!' असे मला बजावीत त्या दोघी आंत निघून गेल्या व मीहि परतलो.

घरीं आलो त्या वेळीं नानातऱ्हेचे विचार थैमान घालीत होते माझ्या डोक्यांत! विचार करतां करतां सहज आठवले-एका वर्षापूर्वींची गोष्ट! वेस्टएंडमध्ये त्या सार्जंटने केलेला माझा अपमान माझ्या डोळ्यांसमोर उभा राहिला. त्या वेळचा परांजपे आणि आजचा परांजपे! किती फरक दोघांत! सहज मी आरशात पाहिले! मला जरा अभिमान वाटला माझें शरीर पाहून. तसा मी सँडो झालों नव्हतो, पण खूपच चांगला फरक पडला होता माझ्या शरीरांत! आणि याला कारण विमल!

विमलच्या आठवणीने मात्र साऱ्या उत्साहावर एकदम विरजण पडलें. विमल! खरेंच आज विमल हजर असती तर—! मला आश्चर्य वाटलें! विमलशिवाय प्रत्येक गोष्ट मला अशी उदासीन कां वाटावी हेंच मला

कळेना. मला माझ्या एम. ए. च्या निकालाच्या वेळची आठवण झाली. एम. ए. दुसऱ्या वर्गांत पास झाल्याचे कळल्यावरहि माझे अभिनंदन करायला विमल नाहीं, म्हणून मला वाईट वाटत होते. मला राहून राहून सारखे वाटते कीं, विमलचे हृदय दगडाचे तर नाहीं ? कींव करण्याऐवजीं एकदम झिडकारणे व तेंहि इतक्या तीव्र शब्दांत तिला शोभले कां ? इतकी निष्ठूर आहे का ती ?

सहज मीं विमलच्या फोटोकडे पाहिले ! फोटोतलि विमल माझ्याकडे पाहून हंसत होती. पण–पण खऱ्या विमलने माझ्याकडे पाठ फिरविली होती.

× × ×

तारीख १८-७-३६

' जागा नाहीं ' या सतत उत्तराने निराश झालेल्या एखाद्या बेकार पदवीधराला अनपेक्षितपणे सरकारी नोकरीचा योग मिळावा, किंवा मित्राच्या भिडेस्तव नाइलाज म्हणून घेतलेल्या लॉटरीच्या तिकिटाला पहिल्या नंबरचे बक्षीस मिळावे, तसे झाले मला आज ! क्षणभर वाटले कीं, मी या पृथ्वीवर नसून नंदनवनातच वावरत आहे. मला आनंदाच्या अत्युच्च शिखरावर बसविण्यास एक पत्र कारणीभूत झाले. विमलचे होते तें पत्र ! तिने लिहिले होतें–

प्रिय सुधाकर,

' खूप रागावलां आहात माझ्यावर ना ? दोनदां रस्त्यावरून जातांना मला मुद्दाम टाळलत यावरूनच ओळखलं मीं ते ! बोंचक पत्र मीं तुम्हांला लिहिलं म्हणूनच तुम्ही इतके रागावलांत, खरं ना ?

' इतकं टोचून तुम्हांला हे पत्र लिहिलं याचं कारण काय असेल असं वाटतं ? मी तुमचा तिरस्कार करते म्हणून ? छे ! भलतच ! या जन्मीं तरी तुमचा तिरस्कार करणं शक्य आहे का मला ! माझं तुमच्यावर खूप प्रेम होतं ! आणि तरीहि मीं तुम्हाला जाणून बुजून ते पत्र लिहिल. आश्चर्यचकित होऊ नका ! पत्र लिहिण्याच माझं कारण तरी ऐका !

" इतकं बोंचक पत्र लिहिण्याचा माझा उद्देश मला तुम्हांला व्यायामाकडे प्रवृत्त करण्याचा होता. इतकं आश्चर्य वाटतं तुम्हांला हे वाचून ? पण याखेरीज तुमची प्रवृत्ति व्यायामाकडे वळविण्यास दुसरा उपायच नव्हता हे सांगितलं तर तुमचा विश्वास बसेल का ? किती वेळां मी तुम्हांला व्यायाम करण्याची सूचना दिली होती पण कधींतरी तुम्ही त्याचा विचार केला होता का ? सुदैवानें त्याच सुमारास सोल्जरनें केलेल्या अपमानाचा प्रसंग अगदीं ताजाच असल्याने मला तुमची मनोभूमिकाहि पाहिजे तशीच मिळाली. माझ्या पत्राचा परिणाम किती छान झाला हे तुम्ही पाहाताच आहांत.

मला कालचा सारा प्रसंग मिस कुलकर्णीकडून कळला. खूप अभिमान वाटला मला त्यावेळीं तुमचा ! अन् त्या वेळीं तुमचा पराक्रम पहायला हजर नव्हते म्हणून वाईटही वाटल !

गेला ना तुमचा सगळा राग ? कसलंहि किल्मिष नाहीं ना मनांत आतां ? तुमच्या एक वर्षापूर्वींच्या पत्राच आता होकारार्थी उत्तर दिलं तर स्वीकाराल का ?

' चार वाजतां मी तुमची वसति गृहांत वाट पहात आहे हं ! अगदीं न चुकतां यायचं, राहील ना लक्षांत ?

आपलीच

**विमल**

तें पत्र मी इतक्या वेळा वाचलें कीं, त्यांतील अक्षर न् अक्षर तोंडपाठ झाले ! तरीहि तृप्ति वाटेना ! आनंदातिशयाने मी अगदीं बेहोष झालों होतों. कुठून तरी अमृताचा वर्षाव माझ्यावर होत आहे असे मला वाटत होते ! क्षणभर मला शंका आली, स्वप्न तर नाहीं हें सारे ? मी स्वतःच स्वतःला 'चिमटा' घेतला. छे !, पूर्ण जागा होतो मी ! ते पत्र घेऊन अक्षरशः घरभर नाचलो मी ! माझ्या सबंध वर्षाच्या तपस्येचे ते फळच असें मला वाटत होतें.

चार वाजतां विमलने मला वसतिगृहांत बोलावले होते, पण मी

तीनलाच तिथे हजर झालों. भय्याला आंत विमलला बोलवायला पाठवून मी कॉमनरूममध्यें बसलों.

थोड्याच वेळात विमल आली. दोघांनीं एकमेकाकडे पाहिलें. त्या एका दृष्टिभेटीने मनाच्या आजूबाजूस दडून राहिलेले उरल्यासुरल्या संशयाचे धुके पार नाहींसे झाले. हृदयाची ओळख हृदयाला पटली. आम्ही दोघेही मोठ्यानें हंसलों.

गप्पांमध्यें किती आणि कसा वेळ जात होता याचा दोघांनाहि पत्ता नव्हता. जणु कांहीं एक वर्षभर सांचलेल्या साऱ्या गप्पांना त्याच वेळीं अगदीं भरती आली होती. मीं कांहीं वेळाने दचकून घड्याळाकडे पाहिलें. घड्याळ सात वाजल्याचें दाखवीत होतें.

'छान ! ' मी हंसत एकदम उठलो, ' पाहिलंस क किती वाजलेत तें ?आणि सहाला एका प्रोफेसरला भेटायला यायचं कबूल केलें होत. '

विमलहि हंसली व उठली.

' खरंच ! किती वेळ गेला गप्पांत ?' ती म्हणाली, 'पण आतां गेला ना राग त्या पत्राबद्दलचा ? का आहे कांहीं शिल्लक ?'

'राग ?' मी हसत म्हटले, ' मी तर ते पत्र म्हणजे संजीवनीच समजलों आहे. अशा संजीवनीबद्दल राग ? आणि बरं का, ही सजीवनी तूं मला दिल्याबद्दल तुलासुद्धा या पुढं संजीवनीच म्हणायचं मी ठरविलं आहे."

यावर कांहीं न बोलतां ती फक्त हंसली.

तिला जणुं कांहीं असेंच म्हणावयाचें होतें, ' संजीवनी ? इश्श ! कांहीं तरीच ! "

—माझ्या डायरीवरून.

# मांडण : २

मांडणाला सुरवात झाली त्या दिवसाची मला चांगली आठवण आहे. घरीं आलों, त्या वेळीं शाळेंतील अपमानानें माझें डोकें फिरून गेलें होतें अगदीं ! शाळेंतील नोकरीचा तो माझा पहिलाच दिवस ! अनुभव नसल्यानें खूपच घाबरलो होतो मी तास घेतांना ! आणि मुलांना तरी दुसरें काय हवें ? त्यामुळें तास चालू असताना वर्गात एकच गोंधळ माजून राहिला. दोनतीनदां टेबलावर हात आपटून शांतता प्रस्थापित करण्याचा मीं प्रयत्न केला. पण परिणाम मात्र उलट झाला त्याचा ! शेवटीं नाइलाजानें हेडमास्तरांना वर्गात आणणे मला भाग पडले होतें.

मी घरीं आलो, त्या वेळीं वरील प्रकार माझ्या मनांत सारखा घोळत असल्याने मी विषण्ण मनःस्थितींतच होतों. कोट वगैरे न काढतां टोपी टेबलावर फेकून मी तसाच इझिचेअरवर पडलो. खालीं गादीशीं टेकून आई, यशवंत किंवा ध्रुव असे कोणतें तरी मराठी मासिक वाचण्यांत गुंतली होती. मी आल्याबरोबर तिनें माझ्याकडे पाहिलें आणि माझा त्रासिक चेहेरा पाहून तिनें विचारलें, " कारे, डोकं दुखतंय् वाटतं ? "

" अं–हं ! कांहीं नाहीं ! " मी इझिचेअरवर पडतां पडतां उत्तर दिलें. मी जास्त कांहींच बोललो नाहीं–कांहीं बोलण्याच्या मनःस्थितींत नव्हतोंच ! आईने ओळखलें कीं, स्वारीचें आज कांहीं बिघडलें आहे. तीहि जास्त कांहींच न बोलतां हातांतील मासिक वाचूं लागली.

इतक्यांत जिन्यावर धाड् धाड् पावलें वाजूं लागलीं. शांता शाळेंतून आली हें मी ओळखलें. दोनदोन, तीनतीन पायऱ्या सोडून अवखळ-पणें जिना चढण्याची तिची पद्धत माझ्या पूर्ण परिचयाची होती. पण तिच्याशीं या वेळीं कांहींच बोलण्याची माझी इच्छा नसल्याने मी मुकाट्यानें टेबलावरील एक पुस्तक उचलले व वाचनांत गढून गेल्याचे सोंग केले.

"आई ए आई—" जिन्यांतूनच आईला हांक मारीत शांता गडबडीनें वर आली.

"अग हो–हो--पण! आईने हातांतील मासिक बाजूला करीत हंसत म्हटलें, "वाटेत उंबरठा आहे–जपूनच हऽ! नाहीं तर अडकायचा पातळाचा घोळ पायांत!"

"ए आई–पण आमच्या शाळेत आज काय गंमत झाली माहिती आहे तुला?" नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणे शांतेने आपलीं पुस्तकें टेबलावर अस्ताव्यस्त फेंकून आईच्या मांडीची उशी करीत त्यावर आपलें डोकें घुसळीत विचारले, "आज किनई—"

"शांते, आता लहान कां ग तूं अशी मांडीवर लोळायला? ऊठ ऊठ!" आईने हातातील मासिक तिच्या डोक्यावर आपटीत हंसत म्हटलें. "पधरा सोळा वर्षांची घोडी झालीय् तरी तिला वाटतंय् आपण लहानच आहोत अद्याप!"

"बरंऽऽ! असुं दे जा. मी सोळा वर्षांची घोडी!" खोट्या रागानें गाल फुगवीत शांता म्हणाली, "पण मी कितीहि मोठी असलें तरी तुला लहानच आहे ना? तूंच नाहीं कां असं म्हणत? बरं कां आई—आज आमच्या शाळेंत नवीन मास्तर आले होते. आमच्या वर्गावर भूमिती शिकवायला आले ना, त्या वेळी खूप फजीति केली सर्वांनीं त्यांची!"

शांतेच्या साऱ्या हकीगतीचा रोख माझ्यावर होता हें मीं ओळखलें. मी कांहींच न बोलतां हातांतील पुस्तकाकडे लक्ष लावले. हळूंच पुस्तका-वरून मी शांतेकडे पाहिले. डोळ्याच्या कडेनें ती माझ्याचकडे पहात असल्याचे मला दिसून आले. मीं मुकाट्यानें पुस्तकांत मान घातली.

"कसली ग फजीति?" आईनें विचारलें, "अन कुणीं केली? पुढाकार तूं घेतला असशील, होय ना?"

"अग ऐक तर खरंऽ!" शांता सांगूं लागली. "भूमिती शिकवायाला आज आम्हांला नवीन मास्तर येणार होते. नुकतेच बी. ए. ऑनर्स झाले आहेत ते. मात्र शिकवण्याचा कांही अनुभव नाहीं त्यांना! तेव्हां आमच्या वर्गातील चारपांच मुलांनीं त्याची खूप फजीति करण्याचे ठरविले. तास सुरूं होताच मास्तराची स्वारी वर्गात आली, आणि मग त्या तिघाचौघांनीं एकदम गोंधळ करावयास सुरवात केली." सांगता सांगता शांतेने हळूंच माझ्याकडे पाहिलें. मीं पुस्तक मिटले व सरळ बसून तिची हकीगत ऐकूं लागलों.

"मग?" आईनें उत्सुकतेनें विचारले.

"मग काय? मास्तर चांगलेच घाबरले. त्यांच्या तोंडांतून शब्द फुटेना—फळ्यावर आकृति काढताना त्यांचे हात कांपूं लागले. त्यांनीं मुलांना दटावण्याचा खूप प्रयत्न करून पाहिला. पण मुलं त्यांना ऐकणार? त्यांनीं जास्तच गोंधळ करायला सुरवात केली."

"पुढें काय झालं मग?" आईनें विचारले.

"शेवटीं मास्तर रागारागाने वर्गाबाहेर गेले आणि कांहीं वेळाने हेडमास्तरांना घेवून आले. आणि मग वर्ग शांत झाला." शांतेनें हकीगत संपविली, "असले कसले ग मास्तर आई? इतके घाबरट मास्तर शाळेत नेमतात तरी कशाला? अग ते मास्तर प्रथम प्रथम तर इतके घाबरले होते कीं पहिल्यांदा त्यांच्या तोंडातून शब्दही फुटत नव्हता. आम्ही सारेजण खूप हंसलों त्यावेळीं!"

"शांते—तूं गप बसतीस कीं नाहीं आतां?" माझ्या इतका वेळ दबलेल्या रागाचा एकदम स्फोट झाला. "मघापासून कसला वात्रटपणा चालवला आहेस? फाजील नाहीं तर!"

"काय फाजीलपणा केला रे मी?" शांता आईच्या मांडीवरून उठून म्हणाली, आमच्या वर्गात झालेली हकीगत आईजवळ सांगूं नये वाटत? शाळेतल्या मास्तराविषयीं आईजवळ बोलायला कुणाची भीति

नाहीं मला ! मग तो मास्तर माझा सख्खा भाऊ असला म्हणून काय झालं ? ”

“ अगबाई, तूं कां तो ? ” आईनें आश्चर्यानें माझ्याकडे पहात म्हटलें.

“ अग हाच तो ! म्हणे मास्तर ! वारे मास्तर ! ” शांता हंसूं लागली, “ चार वाक्यं नीट धडपणे बोलता येत नाहींत न् झाला मास्तर ! ज्यांनीं उठावं त्यांनीं मास्तर व्हावं असंच हल्लीं झालंय् कीं काय कुणास ठाऊक ! धडे तरी गिरव अगोदर मास्तरकीचे नीट ! ”

“ शांते–तुला विचारलं नाहीं ह कांहीं : गप्प बैस तूं अगदीं ! वर्गात दंगा करीत असल्यावर मास्तर काय शिकवतात हे समजेल कशाला ! अन् कायग–तास चालूं असतांना वर्गात हशा पिकविण्यासाठीं मुद्दामच बाका-वरचें पुस्तक तूं खालीं पाडलेंस ना ? ओळखलें मीं ते ! ”

“ मुद्दाम पाडल वाटतं मीं पुस्तक ? बराच दिसतोस कीं ! ” शांता उसळून म्हणाली, ” कांहीं वेळाने म्हणशील मी लिहीत असतांना तूंच मागून खड्डू मारलास म्हणून ! वारेवा ! बर कां ग आई–”

“–तूं आतां अगदीं गप्प रहा पाहूं ! ” मीं रागानें म्हटलें, “ साळ-सूदपणाचा आव आणून वर पुन्हां आपल्या थोरल्या भावाची टिंगल करतेस ! कांहीं वाटत नाहीं वाटत जिवाला ? ”

“ मी तुझ्याशीं बोलत नसून आईशीं बोलते आहे, हें लक्षांत ठेवशील कां जरा दादा ? ” शांतेने रागाने म्हटले, “ थोरला भाऊ झाला म्हणजे त्याला वाटेल ते लहनास बोलण्याची मुभा असते अशी तुझी समजूत नाहीं ना ? अन् काय रे–” ती माझ्याकडे वळली, “ हायस्कूलमध्ये मास्तरची जागा मिळाली म्हणजे स्वर्ग हातीं आल्यासारखा तुला वाटतो कीं काय ? कां आपण कॉलेजमधील कुणी मोठे प्रोफेसर आहोत असं तुला वाटतंय् ? ”

“ अन् मी कधीं प्रोफेसर होणारच नाहीं अस कां तुला वाटतं ? मी तिच्याच शब्दांत तिला विचारले, “ नुसता मास्तर एक मास्तर राहणार आहे अशी तर नाहीं तुझी समजूत ? बाईसाहेब, पहाल दोन वर्षांनीं एम्. ए. झाल्यावर...”

माझें भाषण पुरें व्हायच्या अगोदरच शांता जोरजोरानें हंसूं लागली. मी जास्तच चिडलों.

" अहो शेखमहंमद, आवरा आपलें ते हवेंतील मनोरे ! बाई बाई ! म्हणे मी प्रोफेसर होणार!" शांतेला जास्तच हंसूं आलें. ती आईकडे वळून म्हणाली, " एक आई–प्रोफेसर होणार आहे तुझा मुलगा ! तोंड पहा प्रोफेसर होणाराचं ! शाळेतील मुलासमोर चार शब्द धडपणें बोलतां येत नाहींत, अन् म्हणें प्रोफेसर होणार ! टेलरिंग ॲंड कटिंग कॉलेजचा होशील प्रोफेसर एखादे वेळीं ! "

" शांते " मी रागानें खुर्चीवरून उठत म्हटलें, आपल्या थोरल्या भावाशीं बोलते आहेस तू हे लक्षांत आहे ना ? आणि माझ्याच वर्गांत आहेस तूं..."

" मग काय छडी बिडी मारण्याची धमकी देणार आहेस कीं काय ? " तिनें मधेंच विचारलें.

" वेळ आली तर त्यालाही कमी नाहीं करणार ! " मी रागाने म्हटलें.

" दादासाहेब, विसरा ह त्या गोष्टी ! न्यू इंग्लिश स्कूल म्हणजे तुला गावठी शाळा वाटली कीं काय एखादी ? छड्याचा काळ गेला आतां, बर कां ? म्हणे छडी मारीन !–उगीच वाटेल तें बोलून तोंडाची वाफ दवडण्यांत काय अर्थ आहे ? "

" शांते–स्वतःला फार शहाणी समजतेस कां ग तू ? कां आपण कुणी शिष्ट आहोत असं वाटतंय तुला ? " रागाने मी वाटेल ते बोलत होतों. "वडील भावाशीं बोलण्याची ही तऱ्हा नवीनच शिकलेली दिसतेस."

" आणि धाकट्या बहिणीशीं वागण्याची ही तुझी तऱ्हा मला नवीनच दिसते आहे ! " शांतेने मला उलट टोमणा दिला. " मी फार शिष्ट आहे काय ? शिष्ट बनायला मला अद्याप न्यू इंग्लिश स्कूलमध्ये मास्तरची जागा नाहीं मिळाली "

आता मात्र संताप अनावर झाला माझा ! मी कांहीं न बोलतां टेबलावरील टोपी उचलली व आईकडे वळून म्हटले, " आई, जातो हं मीं बाहेर ! "

"वेडा कां रे तूं शशी?चहा नाहीं, कांहीं नाहीं—कुठे चाललास यावेळीं?" आमच्या भांडणाच्या वेळीं नेहमींच स्तब्ध बसणारी आई एकदम म्हणाली.

" आपल्या लाडक्या मुलीलाच दे करून चहा ! " मी रागानें शांताकडे पहात म्हटलें, व बाहेर निघालो. शांता जोरांत हंसली.

" जाऊं दे ग, झाला असेल त्याचा एखाद्या हॉटेलमध्यें चहा ! " बाहेर पडतां पडतां तिचें शब्द माझ्या कानावर आले.

बाहेर पडलो त्या वेळीं रागाचा पारा खूपच वर चढला होता माझा ! शांतेचा प्रत्येक शब्द माझ्या हृदयांत निनादत होता. म्हणें टेलरिंग अँड कटिंग कॉलेजचा प्रोफेसर होणार ! आणखी दोन वर्षांनीं एम्. ए. झाल्यावर एफ वाय. ला तिच्याच वर्गावर गणीत शिकवायला येईन तेव्हां समजेल. नाहीं तरी फारच शिष्टपणा वाढत चालला आहे तिचा ! वर्गांत सुद्धा मुद्दामच माझी फजिती व्हावी म्हणून टपलेली असते सारखी ! तिनं पुस्तक सुद्धां मुद्दामच बाकावरून खालीं पाडलं ! छे ! या मुलीची चांगली फजीति करायला पाहिजे केव्हां तरी ! माझी टिंगल करते काय ?

विचार करून डोके बधिर होऊन गेले. चहा घ्यावा म्हणून शेजारच्याच हॉटेलमध्यें शिरलों.

दुसरेंच दिवशीं सगळया मुलासमक्ष तिची फजीति करण्याची मला चांगलीच संधी मिळाली. भूमितीचा तास चालू होता. प्रमेय समजावून देतां देतां मी सहज शांतीकडे पाहिले. ती मागें वळून आपल्या मैत्रिणीशीं बोलण्यांत गुंग झाली होती. प्रमेय अर्धवट सोडून मी टेबलाजवळ आलों.

" मिस लेले, तुमच्या गप्पा झाल्या म्हणजे मला सांगा हं ! तोंपर्यंत अभ्यास थांबवतों मी !" मी खुर्चीवर बसत म्हटलें. शांतेने एकदम दच-कून माझ्याकडे पाहिले. साऱ्या वर्गाचे लक्ष तिच्याकडे लागलें होते.

" हा भूमितीचा तास आहे -गप्पांचा नाहीं, हे कळायला पाहिजे तुम्हांला ! " मी तिच्याकडे पहात गंभीरपणें म्हटलें. " गप्पाच मारायच्या झाल्या तर वर्गाबाहेर पुष्कळ जागा आहे, नाहीं ?"

" मी तिला विचारत होते..." शांताने मध्येंच बोलण्याचा प्रयत्न केला.

"तुम्ही काय बोलत होता, हें विचारलें नव्हतें तुम्हांला!" मी म्हटलें. "मात्र आतां पुन्हां तुम्ही अशा गप्पा मारतांना दिसलांत तर तुम्हां दोघींनाही बाहेर जावें लागेल. कळलें ना?" असें म्हणून मी प्रमेयाकडे वळलों. साऱ्या वर्गाला आमचं नातं माहित असल्यानें बहुतेकांनीं आश्चर्यानें शांतेकडे पाहिलें. शांता मात्र अगदी गोरीमोरी झाली होती. मी न कळतच समाधानाचा एक सुस्कारा सोडला.

दुसऱ्या अशाच एका प्रसंगीं मी एक प्रमेय समजावून देत असतांना शांता आपल्या वहीवर कसले तरी चित्र काढत असून तिच्या शेजारची मुलगी कुतूहलानें त्या चित्राकडे पहात असलेली मला दिसली. मी प्रमेय अर्धवटच सोडला.

"मिस लेले, यापुढे कोणती पायरी आहे हे तुम्ही सांगा पाहूं!" माझा आवाज ऐकतांच शांतेने दचकून वर पाहिले. "अ-ब ही रेषा अ—क या रेषेबरोबर आहे हे तुम्ही कसे दाखवाल?"

शांता जागेवर उभी राहून आकृतीकडे पाहू लागली. मनाचा उडालेला गोंधळ तिच्या चेहेऱ्यावर स्पष्ट दिसत होता.

"मला सांगता येणार नाही—मला समजलं नाहीं!" दोन मिनि-टांच्या शांततेनंतर तिनें हळूच उत्तर दिले.

"लक्ष होत का मी शिकवीत असतांना? त्या वेळीं काय चाललं होतं?" मी जरा जोरात प्रश्न केला, "वहीवर कसल्या आकृति काढत होतां?"

"फळ्यावरील आकृति उतरून घेत होते!" शांता हळूच म्हणाली. मी कांहीं न बोलता हसलो व तिच्या बाकाजवळ गेलो.

"ही अशी आकृती मी फळ्यावर काढली आहे वाटत?" ी तिची वही हातांत घेत म्हटले.

"हा ड्रॉईंगचा तास आहे अशी तर नाहीं तुमची समजूत झाली? वर्गांत नीट लक्ष द्यायला नको अन् पुन्हां मास्तर नीट शिकवीत नाहींत, म्हणून ओरड करायला तयारच!"

मी फळ्याकडे गेलों व उरलेले प्रमेय पुरें करूं लागलों. बहुतेक मुलं

शांतीकडे पाहून हंसत होती. शांतीची दशा केविलवाणी स्थिति झाली होती.

या आणि अशाच एकदोन प्रकारानं शांतेचा माझ्यावरील संताप खूपच वाढला. अधूनमधून आम्ही एखादा शब्द बोलत असू—तोही या प्रकारानं बंद झाला. दोघांच्याही मनात परस्पराविषयीं एक प्रकारची अढी बसली. दोघांची समजूत घालण्याचा आईचा प्रयत्न सुद्धां अगदीं अयशस्वी झाला. वर्गात मुद्दामच मला त्रास देण्याकरितां ती वात्रटपणा करते अशी माझी समजूत आणि साऱ्या मुलांसमोर मुद्दाम आपलीच फजिती करण्याचें दादानें ठरविले आहे, अशी तिची समजूत अधिकाधिक दृढ होत गेली. त्यांत पुन्हां एक प्रसंग असा घडला की, त्यामुळे दोघांची मन एकमेकांविषयीं अधिकच गढूळ झालीं.

सातवीच्या वर्गावर मी बीजगणिताचा तास घेत होतों. एक अवघड Problem मुलांना समजावून देत असतांना मध्येच गड्यानें एक चिठ्ठी आणली. हेडमास्तरांनी मला ताबडतोब बोलावले होते. मुलांना मी एक अवघड प्रॉब्लेम सोडवायला दिला व हेडमास्तरांच्या ऑफिसांत आलो. शांतेला तिथे पाहून मला कमालीचे आश्चर्य वाटले. तिच्या हातांत आदल्याच दिवशीं वर्गात वाटलेल्या मासिक परीक्षेचा पेपर होता. ऑफिसांत आल्याबरोबर हेडमास्तरांनी कामांतून डोकें वर केले.

"या—तुमच्याविरुद्ध तक्रार आणली आहे मिस लेलेनीं!" त्यांनीं शांतीकडे बघत म्हटले. "त्यांना म्हणे तुम्ही भूमितीच्या पेपरांत जाणून बुजून कमी मार्क दिलेत."

"छे! असं कसं होईल? योग्य तेच मार्क माझ्या हातून पडले आहेत." मी म्हटले, "कोणत्या प्रश्नाबद्दल तक्रार आहे यांची?"

"दाखवा पाहू पेपर?" हेडमास्तरांनीं तिच्या हातांतून पेपर घेतला, "कोणता—सातवाच प्रश्न ना? इऽऽ! या प्रश्नाला दहा मार्क आहेत. यांना सहाच दिलेत तुम्हीं! चार मार्क कमी करण्याचं कारण त्यांना हवं आहे."

मी पेपरकडे दृष्टी फेकली व शांतेला जवळ बोलावलें.

" आकृति काढतांना तुम्ही एक ढोबळ चूक केली आहे. इथें ४५ अंशाचा कोन पाहिजे, त्याबद्दल ३५ अंशाचाच कोन तुम्ही काढलांत. त्यामुळें इथें एक मार्क गेला. प्रमेय सिद्ध करतांना तुम्ही अ—ब ही रेषा क—ड ह्या रेषेबरोबर दाखविली आहे. पण तत्पूर्वीच्या दोन पायऱ्या अजिबात गाळून टाकल्या. तिथें दोन मार्क गेले. आणि सिद्धान्त प्रस्थापित करतांना अ—ब बद्दल चुकून तुम्ही ब—क लिहिले आहे, तो एक मार्क गेला. दहा-पैकीं सहा मार्क अगदीं बरोबर दिलें आहेत—जास्त देतांच येत नाहींत ! कळलं ? "

शांतेनें मुकाट्यानें मान हालाविली व पेपर उचलला.

" आणखी कांहीं तक्रार नाहीं ना तुमची " हेड मास्तरांनीं विचारले. शांतेनें नकारार्थी मान हालवली व ती बाहेर पडली. हेडमास्तरांनीं माझ्या-कडे पाहिले.

" काय हो, सख्खी बहीण ना तुमची हि ? असं कां मग ? "

" वेडी आहे झालंऽ ! " मी टेबलावरील बीजगणिताचे पुस्तक उचलीत म्हटलें, " बरें ! जातों मी तासावर ! "

भांडणाची निसरगांठ या प्रसंगाने चांगलीच घट्ट बसली—दोघांच्याही मनांत गैरसमजाचें वादळ उद्भवू लागलें. एकमेकाशीं शक्य तो कमी संबध येईल, याबद्दल आम्ही दोघेही जपूं लागलो. वर्गात तिला प्रश्न विचार-ण्याचें किंबहुना तिच्याकडे पहाण्याचेही मीं सोडून दिले होते. तीहि पुस्तकांतून आपले डोके वर काढीनाशीं झाली. घरीं तर एकमेकांचें दर्शन एकमेकांना क्वचितच होई ! जिन्यांत किंवा इतर कुठे गांठ पडलीच तर दोघेही दोन दिशेकडे पहात असूं !

मला मोठा प्रश्न पडला—ही गुंतागुंत आतां उलगडणार तरी केव्हां ? कां अशीच राहायची शेवटपर्यंत ? छे कल्पनाही सहन करवेना मला ती ! एक महिनाच झाला नसेल आमच्या भांडणाला—कसं अगदीं एकल-कोंड्यासारखं झालं होतं मला ! वेळीं अवेळीं वितंडवाद घालणारी-गडबडी हट्टी शांता कुठेंच न दिसल्यानें सारं घर कसं ओकं ओकं वाटे मला ! भांडणाचं मूळच काढून टाकण्यास मी किती अधीर होतों ! पण प्रथम

प्रयत्न करावयाचा कुणीं ? तिनें कां मी ? प्रथम सुरवात न करण्याइतका स्वाभिमान दोघांतही होता—आणि तोहि पुष्कळच प्रमाणांत ! गैरसमजाचें धुकें दिवसोदिवस दाट होत होते.. या भांडणाचा शेवट आतां कशांत होणार हेंच मला कळेना !

दिवसामागून दिवस जात होते. प्रत्येक दिवस आम्हांला एकमेकापासून दूरच नेत आहे, असा मला भास होत होता. एकमेकांना दूर करणारी ही गैरसमजाची दरी लांबणार तरी किती ? एकमेकांविषयीं एकमेकांच्या मनांत तिरस्कार उत्पन्न होण्याइतकें गैरसमजाचें किटण तर मनावर चढणार नाहीं ना ? मला वाटलं...तिच्याच मनांत माझ्याविषयीं अढी बसली आहे. कुणास ठाऊक पुन्हां कधीं ती निघेल कां नाहीं ती ! न कळतच या कल्पनेने माझ्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले.

—अगदींच करमेना म्हणून त्या दिवशीं मी शामकांतकडे गेलों होतों. नेहमीच्या सवयींप्रमाणें एकदम दरवाजा लाथेनें ढकलला—पण आंतील दृश्य पाहून दरवाजांतच थबकलो मी !

शामकांतच्या समोर कुणाचा तरी फोटो होता. शेजारींच टेबलावर नवीन घेतलेलें जरीचे पातळ किंवा लुगडे असे कांहीं तरी होतें. आणि शामकांत टेबलावर मान ठेवून हुंदके देत होता. दरवाजाचा आवाज होतांच शामनें दचकून मागे पाहिले.

“ शाम्—शाम्, काय झालं तुला रडायला ? ” मी घाईनें त्याच्याजवळ येत विचारलं. कांहीं न बोलतां शामने टेबलावरील पत्र माझ्या हातांत दिलें. मी पत्र वाचलें माझ्या हृदयाला एकदम चरका बसला. इंदूच्या नवऱ्याचे त्याला घरीं येण्याला बंदी करणारें तें पत्र होतें.

इंदू त्याची मानलेली बहीण—पण सख्या बहिणीपेक्षां दोघांचें एकमेकांवर प्रेम असें. इंदूला भाऊ नव्हता व शामलाही बहीण नव्हती ! पण त्या दोघांना एकमेकांवरील प्रेमामुळे ही उणीव कधींच भासली नव्हती. पण ...इंदूच्या नवऱ्याला त्यांतही संशयाची छाया दिसावी—आणि दोन प्रेमळ हृदयांना त्याने एकमेकांपासून दूर करावें—विषाद वाटला मला या गोष्टीचा ! जगांत काय एकेक मनुष्यस्वभावाचें नमुने असतात पहा !

आणि त्यानें परवांच भाऊबीजेची ओवाळणी घालण्याकरितां इंदूला आवडणारे चंदेरी पातळ खरेदी केले होतें. पण...पण आतां कुणाला घालायचे ते ? मला शामच्या मनःस्थितीची जाणीव झाली व माझ्या डोळ्यांत पाणी उभे राहिले.

तशांच जड अंतःकरणाने मी शामची कशी बशी समजूत घातली व बाहेर पडलो.

आणि त्याच वेळीं मला एक निराळी दृष्टि प्राप्त झाली.

मानलेल्या बहिणीबद्दल शामला इतकं प्रेम वाटतं— तिची भेट होण्याची अशक्यता दिसतांच त्याला आपले अश्रू आवरतां येत नाहींत — आणि मी ! शांता माझी सख्खी बहीण ! मी तिला हल्ली कोणत्या तऱ्हेने वागवतोय् ?

विरोधाने दिसणारे माझे हे चित्र पाहून माझी मला इतकी लाज वाटूं लागली कीं, माझा सारा अभिमान एकदम गळाला त्यामुळे ! भांडण आजचे आज मिटवायचेंच-सारा स्वाभिमान त्याबद्दल खर्च पडला तरी हरकत नाहीं. नाहीं तरी शांता माझी एकुलती एक धाकटी बहीण ! तिचे लाड पुरवायचे — कोडकौतुक करायाचे, ते सारे बाजूलाच ! पण भांडण मात्र वाढवतो आहे मी ! मला माझी वर्गातील वर्तणूक आठवली — अन् वाटलं, धाकट्या बहिणीला प्रेमाने वागविण्याची हीच तऱ्हा कां ?

भांडण मिटविण्याच्या अधीरतेमुळे घराच्या दिशेनें माझी पावलें झपझप पडत होती. इतक्यांत माझ्या मनांत एक कल्पना आली ! तिच्याकरतां भाऊबीजेची सुंदरशी ओवाळणी आत्ताच नेली तर ? एका दुकानात दीड महिन्यापूर्वी तिने जरीच्या अस्मानी पातळाकरितां घेतलेला हट्ट मला आठवला. दुकान वाटेवरच होते. ताबडतोब मी ते पातळ खरेदी केले, व तें पुडक्यांत बांधून घेऊन घरचा रस्ता सुधारला.

वाट चालतांना एकच शंका मनाला सारखी जाचत होती. माझ्याविषयीं तिच्या मनांत असलेली अढी या समेटानें नाहीं दूर झाली तर ? गैरसमजाचं धुकं मनाभोवतीं तसंच दबा धरून राहिल तर ? आणि सग-

ळ्यांत हृदयांचा थरकांप उडविणारी शंका म्हणजे ती समेटालाच नाखूष असली तर ?

मन या शंकेच्या भोंवऱ्यांत सांपडले असतांनाच मी जिना चढलों. नेहमींप्रमाणे दरवाजा ढकलणार, तो आत एकदम हुदक्याचा आवाज ऐकू आला. मी एकदम थबकलों. आंत काय चालले असावे याची कल्पनाच येईना मला ! थोड्या वेळाने आईचा आवाज ऐकूं आला.

" तू त्याला त्या दिवशीं इतकं टाकून बोलायला नको होतं, शांते ! वर्गातील अपमानाने दुखावलेल्या त्याच्या मनाला त्यावेळीं सहानुभूति पाहिजे होती. तूं त्यावेळीं केलेली निष्ठूर चेष्टा त्याच्या मनाला किती लागली असेल बर ?"

" खरच—चूक झाली माझ्या हातून !" शांतीचा आवाज गहिंवरलेला येत होता. " पण या चुकीबद्दल किती दिवस छळणार तो मला ? तो कधीं बोलणारच नाहीं का ग माझ्याशीं ? आणखी एका आठवड्यानें भाऊबीज— " शांतेला मध्येंच हुदका आला. माझ्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले. मी एकदम दरवाजा उघडला व दारापाशीं उभा राहून हांक मारली. " शांते—"

शांतेने एकदम दचकून मागे पाहिलें.

" कोण दादा ? तिने म्हटले.

आणि अश्रूपूर्ण नजरेनें अर्धा मिनिट आम्ही एकमेकाकडे सारखें पहात होतो.

त्या दृष्टिभेटीनें किती तरी शब्दांचें काम केले ! जणू कांहीं त्या दृष्टिभेटींत आम्हांला आमचा हरपलेला आनदच गवसला होता.

" शांते -ही पाहिलीस तुझी भाऊबीजेची ओवाळणी !" मी आंत येत तिच्या हातात पातळाचे पुडके देत म्हटलें. शांतेने ते पुडकें घेतलें व घाई-घाईनें उलगडलें. आत तिच्या आवडीचे अस्मानी पातळ पहातांच तिला खूप आनद झाला.

" अग बाई ! किती छान ! पाहिलंस आई पातळ !" शांता आईकडे वळली. पण आई होती कुठें जागेवर ? ती केव्हांच आंत गेली होती.

" खरंच दादा, किती चांगला आहेस तूं! मी मात्र तुला त्या दिवशीं नाहीं नाहीं तें बोललें." शांतेला मधेंच हुंदका आला.

मी तिच्याजवळ गेलों व तिची पाठ थोपटींत म्हटलें. " वेडी कुठली! पूस ते डोळे! मी तरी तुला वर्गांत कमी कां छळलं? विसरायचं तें आतां! तें सारं मधलं स्वप्नच पडलं आपल्याला, अस समजूं या, अऽ"

शांतेनें मुकाट्यानें मान हालविली व पदराने डोळे पुसले.

" शांते, आजही पातळ आणण्याची स्फूर्ती मला एकाएकी कशी झाली सांगू? शामकांताकडे गेलों होतों आज—" असें म्हणत टेबलाजवळील खुर्ची अलीकडे ओढून तिच्यावर बसत मी तिला सारी हकीकत सांगितली.

शांतेला ती ऐकून खूपच आश्चर्य वाटलें. ती एकदम खुर्चीच्या हातावर बसत माझ्याकडे पहात म्हणाली, " अगबाई! किती आश्चर्य! मला सुद्धां अशाच एका गोष्टीनें पश्चात्तापाचा उमाळा आला होता—"

" म्हणजे?" मी आश्चर्यानें विचारलें.

" सरलेकडे गेले होते मी दुपारीं! त्या बिचारीचा भाऊ मागील वर्षीं कॉलऱ्याला बळी पडला. त्याची आठवण होऊन ती सारखी रडत होती आज! मला त्यावेळीं वाटल—सरल आपल्या मृत भावाबद्दल इतके अश्रू गाळतें—आणि मी मात्र जिवंत भावाशीं एकसारखी भांडत असते! किती विरोध! त्याच वेळीं मी निश्चय केला—"

" शांते—" मी मधेच एकदम म्हटलें. " खरोखर योगायोग असला पाहिजे हा, नाहीं? नाहीं तर एकाच दिवशीं अनपेक्षित रीतीने दोघांनाही एकदम स्फूर्ति व्हावी हे किती नवल! खरंच शांते आजच्या इतकी तुझी खरी योग्यता मला कधींच पटली नव्हती!"

" अन् मला पण तुझी खरी योग्यता आजच कळली! किती गमतीचा योगायोग!" शांता माझ्याकडे पहात म्हणाली.

" कां झाला कां समेट?" दारांतून आईचा आवाज ऐकूं आला. आम्ही दोघांनीं दचकून मागें पाहिलें. आई हातांत चहाचा ट्रे घेऊन येत होती. "आतां भांडायचें केव्हां पुन्हां?" ट्रे टेबलावर ठेवीत आईनें हं विचारलें.

" तें आतां शांतेला विचार ! " मी हंसत शांतेकडे पहात म्हटलें.

शांतेनें येवढाले डोळे केले माझ्यावर !

" भांडण उकरून काढण्याचा बेत दिसतोय दादासाहेब आपला ! " असंच जणुं कांहीं तिला म्हणायचं होतं !

---

## नाकारलेली मुलगी : ३

[ पंढरपुरांतील गांवाबाहेरील बगल्यांतील एक खोली ! खोली शक्य तों आधुनिक पद्धतीनें शृंगारण्याचा प्रयत्न केला आहे. कोपऱ्यांतील खिडकी-खालींच एक टेबल व त्यावर निरनिराळया इंग्लिश व मराठी पुस्तकाने भर-लेलें शेल्फ ! टेबलाजवळ एक रिकामी खुर्ची व टेबलाला ३० अंशाचा कोन करून ठेवलेली आरामखुर्ची ! टेबलाच्या विरुद्ध कोपऱ्याला मच्छर-दाणीनें विभूषित असलेली किर्लोस्कर स्प्रिंग कॉट ! दरवाजावर मोर भरलेला जाळीचा पडदा—भिंत, ग्रुप फोटो, टाइम्सच्या ॲन्युअलमधील चित्र वगैरेंनीं सजविलेली. इझिचेअरवर १७ वर्षांची, फार गोरी जरी नसली तरी मोहक म्हणतां येईल अशी हातांत Thomas Hardyची Jude the Obscure घेऊन बसलेली तरुणी ! सकाळची सव्वा आठाची वेळः—

लीला वाचण्यांत अगदीं गढून गेली असल्याने एकदोन मिनिटें खोलींत वाऱ्याच्या स्वैर विहाराखेरीज पूर्ण स्तब्धता असते. इतक्यांत बाहेर टांग्याचा आवाज ऐकूं येतो. लीला चमकून एकदम उठते व घाईनें पुस्तक तसेंच हातांत घेऊन कुतुहलतेने खिडकीशेजारीं जावून बाहेर पाहू लागते. टांग्यांतून उतर-णारी व्यक्ति पाहून तिला खूपच आश्चर्य वाटले असावें. कारण टांग्यां-तील व्यक्ति सामान आंत ठेवून 'प्रभाकर' अशी एक हांक मारून वर दरवाज्यांत येऊन उभी राहिली तरी ती पूर्वींच्याच ठिकाणीं रस्त्यावर शून्य नजरेनें पहात उभी असते. ]

सुधीरः—प्रभाकर आहे घरांत ?

लीलाः—( एकदम दचकून तोंड वळवते. इतका वेळ आपण कांहींच चौकशी न करतां तसेंच उभे राहिलों या विचाराने तिला वरमल्यासारखें होते. गोंधळ लपविण्याकरितां घाईने पदर नीट सांवरून घेते. ) दादा मंडईत गेला आहे भाजीला. दहा मिनिटात येईलच ! बसा आपण तोपर्यंत ! ( पुस्तक टेबलावर ठेवून खुर्ची पुढे देते. )

सुधीर:—( आंत येऊन खुर्चीवर बसत व हसत ) छान ! पाहुणे यायच्या वेळींच यांना मंडई वगैरे आठवते वाटतं! पाहुण्यांना टाळण्याचा हा एक उपाय आहे की काय हे विचारलं पाहिजे त्याला ?

लीलाः—आपण येणार हे माहिती नसावं त्याला ! नाहीं तर बोलला असता तो माझ्याजवळ तसा !-----

सुधीरः—( हसत ) मी येणार हे मला तरी कुठें ठाऊक होतें ? तुमच्या बार्शी लाइट रेल्वेने आणले मला इच्छेविरुद्ध ! अगदीं छानच फजीति केली माझी या लाईनने !

लीलाः—( कुतूहलाने ) ती कशी काय ?

सुधीरः—अहो बार्शीची गाडी म्हणून पंढरपूरच्या गाडींत येऊन बसलों, दुसरं काय ? शेजारी शेजारीं गाड्या उभ्या करण्याचे परिणाम !

लीलाः—( मंद स्मित करीत ) पण दोन्ही गाड्यावर पाट्या लावलेल्या असतात—लक्ष गेलं नसेल तुमचे तिकडे !

सुधीरः— हो ना ! म्हणून तर सारा हा घोंटाळा ! नीट चौकशी करायची नाहीं, हा आम्हां सुशिक्षिताचा बाणाच ना ! भोगावा लागला त्याचा परिणाम डबल चॉर्ज देऊन !

लीलाः—अन् हमालाच्यासुद्धां लक्षात आली नाहीं ही चूक ?

सुधीरः—पण हमालाला मी कुठे सांगितले होते मला बार्शीला जायचें आहे म्हणून ! मी थेट पंढरपूरच्या गाडींत शिरलों—त्याला वाटलं साहेबाला पंढरपूरलाच जायचं असेल. बाकी एक स्टेशन गेल्यावर साहेबाला जेव्हां कळलं कीं गाडी पंढरपूरला जाते आहे, तेव्हां त्याचा चेहरा बघायला पाहिजे होता कुणी तरी ! नशीब कीं ऐन वेळीं आठवलं प्रभाकर पंढरपूरला असतो

हे ! नाहीं तर मधल्याच स्टेशनवर उतरून कुर्डूवाडीला परत जाण्याचा बेत होता.

लीलाः—अगबाई–बोलत काय उभी राहिलें पण मी ! चहा घ्यायचा असेल ना अद्याप तुमचा ? आत्तां आणते करून ! दादा येईलच तोंपर्यंत !

सुधीरः—पण घरांत कुणीच दिसत नाहीं आज ? सारी मंडळी बाहेर गेली आहेत वाटतं ?

लीलाः—एकादशी ना आज ? सारी जण विठोबाच्या दर्शनाला गेलीं आहेत.

सुधीरः—( हंसत ) हो–खरंच : विठोबा आहे नाहीं कां इथें ! ते मी विसरलोंच होतो! ( लीला हंसून पडदा बाजूला करून जाते. सुधीर आतां खुर्चीवरून उठून टेबलाजवळ जातो व पुस्तकाची चाळवाचाळव करूं लागतो. मधेंच लीलेनें पाळथे ठेवलेले ज्यूड दि ऑब्स्क्यूअर उचलून चाळतो, कांहीं वेळ खिडकींत उभा राहून बाहेरच्या देखाव्याचे अवलोकन करतो. इतक्यांत लीला चहाचा ट्रे घेऊन आंत येते. )

लीलाः—अद्याप नाहीं आला दादा ! काय बाई ! मंडईला इतका वेळ नाहीं लागत त्याला—

सुधीरः—बसली असेल स्वारी एकाद्या मित्राकडे गप्पा मारीत ! ( लीला चहाचा कप व बिस्किटाची बशी त्याच्या पुढे ठेवते ) हे काय ? तुम्हाला नाहीं घेतला चहा ?

लीलाः—नुकताच झालाय् माझा चहा !

सुधीरः—वा ! म्हणजे मी स्टेशनवर चहा घेतला नाहीं असं तुमचं म्हणणं आहे वाटतं ? अं–ह ! तुम्ही घेत नसाल तर हें पहा–( चहाचा कप बाजूला सारतो. लीला मुकाट्यानें दुसरा कप घेऊन त्यांत चहा ओतूं लागते. )

सुधीरः—( चहा घेतां घेतां ) प्रभाकरच न् तुमचं नातं काय ? माफ करा हं ? पण सख्खी बहीण नसल्याचे त्याने मला सांगितलें होते म्हणुन विचारतो.

लीलाः—माझा मावसभाऊ आहे तो.

सुधीर:—असं का ! सुट्टींत तुम्ही इथें आलांत वाटतं ?

लीला:—इथेंच असते मी ! इथून पाच मिनिटाच्या अंतरावरच आमचं घर आहे. दादा सुट्टींत इथें आला म्हणजे मी बहुतेक या घरींच असते. ( कांहीं वेळ स्तब्धता ! सुधीर चहा संपवून कपबशी ट्रेमध्ये ठेवतो. लीलेचा चहा अद्याप चाललेलाच असतो. )

सुधीर:—( एकदम ) खरंच तुम्हाला मी एक चमत्कारिक प्रश्न विचारतो—पण इथे तुम्हांला इंदू कुळकर्णी नांवाची कुणी मुलगी माहिती आहे कां ?

लीला:—( चहा पिता पितां येत असलेले हंसे मोठ्या मुष्किलीनें आंवरीत ) इंदू कुळकर्णी ? हो—आहे खरी एक मुलगी त्या नांवाची ! तिचे वडील वकील आहेत. तीच म्हणतां ना तुम्ही ?

सुधीर:—हो, हो ! तीच ! कशी काय मुलगी आहे ती !

लीला—म्हणजे ? मला नाहीं आपल्या प्रश्नाचा अर्थ कळला. कोणत्या अर्थानें विचारतां तुम्ही हे ? रूपानें म्हणाल तर माझ्यासारखीच आहे साधारण ! स्वभावाविषयीं—

सुधीर:—( कांहीं तरीच प्रश्न विचारला या जाणीवेनें वरमून मधेंच ) म्हणजे तशी कांहीं माहिती नको आहे मला ! सहज आठवलं तिचं नांव—माझ्या बहिणीची न् तिची ओळख आहे—( लीला आपले हसें दिसूं नये म्हणून कपबशा आवरण्याचे मिष करते. खालीं दरवाजाचा आवाज होतो. )

लीला:—(गडबडीनें ट्रे उचलून जात) अगबाई, दादा आला वाटतं ! मी त्याला वर लावून देते ह ! ( जाते. सुधीर पुन्हा टेबलावरचें पुस्तक उचलून चाळतो. खालीं प्रभाकरचे मोठ्या आवाजांतील हंसणें ऐकूं येतें. प्रभाकर पडदा बाजूला करून आंत येतो. )

प्रभाकर:—Halloo Chap ! तूं तर मला चकितच करून सोडलंस अगदीं ! पुण्याची पर्वती सोडून तू या वेळीं इथे ? अन् पत्र कां नाहीं पाठवलंस अगोदर ? स्टेशनवर नसतों आलों ?

सुधीर:—पत्र पाठवायला वेळ मिळेल तर ना ? सारं कांहीं अनपेक्षित

ठरलं अगदीं; तुला आश्चर्य वाटेल, पण गाडी सुटेपर्यंत मी कुठें जाणार हें माझें मला सुद्धां माहिती नव्हतें.

प्रभाकर:—मला नाहीं कळला तुझ्या बोलण्याचा अर्थ! कुर्डुवाडीला अनपेक्षितपणं ठरवलस वाटतं इकडे येण्याचं!—

सुधीर:—ठरवलं कसलं-ठरवावं लागलं! अन् तेंहि पण गाडींत!

प्रभाकर:—अस्सं! आतां आलं लक्षांत! (हंसतो) आपली स्वारी बार्शीची गाडी म्हणून पंढरपूरच्या गाडींत बसली असावी, होय ना? तरी म्हटलं या स्वारीला आज पंढरपूरच्या विठोबाची कां आठवण झाली? पण तुला गाडी सुटेपर्यंत कशी चूक कळली नाहीं हें आश्चर्य आहे.

सुधीर—चौकशी केली तर कळेल ना! गाडींत बसल्यावर जो पुस्तकांत डोकें घालून बसलों होतों तें वर उचलतो कशाला लवकर! चूक कळून आलीपण फार उशीरा!

प्रभाकर:—(हंसत) बरं झालं! उशीरा चूक कळली म्हणून तरी निदान तुझे पाय पंढरपूरला लागले. नाहीं तर पंढरपूरद्वेषी तुम्ही पंढरपूरला कसचे येणार?

सुधीर:—(आश्चर्यानें) मी पंढरपूरद्वेषी? कुणी सांगितलं तुला हें? कां आपलं कांहीं तरी बोलायचं म्हणून बोलतो आहेस? मला पंढरपूर-सारख्या पुण्यभूमीचा द्वेष करण्याचें काय कारण बुवा?

प्रभाकर:—मला काय माहीत तें? (त्याच्या शेजारी खुर्ची आणतो, व त्याच्याकडे खुर्चीचें तोंड वळवून त्यावर बसतो.) पण मला खरंच सांग, एखाद्या ठिकाणाविषयीं कांहीं कारण नसतांना पूर्वग्रह दूषित करून घेऊन, त्या ठिकाणीं राहणारांचा अपमान करणें तुला शोभलें कां?

सुधीर:—(गोंधळून) मला नाहीं तुझ्या बोलण्याचा अर्थ कळला. कशाविषयीं बोलतो आहेस तूं? कुणाचा अपमान केला मी?

प्रभाकर:—Excuse हं! भेटीच्या सुरवातीलाच असा अप्रिय विषय उघडतों आहें. पण मला कळल्यापासून ही गोष्ट माझ्या मनाला फारच लागून राहिली होती. त्यांतलेत्यांत माझ्या एका मित्रानें इतका अविचारीपणा दाखवावा याबद्दल मला विशेषच वाईट वाटले.

सुधीरः—( अद्याप गोंधळलेलाच ) अद्याप मला तुझ्या बोलण्याचा अर्थ कळत नाहीं. कृपा करून जरा स्पष्ट बोलशील का ?

प्रभाकरः—( त्याचेकडे पहात ) कुळकर्णी वकील माहीत आहेत तुला इथले ?

सुधीरः—Oh, I see ! म्हणजे त्यांविषयीं बोलतो आहेस तर ! त्यांची मुलगी नाकारल्याचें प्रकरण ना ?

प्रभाकरः— म्हणजे ते कांहींच नाहीं वाटतं ? सुधीर तूं इतका अविचारी असशील अशी माझी कल्पना नव्हती. यंदा डॉक्टर होणार तूं...

सुधीरः—( मधेंच ) हो...होSS ! जरा सावकाशीने घे ! एकदम नकोस आग पाखडूं माझ्यावर ! ( खुर्चीवर सरळ बसून त्याच्याकडे पहात ) हंSS ! आतां बोल ! ही मुलगी नाकारण्यांत अविचार केला असं तुझं म्हणणं आहे. पण मी म्हणतों मुलगी पसत नव्हती म्हणून नाकारली यांत अविचारपणा कसला दाखवला मी ?

प्रभाकरः—पण मुलगी पसंत नसायला तिला पाहिली तरी होतीस का अगोदर ? निदान फोटोतून तरी !

सुधीर—मुलगी पाहिली नव्हती मी ! कबूल ! पण साधारणपणें कल्पना करतां येतेच कीं नाहीं ? तुला सांगायला कांहींच हरकत नाहीं आतां—पण पंढरपूर म्हटलं कीं अगदीं चमत्कारिक चित्र माझ्या डोळ्यासमोर उभं राहतं ! ते वारकरी मेळे—ते बडवे लोक—एकंदरींत सारं भटजी वातावरण ! अशा वातावरणांत वाढलेल्या मुलीविषयीं कल्पना बांधणं फार अवघड कां आहे ? मुलगी पाहिली नाहीं म्हणून तूं मला दोष देतोस. मुलगी स्वरूपानें मोठी सुंदर असेल, नाहीं म्हणत नाहीं मीं! पण अशा कोंदट वातावरणांत तिच्या बौद्धिक विकासाला कितपत वाव मिळाला असेल हा प्रश्न नाहीं का ?

प्रभाकरः—पण त्याबद्दल तरी कुठें चौकशी केलीस तूं ? निदान शिक्षण वगैरे तरी पहायला नको होते कां ? कां पंढरपूरची मुलगी म्हटली कीं ती अशा कोत्या समजुतीने परिपूर्ण भरलेली असा सिद्धांतच ! तूं मुलगी नाकारलीस याबद्दल मला कांहीं म्हणायचं नाहीं. पण काहीएक चौकशी न करता

मला पंढरपूरची मुलगी करायची नाहीं असें जे त्यांना उत्तर भरकटलेस त्यावर माझा कटाक्ष आहे.

सुधीरः—मला नाहीं बुवा चौकशी करण्याची इतकीशी आवश्यकता वाटली. पण मी खात्रीनें सांगतो कीं, त्या मुलीचं शिक्षण चार पांच इयत्तापलीकडे गेलेलें नसणार! अरे बाबा पंढरपूरची आहे ती! (हंसतो)

प्रभाकरः—साफ चूक आहे बरं कां तुमचा तो तर्क! यंदाच ती मॅट्रिकला बसली आहे हे सांगण्याची मी परवानगी घेतों. आणि बौद्धिक प्रगतीबद्दल विचारशील तर तिचा वाचण्याचा नाद सगळ्या गांवांत प्रसिद्ध आहे. मी वाचली नसतील अशीं कांहीं कांहीं पुस्तकें तिनं वाचलीं आहेत.

सुधीरः—( आळस देत ) जाऊं दे रे! झालं गेलं तें! कशाला मागील आठवणी उकरायच्या उगीचच?

प्रभाकरः—तसं नाहीं! मला तुझी चूक तुला दाखवायची होती येवढंच! आणखी जास्त माहिती पाहिजे असल्यास ऐक! तुझ्या आलेल्या उत्तराकडे इतर कुणी लक्ष दिले नसले तरी तिने ते मनाला फारच लावून घेतल आहे. तुझ्यासारख्या सुशिक्षिताने अशी डोक्यांत राख घालावी याबद्दल फार वाईट वाटलें तिला! ( पडदा बाजूला करून लीला आंत येते. )

लीलाः—( दरवाज्याशींच उभी राहून ) दादा—

प्रभाकरः—कोण लीले—ये ना आंत! तुझी न या पाहुण्यांची जरा ओळख करून देतों. आत ये ना! ( उठून तिच्यापुढं खुर्ची देतो. )

लीलाः—( पडद्याशीं खेळत ) जाते मी आतां घरी! सारी मंडळी आली परत. Hardy च पुस्तक न्यायला वर आलें होतें.

प्रभाकरः—( तिला आंत ओढीत आणून खुर्चीवर बसवीत ) अगऽहो! जाशील आतां घरीं मोठे कामाचे दिवेच लावणार कीं नाहीं? हे माझे मित्र देशमुख. तुला माहिती आहेतच. ( हंसतो. लीला मोठ्या प्रयासानें हंसे दाबते.)

सुधीरः—( हंसत ) त्यांची नू माझी ओळख व्हायची अद्याप राहिली

आहे असं तुला वाटतंय् कीं काय ? तूं येण्यापूर्वींच आम्हा दोघांची ओळख झाली आहे.

प्रभाकरः—( टेबलावर बसत ) वा ! मग छानच झालं ! गप्पाचं काम तेवढंच सोपं झालं ! ( लीलेकडे वळून ) बरं कां लीले, यांचं म्हणणं असं आहे कीं पंढरपूरचे सारे लोक बावळट आणि भटजी असतात—

सुधीरः—( मधेंच ) प्रभा—

प्रभाकरः—( त्याला अडवीत ) तूं गप्प रे ! माझं बोलणं झाल्यावर मग तुझ ! आणखी म्हणे त्यांची बौद्धिक वाढ खुंटलेली असते—प्रचलीत असलेल्या कोत्या समजुतीलाच ते चिकटून बसतात—

सुधीरः—पण असं कधीं मी म्हटलं होतं ?

प्रभाकरः—म्हणजे ? आत्तांच्या आत्तां नाकबूल करण्याचा विचार आहे कीं काय ?

सुधीरः—तसं नाहीं ! हा सर्वसाधारण नियम झाला. पण नियमाला अपवाद हे असायचेच !

प्रभाकरः—(हसत) अस्सं ! आतां अशी पगडी फिरवतोस वाटतं ! सांग पाहूं मग एक दोन अपवादांचीं नावं ?

सुधीरः—उदाहरणार्थ, अपवाद म्हणून मी लीलाताईकडेच बोट दाखवूं शकेन.

लीलाः—( हंसत ) मी अपवाद ? ती कशी काय बाई ?

प्रभाकरः—सुधीर, वाटेल तीं विधानं नको करूंस हंऽ ! अरे ही तर पक्की पंढरपूरी आहे.

सुधीरः— मी तर असं बिलकूल म्हणणार नाहीं ! आत्ताचंच पहा ना ! आलों त्यावेळीं इथं कुणी पंढरपूरी मुलगी असती तर मला पाहूनच थेट स्वयंपाकघरांत दडी देऊन बसली असती. अनोळखी पुरुषाशीं बोलायचं ! हरहर ! केवढं पाप ! तो विठोबा काय म्हणेल ! ( प्रभाकर हंसतो. लील हंसूं दिसूं नये म्हणून तोंड फिरविते.) पण यांनीं तूं येईपर्यंत मोकळ्या मनानें गप्पा मारल्या. येवढ्या एकाच गोष्टीवरून मी हें विधान करीत

नाहीं. मी आलों त्यावेळीं या Thomas Hardy ची Jude the Obscure कादंबरी वाचत होत्या——

लीला——( किंचित् हंसून मधेंच ) इश्श! फारशी अवघड कादंबरी नाहीं ती!

सुधीर:——अवघड? अहो साधं मराठी पुस्तक वाचतांना लाखो वेळा अडखळल्यापेक्षां ही प्रगती जास्त नाहीं कां?

लीलाः——पण मूळ वादाचा मुद्दा बाजूलाच राहिला—माझ्या वर्णनाच्या भरांत! तुमच्या पंढरपूरद्वेषाविषयीं चालला होता वाद!

प्रभाकरः——हो! खरंच! बरी आठवण केलीस—तर मी याला असं सांगत होतो कीं तूं जी कुलकर्ण्यांची मुलगी नाकारलीस——

सुधीरः——(मधेंच ) कृपा करून थांबवशील कां तो विषय आतां?

लीलाः—अगबाई! खरं कां हे? तरीच मघाशीं इंदूविषयीं चौकशी करीत होते ह हे! आतां कळलं कारण!

प्रभाकरः——अग विनोद तर तोच आहे. या स्वारीनं तिच्याविषयीं कांहीं चौकशी केली नाहीं. पाहिलंसुद्धां नाहीं तिला! आणि नाकारायचें कारण काय तर ती पंढरपूरी मुलगी आहे. आहे कीं नाहीं विनोदी?

लीलाः——असं नसेल कांहीं! त्यांचं प्रेम बसलं असेल कुणावर तरी! म्हणून कांहीं तरी निमित्त पुढे करून नाकारलं असेल हिला! ( सुधीरकडे वळून ) खरं ना मी म्हणते हे?

प्रभाकरः——काय रे, खरं कां? तुझ्याहि डोक्यांत प्रेमाचं वेड शिरलं वाटतं?

सुधीरः——चार वर्षे आपण एकमेकाच्या सान्निध्यांत आहोंत, प्रेमवेडाचं चिन्ह आढळली का कधीं तुला माझ्यामध्यें? उगीच नसता आरोप करण्यांत काय अर्थ आहे!

लीलाः——मग खरंच तुम्ही पंढरपूरची म्हणून तिला नाकारलंत? आश्चर्य आहे. मला नाहीं अद्याप खरं वाटत हें!

सुधीरः——तसंच झालं आहे खरं कांहींसं! पंढरपूरविषयीं अशा कांहीं

विचित्र कल्पना बनल्या आहेत माझ्या ! त्या साऱ्या कल्पनाच त्या मुलीच्या पसंतीच्या आड आल्या.

प्रभाकरः——ए सुधा—मी तुला एक प्रश्न विचारतो. ( लीलेकडे बोट दाखवून ) या पंढरपुरी मुलीविषयीं तुला काय वाटतं ?

लीलाः——(मधेंच ओरडून ) दादा——

प्रभाकरः——हो पण ! ओरडतीस कां इतकीं ! तुला कांहीं हा पहायला नाहीं आला !

लीलाः——(लीला रागानें उठून ) मी जातेय इथून कशी ! ( रागानें एकदम पडदा बाजूला करून जाते. )

प्रभाकरः——अग हो—पण ! रागवायला काय झालं इतकं ? ए वेडा-बाई...गेली वाटत ? वेडीच आहे अगदीं ! साधी थट्टा कळत नाहीं ! ( सुधीर आपल्या तंद्रींत पेपरवेट घेऊन टेबलावरच्या खडूचे—चाळा म्हणून तुकडे करू लागतो. प्रभाकर हंसतो.) कां रे बुवा? सबंध खडूची कांडी वाईट दिसत होती वाटतं टेबलावर ? ( सुधीर कांहींच उत्तर न देतां आपल्या तंद्रीतच आपला उद्योग सुरू ठेवतो. प्रभाकर उठून त्याला खांद्याला धरून हलवतो ) अहो श्रमिष्ट, ऐकलं कां मी काय म्हणतो तें ? स्वच्छ टेबल चांगलं दिसत नव्हतं कां !

सुधीरः——( शुद्धीवर येऊन हंसत टेबलावर पेपरवेट ठेवीत ) अं— काय म्हणालास ? हें होय ? जावूं दे रे ! टेबल घाण करण्याकरितांच असतें मुळीं ?

प्रभाकरः——हा शोध नवीनच दिसतोय !

सुधीरः——( त्याच्याकडे लक्ष न देतां ) मी काय विचारणार होतो बरंऽऽ ? हं... ही मावस बहीण कुठली काढलीस तूं ! तुला एखादी मावस बहीण असल्याचं तूं मला सांगितलें नव्हतेस !

प्रभाकरः——आणि माझ्या प्रत्येक नातलगाची माहिती पुरविण्याचा मक्ताहि मी उचलला नव्हता ! तुझे बार्शीला मामा आहेत हें तरी मला परवां-पर्यंत कुठें माहीत होतें ? आणि तसंच पाहिलं तर माझ्या भाषणांत तीन

चार वेळां तिचा उल्लेख आला होता. पण आपण स्मरणशक्तीचे मोठे धडच कीं नाहीं !

सुधीरः—( आश्चर्यानें ) असं ! मला बिल्कूल नाहीं आठवत असा उल्लेख आलेला.

प्रभाकरः—तुला काय आठवतं ? बार्शीला मामाकडे निघाला होतास हें तरी आठवतें कीं नाहीं ? दोनतीन वेळां माझ्या टेबलावरील लीलेची पत्रें पाहून मला कॉलेजच्या मैत्रिणीकडून पत्रं येत असल्याबद्दल माझी टिंगल करीत होतास तू ! आठवत नसेल तुला हे !

सुधीरः—Oh, I see ! त्या वेळेला आला होता खरा असा कांहींसा उल्लेख ! लक्षांत नाहीं आल. एकदम माझ्या ! बाकी खरं सांगू ? या पंढरपूरांत इतकी धीट मुलगी सांपडेल अस मला पूर्वी कुणी सांगूनहि खरं वाटलं नसतं ! तूं येण्यापूर्वी अर्धा तास किती मनमोकळेपणाने गप्पा मारीत होतो आम्ही ?

प्रभाकरः—फार गोड आणि मनमोकळा स्वभाव आहे तिचा ? नाहीं. आतां माझी बहीण म्हणून मी तिची स्तुती करतो असं नाहीं, पण I have found a real friend in her. तिच्या इतक्या मनमोकळेपणीं गप्पा मला कुणाजवळच मारतां येत नाहींत.

सुधीरः—( हंसत ) नाहीं तर आपल्या कॉलेजांत विनोदिनी असतातच कीं ! स्वतःला त्या कोण समजतात हे त्यांचे त्यांनाच माहीत ! त्या गोडबोलेची गंमत माहीत आहे का तुला ? ती स्वारी मिस आपटेकडे मत मागावयास गेली होती.

प्रभाकरः—Right-o ! आलं लक्षांत ? तूंच ती हकीगत सांगितलीस मला नाहीं ! गंमतीचं प्रकरण होतं ते अगदीं !

सुधीरः—गंमतीचं कसलं ? उद्धटपणा दिसला त्या पोरीचा त्यांत ! मत मागायला गेलेला तों सरळ नाहीं म्हणून सांगतां येत नाहीं ? Stop it, will you ? याचा अर्थ काय ? खरोखर बुळ्या होता तो गोडबोले. मी असतों तर चक्क written apology घेतली असती तिच्याकडून !

प्रभाकरः—पण खरंच! लीलेची एक गमत तुला सांगायची राहिलीच! लीलेची इतकी स्तुति करतोस ना तूं—पण तिलाहि नाकारणारा एक हरीचा लाल निघालाच!

सुधीरः—( आश्चर्याने ) खरंच? खूपच पागल असली पाहिजे स्वारी!

प्रभाकरः—अगदीं तुझ्यासारखीच! रागावूं नकोस! माझ्या म्हणण्याचा अर्थ इतकाच कीं त्याने तिला न पाहतांच नाकारले होते.

सुधीरः—म्हणजे? मला नाहीं तुझ्या बोलण्याचा नीटसा अर्थ कळला.

प्रभाकरः—साधा अर्थ आहे अगदीं! असाच तुझ्यासारखा त्यानें लीलेविषयीं पूर्वग्रह दूषित करून घेतला होता. आणि कळवलं कीं या पोरीशीं मला लग्न करतां येत नाहीं म्हणून.

सुधीरः—( उठून ) प्रभाकर, मला हे शालजोडींतले आहेर दिसताहेत!

प्रभाकरः—( शांतपणे मध्येंच ) मुळींच नाहीं. घडलेली हकीगत सांगतों आहे, रागावूं नकोस; खालीं बैस आणि पुढील हकीगत नीट ऐक. असा मध्येच एकदम त्रागा करू नकोस. ( सुधीर मुकाटयानं खुर्चीवर बसतो. ) पुढे गमत अशी झाली कीं लीला आपल्या एका मैत्रिणीला सहज सध्याकाळीं भेटायला गेली होती. आणि त्यांच्याचकडे हे गृहस्थ पाहुणे म्हणून आले होते. तिथेच दोघांची ओळख वगैरे झाली आणि गप्पाहि पण झाल्या बऱ्याचशाः—

सुधीर—आतुरतेनें बरं मग?

प्रभाकरः—मग काय? लीलेला पाहिल्याबरोबर त्याच्या तिच्याविषयींच्या कल्पना पार डळमळल्या, आणि जे गृहस्थ तिला पाहण्याला सुद्धां तयार नव्हते, ते तिच्याशीं लग्न करायला तयार झाले.

सुधीरः—( पेपरवेट पुन्हां उचलून त्याच्याशीं खेळत ) अस्सं? छान! अभिनंदन केलें पाहिजे मला लीलाताईचं त्याबद्दल!

प्रभाकरः—पण गंमत तर यापुढेंच आहे.

सुधीरः—( आश्चर्यानें ) आणखी कसली गम्मत?

प्रभाकरः—आतां लीलेला या गृहस्थाशीं लग्न करावें कीं नाहीं हा प्रश्न पडलाय!

सुधीर:—तो कां ?

प्रभाकर:—ज्या गृहस्थाने पूर्वी आपणाला न पाहतां नाकारून अपमान केला, त्या गृहस्थाशीं लग्न करणें कितपत न्याय्य ठरेल हेच तिला समजेनासें झालें आहे.

सुधीर:—इतका अवघड नाहीं हा प्रश्न ! पूर्वीच्या त्याच्या कांहीं Preconceived notions पसंतीच्या आड आल्या असतील त्याबद्दल त्यांना दोष देतां येणार नाहीं इतकासा ! त्या जर आतां पूर्णपणें नाहींशा झाल्या असल्या तर मग हा प्रश्न येतोच कुठें ?

प्रभाकर:—पण तिचं म्हणणं असं कीं त्यांनीं त्या Notions पूर्वीच दूर करण्याचा प्रयत्न कां करूं नये ? सबळ आधार नसतांना उगीचच एखाद्याविषयीं गैरसमज करून घेणे गैरच नाहीं कां ?

सुधीर:—कबूल आहे हा मुद्दा मला !, त्यांनीं आपल्या समजुती कितपत साधार आहेत हे प्रत्यक्षच पहायला पाहिजे होतं ! पण क्षुल्लक बाब आहे ही!

प्रभाकर:—पण काय रे सुधा—तुझ्या बाबतींत असंच नाहीं कां सार ? Excuse हं ! पण तूं आपल्या समजुती कितपत साधार आहेत हें प्रत्यक्षच पहायला काय हरकत होती ?

सुधीर:—( हंसत ) शेवटीं तूं माझ्यावरच घसरलास हंऽ ! कबूल करतो ती चूक माझी ! झालं तुझं समाधान ?

प्रभाकर:—नुसती चूक कबूल करून माझं समाधान होईल ही तुझी समजूत चुकीची आहे. चूक कबूल करतोस--तर ती सुधारण्याचा प्रयत्नही त्याबरोबरच नको कां करायला ?

सुधीर:—काय करूं मग मी चूक सुधारण्याकरितां ?

प्रभाकर:—मी सांगेन तसं ऐकायला तयार आहेस तूं ? मग इंदू कुळकर्णीला पाहण्याचा सल्ला मी तुला देईन. अनायासें पंढरपूरला आलाच आहेस तूं ?

सुधीर:—( मध्येंच ) माफ कर बुवा ! तो सोडून दुसरा कोणताही उपाय सुचव ना ?

प्रभाकर:—कां ? हा उपाय कां नको ? खरं म्हणजे बेजबाबदार उत्तर

देऊन तूं त्यांना. दुखावलं आहेस. It is the only remedy to heal the wound.

सुधीरः— पण मुलगी एकदां नाकारल्यावर—

प्रभाकरः—मी तुला कुठें तिच्याशीं लग्न करायला सांगतो आहे ? तुला ती पसंत नसली तर प्रश्नच उरत नाहीं. पण तुझी नापसंती नक्की करण्या-पूर्वी तिला एक वेळ पाहण्यास काय हरकत आहे ? You must do her full justice.

सुधीरः—खरं सांगूं तुला प्रभा, एकदां मुलगी स्पष्टपणे नाकारल्यावर पुन्हां तिलाच पहायला जाण्याचा धीर होत नाहीं मला ! माझ्यांत मानसिक धैर्याचा अभाव आहे म्हण किंवा कांहीं म्हण, पण एक प्रकारची भीति वाटते मनाला !

प्रभाकरः—आपल्या हातून चूक झाली असली तर सुधारायला नको का ती ? मानसिक धैर्याचा प्रश्न येतोच कुठें इथें ? तें कांहीं नाहीं—तुला त्या कुलकर्ण्यांकडे आलं पाहिजे. आला नाहींस तर ओढून नेईन तुला !

सुधीरः—पण...

प्रभाकरः—कांहीं ऐकणार नाहीं तुझं आतां! माझी न् कुलकर्ण्यांची चांगली ओळख आहे. त्यांना मी समजून सांगेन सगळ ! काय ? ठरलं ना मग ?

सुधीरः—( हंसत ) तू म्हणतोच आहेस आतां ! तुझ्यापुढं अपील आहे कां कांहीं ? ( खालून ' प्रभाकर ' अशी आरोळी ऐकू येते )

प्रभाकरः—( खिडकीशी जात ) ओऽऽ ! आलोंच ! काय काम आहे कुणास ठाऊक ? ( सुधीरकडे वळून ) एक मिनिट हंऽ ! ( पडदा बाजूला करून बाहेर जातो. पण ताबडतोब right about turn करीतच आंत उडी मारून सुधीरकडे येतो. )

प्रभाकरः—( एकदम हात आपल्या हातांत घेऊन जोरांत हालवीत ) Shake Man ( सुधीर आश्चर्याने प्रभाकराकडे पाहतो. प्रभाकर हंसतो ) अरे इंदु कुलकर्णी आली आहे खालीं.आतांच ओळख करून देतों दोघांची ? काय सुरेख संधि आली आहे, नाहीं ?

सुधीरः—( गोंधळून ) पण आत्तां ?

प्रभाकरः—हो त्याला काय झालं ? गंमत होईल ही एक ! आलोंच ह आतां–केसबिस नीट कर तोंपर्यंत ! ( हंसत पडदा बाजुला करून खालीं जातो. ) ( सुधीर गोंधळलेल्या मुद्रेने क्षणभर आरशायमोर उभा राहून आपलें लहान प्रतिबिंब पहातो. व परत खुर्चीवर बसून शून्य मनाने टेबलावरील खडूचे लहान तुकडे करूं लागतो. कांहीं वेळाने तुकडे परत टेबलावर फेंकून खिशांतील हातरुमालाने कपाळावरील घाम पुसतो, व मांडीवर रुमाल ठेऊन त्याची नीट घडी करण्याचा प्रयत्न करतो. जिन्यावर पावलांचा आवाज व कांहीं शब्द ऐकूं येतात. सुधीरची अस्वस्थता जास्तच वाढते. पुन्हां एकदां रुमालाचा बोळा करून कपाळावरून फिरवितो. प्रभाकर लीलेला जवळ जवळ ओढीतच आंत आणतो. )

प्रभाकरः—( लीलेला ओढून टेबलापाशीं आणीत ) मिस्टर देशमूख ही लीला उर्फ इंदुमती कुळकर्णी, माझी मावसबहीण आणि आपण नाकार· लेली मुलगी ( सुधीर भाषण चालूं असतांनाच एकदम आश्चर्यानें खुर्चीवरून उठतो ) आणि लीलाताई आपल्याला ज्यांनीं नाकारले ते हे देशमूख, कीं ज्यांच्या फोटोचा आपण पांचसहा दिवस अभ्यास चालवला होता—

लीलाः—( मधेच त्याच्या हातांतून आपला हात हिसकावून घेत ) दादा, मी आतां अण्णांना सांगेन हं सारं ! खोटारडा कुठला !

सुधीरः—( अद्याप आश्चर्यांतच ) प्रभा, हा काय विनोद आहे ! ह्या तुझ्या मावस भगिनी ना ?

प्रभाकरः—( हंसत ) हो, आणि इंदुमती कुलकर्णी पण हीच !

सुधीरः—म्हणजे मघा तूं सांगितलेले गृहस्थ- -

प्रभाकरः—( मोठ्यानें हंसत ) अरे तूंच तो ! वेळेत थोडी अदला· बदल करून सांगितली हकीगत—येवढंच ! बाकी येवढं तुझ्या लक्षांत न येण्याइतका बिनडोक्याचा तूं असशील असं मला वाटलं नव्हत. ( हंसतो ) मग काय ? पसंत आहे ना तुला ही पढरधुरी मुलगी ?

लीलाः—( मध्येच ओरडून ) दादा–(प्रभाकर हंसतो. लीला हळूंच सुधीरकडे पहाते. तो हंसत तिच्याकडे पहात असतो, तिची नजर आपो- आपच खालीं येते. )

प्रभाकरः——पण सुधीर—शेवटी नाकारलेलीच मुलगी ना ?

( लीला आणि सुधीर हळूच एकमेकाकडे पाहून हंसतात. त्या दोघां-कडे पाहून प्रभाकर जास्तच जोरात हंसतो. ) ( पडदा पडतो )

# निकाल : ४

माझें डोकें अगदीं सुन्न होऊन गेलें होते.

अशी विलक्षण कालवाकालव मनांत चालली होती ! आतांपर्यंत कधींच नापास नाहीं अन् या शेवटच्याच परीक्षेत......

छे ! अगदीं असह्य झाल मला हें !

शून्य मुद्रेनें ज्ञानप्रकाश घेऊन मी निकालवरून नजर फिरवली. माझे किती तरी मित्र पास झाले होते ! कांहींजण सेकंड क्लासमध्यें आले होते, अन् एकानें तर प्राईझ मिळविलें होतें ? ते सारेजण आज मजा करणार आणि मी......

अस्वस्थ मनानें मी ज्ञानप्रकाश फेंकून दिला, अन् कॅलेंडरकडे शून्य दृष्टीनें बघूं लागलों.

दादा, ताई, मावशी सारेजण किती आशेने आज निकाल पहातील ! आमच्या कॉलेजांतलें सुद्धां कित्येकजण Inter-Collegiate Tennis Champion चें नांव हुडकायला लागतील! पण......पण सारेजण निराशच होणार !

शेवटीं विचाराचा अतिरेक दुःसह होऊन मी इझीचेअरवरून उठलों व अस्वस्थपणें खोलींत फेऱ्या घालूं लागलों ! इतक्यात......

दरवाजा उघडला गेला !

" ए भाऊ " शकू आंत येऊन म्हणाली, " चल ना जेवायला ? सगळींजण खोळंबली आहेत तुझ्याकरतां ! अन् भाऊ, " ती हलकेंच म्हणाली,

" आज चांगली खरडपट्टी काढताहेत बाबा तुझी नापास झाल्याबद्दल ! टेनिस खेळायला पाहिजे नाहीं कां ? "

" शके " मी रागानें ओरडून म्हणालों, " जा पाहूं खालीं ! जेवायचं नाहीं मला म्हणून सांग जा ! "

" म्हणजे ? " शकू आश्चर्यानें म्हणाली, " प्रायोपवेशन करणार आहेस कीं काय नापास झाल्याबद्दल ? मग बाई चांगलीच गंमत होईल ! ज्ञानप्रकाश, सकाळ...... "

" वात्रटपणा पुरे हं शकू ! " मी रागानें मधेच ओरडलों, " खालीं जाऊन निरोप सांग तूं आपला ! "

मी चांगलाच रागावलेला पाहून शकूने हळूंच काढता पाय घेतला. पण जातांना " बरं हंऽ ! बाबांनांच पाठवते वरतीं ! " म्हणून पुटपुटायला चुकली नाहीं.

मी एकदम इझिचेअरवर अंग टाकून दिले ! ही बहिण म्हणे ! मागच्या वर्षीं नवरा सेकंड एल्.एल्.बी. ची परीक्षा नापास झाला होता तर दिवस-भर चिमणीएवढें—तोंड करून बसली होती ! अन् आतां मी तिचा सख्खा भाऊ, नापास झालोय तर कांहींच वाटत नाहीं हिला ! काय जग आहे; म्हणून जगाविषयीं विचार करणार तों बाबा हंसत हंसतच आंत आले. बाबाना हंसतांना पाहून माझा संताप जास्तच वाढला ! या सर्वांना मी नापास झाल्याबद्दल आनंद होतोय कीं काय ?

" काय वेडा आहेस रे तू ? " बाबा हसत म्हणाले, "चल जेवायला ! नापास झालं म्हणून कुणी जेवण सोडीत असतात कीं काय ? ऊठ ! वेडा कुठला ! "

" पण मला भूक नाहीं म्हणून सांगितलं ना ? ' मी जरा तिरसटपणें उत्तर दिलें.

" भूक नसायला काय झालं ! " बाबांनीं विचारलें, " चल चल जेवायला ! अरे झालास तर झालास पण नापास ! आम्हीं नापास झालों होतोच कीं ! " असे म्हणून बाबा हसू लागले.

" पण मला आता आग्रह करूं नका बाबा ! मला बिलकूल भूक नाहीं. ! "

मीं मघाच्याच आवाजांत उत्तर दिलें. माझा निश्चय पाहून बाबाही 'काय हट्टी मुलं तरी !' वगैरे पुटपुटत निघून गेले.

पंधरा मिनिटें गेलीं, वीस गेलीं, त्याच कॅलेंडरकडे पहात मी पडलो होतो. किती उत्सुकतेनें मी या दिवसाची वाट पहात होतो ! पास होईन असा मला अगदीं आत्मविश्वास वाटत होता. पण आज तो आत्मविश्वास...ज्ञान प्रकाशनें त्याच्या अगदीं चिंध्या उडविल्या होत्या. पु मी शून्यतेने ज्ञानप्रकाश उचलून रिझल्टवरून नजर फिरवूं लागलो.

माझ्या शेजारच्या खोलींतला बावळट मुलगा सेकंड क्लासमध्यें पास झाला होता अन् आश्चर्य हें की माझ्या Tennis-partner चं नांव तिसऱ्या वर्गांत झळकत होतें ! एक नंबरचा उडाणटप्पू मुलगा तो ! जेव्हां पहावं तेव्हां त्याच्या खोलीला कुलुप असायच ! असा मुलगा पास व्हावा अन मी......

पुन्हां गाडी पहिल्या रुळावर आली. ज्ञानप्रकाश फेंकला गेला अन् मी ceiling कडे उगीचच टक लावली.

कांहीं कांहीं वेळां फार विचार करून मन इतकं बधिर होऊन जातं कीं कांहीं काळ त्याला आपल्या परिस्थितीचा अजीबात विसर पडतो ! तशा point ला माझी मनःस्थिति आली होती ! क्षणभर मी नापास झालो याचाच मला विसर पडला. नुसत्या शून्य दृष्टीने वरच्या आढ्याकडे बघत होतों. हात गारठले म्हणजे जसे ते बधिर होतात ना, त्याप्रमाणे माझ्या मनाची स्थिति झाली होती. अशा स्थितींत मी किती वेळ पडलो असतो कुणास ठाऊक ? पण एकदम दरवाजाच्या आवाजानें मी शुद्धीवर आलो. मी त्रासिक मुद्रेनेच तिकडे नजर वळविली.

राणीसरकार ताट घेऊन आंत येत होत्या !

" जेवायचं नाहीं म्हणून निरोप पाठवला होता ना खालीं ? " मा तिच्याकडे रागाने पहात म्हटले.

" कळला मला तो ! " टेबलावर ताट ठेवीत शांतपणाने ती म्हणाली " म्हणूनच ताट घेऊन वरती आलें मी ! "

" म्हणजे ? " मी रागाने ओरडलो, ' निरोप पाठवतांना मी शुद्धी वर नव्हतों असं तुझं म्हणण आहे कीं काय ? "

" असं रागवायचं नाहीं गडे ! " ती जवळ येत म्हणाली; " आज सकाळपासून चहाशिवाय कांहीं घ्यायचं झालं नाहीं ! मग भूक नाहीं हे कुणाला बरं खरं वाटेल ! घ्यायचं ना थोडं खाऊन ? "

" बरं बरं ! शहाणपणा पुरे आपला ! " मी तिची विनंती ऐकण्याच्या मनःस्थितींत नव्हतो. " खालीं जा ताट घेऊन ! अगोदर माझं डोकं तापलं आहे, त्यांत तूं पुन्हां भर घालू नकोस ! "

" असं काय बरं ? माझं नाहीं कां एवढं ऐकायचं ? " माझ्या शेजारी बसत ती म्हणाली; " इतकं काय गडे नापास झाल्याचं मनाला लावून घ्यायचं ? नाहीं तरी—October चा आणखी एक चान्स आहेच कीं.'

बायको अक्कल शिकवायला लागलेली पाहून माझ्या संतापांत चांगलीच भर पडली. मॅट्रिक पास होऊन दहा बारा दिवस झाले नाहींत तो मला शहाणपणा शिकवते ! म्हणे October चा चान्स नाहीं का ?

"जरा आतां तुझी अक्कल आंवरती घेशील कां ?" मी राग गिळण्याचा प्रयत्न करीत म्हणालो, "खालीं जायला सांगितलं म्हणजे मुकाट्यानें खालीं जावं ! जास्त बडबड करून माझं माथं उगीच भडकवूं नकोस ! "

" इतकं रागवायला काय झालं गडे ? " ती माझ्याकडे पहात म्हणाली, " पतिपत्नींनं जर ऐन वेळीं एकमेकाचं सांत्वन करावयाचं नाहीं तर करायचं कुणी ? पाहिल्या वर्षी मी मॅट्रिक नापास झालें, तेव्हां आपणच नाही कां माझं सांत्वन केलं ? अन् आपणच त्यावेळीं म्हणाला होता ना कीं पतिपत्नी हीं संसाराचीं दोन चाकं आहेत, अन् त्यांच्यांत Harmony पाहिजे म्हणून ! अन् आत्तां थोडं कांहीं सांत्वनपर बोललें कीं रागवायचं होतं ! म्हणजे आम्हां बायकांना कांहीं मनच नाहीं अशीच आपली समजूत ना ? "

बोलतां बोलतां तिनें मान फिरवून डोळ्याला पदर लावला. माझा सर्व राग एकदम विरघळून गेला. मी उठून बसलों.

" मालू " मी तिच्या खांद्यावर हात ठेवून म्हटलें, " रागावलीस का माझ्या बोलण्यानं. पण हें बघ, मी आज किती विचित्र मनःस्थितींत आहे हें बघतेसच ना तू ! मग माझे एवढे तेवढे शब्द उगीच कां मनाला

लावून घेतेस ! कधीं जन्मांत नाहीं तें आज नापास झालो हं ऽ ऽ ! ”
मी दीर्घ निश्वास सोडला.

“ इश्श ! एवढेंच का ? मी सांगू ... ... ... ” पण एकदम मधेच तिने जीभ चावली, “ पण गडे, इतक काय मनाला लावून घ्यायचं ते ! किती तरी लोक नापास झाले असतील ? आपले ते कुलकर्णी नाहीं कां सातव्यांदा बी. ए. ला नापास झाले ? आणि नापास होणं हा अपराध कां आहे ? इतक मनाला नका गडे लावून घेऊं ! ”

“ तुला कल्पना नाहीं माझ्या मनांत काय कालवाकालव चालली आहे तीं ! परदुःख शीतळ म्हणतात तेच खरें ! ”

“म्हणजे मी परकीच ना ?” मालती माझ्याकडे रोखून पहात म्हणाली. “ म्हणजे आपण नापास झाल्य मुळे मला कांहींच वाटत नाहीं अस आपलं म्हणणं, खरं ना ? ”

“ तस नव्हे ... ... ” मला माझी चूक कळून आली.

“ तसं नव्हे तर कस ? ” ती मधेंच म्हणाली, “ शेवटीं पुरुष ते पुरुषच ह ऽ ! पण आतां जेऊन घ्याव गडे ? ”

“ नको मला आग्रह करूस ! ” मी म्हटलें, “ अगदीं इच्छा नाहीं माझी ! वासनाच नाहीं बिलकुल अन्नावर ! ”

“ अस काय ? ” मालतीने माझ्यावर डोळे स्थिर केले, “ माझ्याकरता नाहीं का कांहीं खायचं ? माझ्याकरता ? ”

अगदीं उठणच भाग पडलं ! “ भारीच हे आहेस बुवा ” म्हणून पुटपुटत कस तरी ताट संपवलं, अन् ताटांतच हात धुतले.

“ मालती ” कॉटवर पडत मीं तिला हांक मारली, “ बाम् चोळतेस कां जरा डोक्याला ? भारीच डोकं दुखायला लागलंय् ! ”

“ अगबाई, खरच ? ” तिने घाबरून माझ्या डोक्यावर हात ठेवला, “ बाई ऽ ! किती डोकं तापलं आहे ! थंडी वाजतेय् कां ! नाहीं ना ? बर ह ऽ ! मी ताट खालीं ठेवून बामूची बाटली घेऊन येते. आलेच मी ! ”

पांच मिनिटांत बामूची बाटली घेऊन ती वर आली, अन् उशाशीं बसून कपाळाला हळूं हळू बाम् चोळू लागली.

" गडे, माझ एक ऐकणं होईल कां ? " बाम् चोळता चोळतां ती म्हणाली, " आता परीक्षेविषयीं काहीं विचार करायचा नाहीं. अगदीं स्वस्थ झोंप घ्यायची ! पास झालो असंच घटकाभर समजून झोंप घ्यायची हं ऽ ! "

अन् थोड्याच वेळांत मला झोप लागली.

चार तास झोप घेतली मी ! पण झोपेतसुद्धा किती भयंकर स्वप्ने पडत होतीं ! एका वेळेला काका, दादा, सारेजण येऊन नापास झाल्याबद्दल माझी निर्भर्त्सना करीत होते तर एकेवेळीं पास झालेले सारे मित्र स्वप्नात येऊन मला हसत होते. मी जागा झालो त्यावेळीं माझे सारे अंग घामानें डबडबले होते. मी घड्याळाकडे पाहिले ! पावणेपाच वाजले होते. कॉट्शेजारींच मालती इझीचेअरवर रत्नाकर वाचीत बसली होती. मला अशा भयंकर मनस्थितींत झोप कशी लागली याचेच मला आश्चर्य वाटले. अन् त्याच भावनेने मी सगळीकडे पाहूं लागलो.

" उठायचं झालं वाटतं ? " मालती माझ्याकडे पहात हंसून म्हणाली, " आत्तांच मामजींनीं तुमची वाट पाहून चहा घेतला. वरतींच आणू आपला चहा कीं खालीं येता ?

" वरतींच आण बोवा ! " मी आळस देत उत्तर दिले. आज तरी खालीं जायच्या मनःस्थितींत मी नव्हतो. तांब्यातल्या पाण्याने तोंड धुतो न धुतो तोंच ट्रेमध्ये चहाचा कप अन् एका बशींत दोन पेढे घेऊन मालती वर आली.

पेढे ? मी आश्चर्यचकीत झाला. मीं नापास झालों म्हणून पेढे ? माझ्या रागानें पुन्हां डोके वर काढले.

" हे पेढे मीं नापास झालो म्हणून वाटतं ? " मी रागानें विचारिले, " आज झालंय काय तुम्हा सगळ्याना ? सगळ्याची मुद्रा कशी आनंदी दिसते आहे ! मी नापास झालो म्हणून कीं काय ? "

मालतीनें जरा हंसत घड्याळाकडे पाह्यलें! पांचला पांच मिनिटें कमी होतीं!

"अगोदर खायचें तरी!" ती हंसत म्हणाली, "मग सांगेन ना!"

"तुम्हां साऱ्यांचीं डोकीं आज फिरलीं आहेत वाटतं?" मी रागानं म्हणालो, "घेऊन जा तो चहा खालीं! मला कांहीं घ्यावयाची इच्छा नाहीं!"

पांच मिनिटे अगदीं स्तब्धतेंत गेलीं. मी टेबलावर बसून रागानें मालतीकडे पहात होतो. मालतीनें मात्र खालीं जमिनीवर लावलेली नजर वर केली नाहीं. पाचाचे ठोके ऐकतांच ती थोडी हंसली अन् शेजारचें कपाट उघडून आंतला Times, Chronicle आणि Free-press तिनें बाहेर काढला.

मी आश्चर्यचकींत झालो. आमच्याकडे फक्त ज्ञानप्रकाशच येत होता. हीं तिनें गोळा केलीं कोठून? अन् करणार आहे काय आतां? मला कांहीं समजेना!

"असं रागवायचं नाहीं गडे!" ती जवळ येत म्हणाली, "हें पाह्यलंत का फ्री प्रेसमध्ये काय आहे? Number six hundred and twenty आहे कीं नाहीं? हा क्रॉनिकल पहा, आहे इथे आपलें नांव! तसच हा Times!"

मी अगदीं आश्चर्यानें पाहिलें. खरोखरच माझं नांव तिसऱ्या वर्गांत होतं. आनंदातिशयानं अगदीं बेहोष झालों मी! मग मी एकंदरींत पास झालो तर! ओहो! काय गंमत आहे! मनावरचं एक मोठं दडपण निघाल्यासारखं झालं!

"मग ज्ञानप्रकाशामध्यें कस नाहीं नांव?" माझा आनंदाश्चर्याचा भर अद्याप ओसरला नव्हता. क्षणभर मी स्वप्नांतच हें सारें अनुभवतो आहे कीं काय असाच मला भास झाला.

"मुद्रणचूक! चुकून गडबडींत होत असं कधीं कधीं! त्याला कोण

काय करणार ? " मालती हंसत म्हणाली, " उद्यां ज्ञानप्रकाशमध्यें चुकीची दुरुस्ती येईलही ! पण आता तरी चहा घ्यायचा ना ? कां नेऊं खालीं ?"

" अन् तुला हें पहिल्यापासून माहिती होतं ? " मी आनदाच्या भरांत चहाचा कप एकदम तोंडाला लावला, " मग मला पहिल्यांदाच कां नाहीं सांगितलस ? पांच तास अगदीं असह्य मनोवेदना सहन करायला लावल्यास मला तूं ! कांहींच नाहीं वाटलं तुला ? "

" क्षमा करायची मला त्याबद्दल ! " मालती म्हणाली, " पण हें सारं वन्संचं कारस्थान ! त्यांनीं प्रथम ही चूक हुडकवून काढली, अन् मुद्दाम हें कारस्थान केलं परवां आम्हांला चुकवून नाटकाला जायचं झालं ना, त्याबद्दल त्यांना सूड उगवायचा होता. मामजी अन् सासूबाई पण कटांत सामील होत्या. "

एकदम मला सगळ्यांच्या आनंदी वृत्तीचं कारण कळून आलं ! पण आईला हें सगळं माहीत असून तिच्या मनांत इतका वेळ राह्यलं कसं हें ? मोठंच कोडे पडले मला हे !

" अन् आईला हे सारं माहीत असून ती एकदांही वर आली नाहीं ?" मी आश्चर्यानें विचारले.

" अगबाई, सासूबाईंना आवरायला वन्संना काय श्रम पडले ! " मालती म्हणाली. " वर येऊंच देईनात त्या त्याना मुळीं ! अन् माझ्याकडून सुद्धां वचन घेतलं पांच वाजेपर्यंत कांहीं सांगणार नाहीं म्हणून ! तरी मधे आपली मनःस्थिति पाहून अगदीं सांगायाच्या बेताला आलें होतें मी !"

"अस्सं काय ! काय वात्रट पोर आहे !" मी हसत म्हणालों, "शके ए ... शकुंतला SS ... "

" कायरे भाऊ ? " शेजारच्या खोलींत बसलेली शकू हंसत माझ्या खोलींत आली.

" कार्टे ... " मी तिचा कान धरून टेबलाजवळ आणलें, " मॅट्रिक होऊन दहा बारा दिवस झाले नाहींत तों वडील भावाची चेष्टा करतेस ? अं: ! थांब ! तुझ्या नवरोजींना कळवलं पाहिजे हें सारं ! "

" हें रे काय भाऊ ! शकू कान सोडवायचा प्रयत्न करीत म्हणाली.

" केवढयाने कान धरतोस ? सोड ना ? आई ऽ एं आई गऽ, भाऊ बघ ग माझे कान लांब करतोय् ! "

" हं ! फार आंखूड आहेत नाहींतरी ! " मी हंसत म्हटले.

" आपणासारखे करिती तत्काळ ? " असे पुटपुटत ती दूर पळाली, " केवढयाने ओढलास रे कान ? अग आई ग ऽ किती दुखूं लागलाय्!"

" काय झालं ग ओरडायला ? " शकूच्या आरोळीनें आई वर आली, " भाऊनें काढली असेल कांहीं खोडी ! "

" ए आई, हा बघ ग माझा कान ओढतो ! " शकूनें आपली तक्रार दाखल केली.

" ए आई, माझं ऐक तूं ! हिन माझा निकाल असा चोरून ठेवावा हें शोभतं कां हिला ? " मीही आपला अर्ज नमूद केला. " बरं आहे बच्चंमजी ! एल् एल्. बी चा निकाल लागायचाय् म्हटल अद्यापि ! "

" काय भांडता रे अशीं लहान मुलासारखीं ? पण आतां कळलं ना पास झाल्याचें ? " आईने माझ्या पाठीवरून हात फिरवीत म्हटले. " असाच पास हो हऽ पुढे ! "

" पण आई, " मी माझी तक्रार मागें घ्यायला तयार नव्हतों. " समज मी नापास झालो अस समजून आत्महत्या केली असती तर ? काय ग शकू ? अं ऽ "

" हो हो ! तोंड पहा आत्महत्या करणाराचं ! " शकू मानेला झटका देत म्हणाली.

" खोटं नाहीं आई, " मी आईला ड्रॉवरमधली एक पुडी उलगडून दाखवत म्हटले, " हे बघ, मीं विष सुद्धां पैदा केलं होतं ! " –

" अगबाई ! " आईनें घाबरून म्हटले. तिला हें सारेंच खरें वाटलें ! मालती अन् शकू हंसूं लागल्या !

" एहेरे ! कुणाला बनवतोस ? " शकू मधेंच म्हणाली, " परवां आणलेल्या निळ्या शाईची पूड त्यांत आहे हें मला माहीत नाहीं वाटतं ? वारे वा ! तूं काय आत्महत्या करणार, अन् वहिनी काय तुला करूं देणार? वहिनीचा सारखा पहारा होता भाऊसाहेब तुमच्यावर ! "

अगदीं सपशेल पराजय झाला माझा ! त्या भरांत मी बशींतला एक पेढा उचलून तिच्याकडे फेकला. पण तिनें तो बरोबर झेलून तोंडांत टाकल्याबरोबर मात्र माझं तोंड बघण्यासारखं झालं ! तिघींही जोरांत हसूं लागल्या.

" ए आई, आतां पुन्हां चहा कर ना ! " मी म्हटलें, " कसला काढा हिनें आणला होता मघाशीं कुणास ठाऊक ! "

" काढा होता काय तो ? " कृत्रिम रागाचा एक कटाक्ष माझ्याकडे फेकीत ती म्हणाली, " बरं हंऽ ! "

" ए भाऊ, " शकू म्हणाली, " चल ना आतां खालीं ? कां बसायचंय् अद्याप खोलींत ? मी तुझ्याकरतां काय गंमत केली आहे ? "

" काय केली आहे ? " मी विचारलें.

" अंह ! खालीं चल म्हणजे समजेल ! सांगूं नकोस ग वहिनी ! " शकू हंसत म्हणाली.

" पण काय केलय् ते तर सांगशील ? काय केलंय् ग आई, " मी आईकडे वळलों.

" अरे ते ...... " पण आईला मधेंच शकूनें अडवलें.

" अंह ! आई, सांगायचं नाहीं ! खालीं येऊं दे त्याला. Surprise Feast आहे ही ! हं चला लवकर ! वहिनी, आई, चला खालीं ! " तिघेंही खालीं निघालीं.

" थांब हंऽ ! मी आता आलोंच ! व्हा पुढे तुम्ही ! " मी टेबलाकडे वळलो. " हो पण शकू, Surprise Feast म्हणजे ऑम्लेट, कटलेट वगैरेची तर नाहीं ना ? "

" इश्श ! " जातां जातां शकूनें नाक मुरडीत म्हटलें, " किती घाण बोलतोस रे भाऊ ! "

मी मुकाट्यानें हंसत आरशांत पाहून कंगव्यानें केंस सारखे केले व जिना उतरूं लागलों.

# अंजन

५

“ गुड ईव्हिनिंग मिसेस गोखले.” मीं मुद्दाम निराळा स्वर काढून अनपेक्षितपणे दरवाजांतून सलामी ठोकली.

लीला आरामखुर्चीवर पुस्तक वाचीत पडली होती. माझ्या आवाजानें चमकून एकदम तिने मागे पाहिले.

“ इश्श ! तुम्ही होय ? म्हटल येवढं दिवाणखान्यांत कोण शिरल ! ” लीला हंसत टेबलावर पुस्तक ठेवीत उठली. “ अन् मला घाबरवण्याकरितां मुद्दाम निराळा स्वर काढला होता ना ? कळलं मला ते ! ”

“ घाबरलीस ना पण ! ” मीं हॅट टेबलावर फेकीत बुटांचे बंद सोडीत म्हटलें, “ मला नाहींतरी तेवढच पाहिजे होतं ! ”

“ पण आज साहेबांनीं लवकर सोडलं ? ” लीला घड्याळाकडे पहात म्हणाली, एक तास लवकर आलांत तुम्ही, नाहीं कां ? एवढा कडक शिस्तीचा साहेब .... ”

“ अग, तोच गेला आज साडेतीन वाजतां निघून ! ” मी हंसत म्हटले, “ मग तो गेल्यावर आम्ही कशाला रहातोय ? टाकल राहिलेलं काम कारकुनाच्या गळ्यांत आणि साहेबानंतर अर्ध्या तासांत आमचं पाऊल ऑफिसबाहेर ! ”

“ अस्सं ! एकंदरींत आज अर्धी सुटी तर तुम्हांला ? बिचारा कारकून ! त्यांना मात्र मधल्यामधें त्रास ! ” लीला कारकुनाविषयीं सहानुभूति दाखवीत म्हणाली, “ साहेबाची झाली चैन ! ”

" अरे वा, कारकुनांचा कळवळा आलाय् पण अगदीं ! जा ना मग त्याचं काम करूं लागायला ! घरीं बसल्याबसल्या फुकटची सहानुभूति दाखवायला काय जातं ! ए, पण चाललीस कुठं ? " लीला आंत जाऊं लागलेली पहातांच मीं म्हटले, " बैस ना इथच गप्पा मारीत थोडी ! कधीं नाहीं ते लवकर आलोय आज, आणि .... "

" पण चहा ? " लीला हसत म्हणाली, " थकला भागला जीव कामाचा बोजा कारकुनावर टाकून आलाय ! शीण घालवायला उत्तेजक पेय नको का कांहीं तरी ? "

" अग, पण थोडया वेळानं केलास चहा तरी चालेल ! " मी म्हटलें, " तुझी म्हणजे सारीच गडबड ! "

" पण तुम्हीच कपडे बदलून स्वयंपाकघरांत या ना गडे! लीला हंसत दरवाजांत उभी राहून म्हणाली, " म्हणजे मग चहा करतां करतां गप्पा मारूं ! अऽ ! "

" तूं म्हणजे अश्शी आहेस ! नेहमीं आपलं तेवढं खरं करायला बघतेस ! " मीं किंचित् हसत म्हटले, " काय करूं, मला तुझ्यावर रागावतां येत नाहीं; नाहीं तर..."

" हो ! जसं कांहीं खरच वाटेल कुणाला हं ऽ ! " लीला हंसत म्हणाली, " परवां इब्सेनचं ते नाटक वाचायला सांगितलेलं वाचून झालं नाहीं तेव्हां अगदीं प्रेमळपणानच बोललात, नाहीं ! अन् म्हणे मला रागावतां येत नाहीं ! " असे म्हणत मानेला एक हिसका देत लीला आंत गेली.

मी आपल्याशींच गाणें गुणगुणत कपडे बदलूं लागलों. साहेबाचा ब्राह्मण झाल्यावर स्वयंपाकघरात प्रवेश करून लीलेने मांडलेल्या पाटावर अधिष्ठित झालों.

" खरंच, मग मी सांगितलेलं गॅल्सवर्दीचं ' दी मॉब ' नाटक वाचलंस कां ! नाहीं ना ! वाटलंच मला ! " मी जरा रुष्ट, आवाजांत म्हणालों. प्रत्येक वेळीं मी तिला एखादे पुस्तक वाचायला सांगावें व तिचे हेच ठराविक उत्तर यावें यामुळें मला चीड येई !

" मी काय करूं गडे ? " लीला स्वतःचे समर्थन करण्याचा प्रयत्न करूं लागली. " कुटलेली सुपारी संपल्यामुळे ती कुटण्यांत दुपारीं बराच वेळ गेला. नंतर दोनला पुस्तक वाचायला घेतल, पण दोन पानं वाचलीं तरी नीट कांहीं समजेना मला ! .... उलट झोंप मात्र आली. अडीच वाचतां कमलाबाई आल्या .... "

" पुरे पुरे ! सारं पुराण नको आहे मला ! " मी जरा त्रासानं म्हणालों, " खरं म्हणजे साऱ्या गॅल्सवर्दींच्या पुस्तकांत ते नाटक सुंदर आहे नी तुला झोंप आली तें वाचतां वाचतां ! छान अभिरुचि आहे तुझी ! काय समजलं नाहीं ग तुला त्यांत ? "

" पहिल्या साऱ्या पात्रांच्या भाषणांचा संदर्भच कळेना मला नीट ! " लीला म्हणाली, " लढाईविषयीं कांहींतरी चाललं होतं हे कळलं ! पण बरोबर कल्पना येईना नीट ! "

" जरा दोन पानं जास्त सहनशीलता दाखवली असतीस तर सारं कळलं असतं ! जमावाच्या चचलवृत्तीच फार सुंदर चित्र रंगवल आहे लेखकाने आणि मॉरचं पात्र तरी किती सुदर आहे ! पण तुला सांगून काय उपयोग म्हणा!"

" असंच ना शेवटीं ! " लीला माझ्याकडे पहात जरा विषादानें म्हणाली, " नी खरंच म्हणा ते ! मुली मॅट्रिक झाल्या तरी बावळटच ! "

" नाहीतर काय ग लीले ! " मी जरा त्राग्याने म्हणालों, प्रत्येक बाबतींत माझा हिरमोड करतेस तूं ! मला किती वाटत की, आपण निरनिराळ्या पुस्तकांवर वादविवाद करावेत. सध्याकाळीं हिंडायला जाव, चित्रपट पहावेत, थोडक्यात म्हणजे आयुष्य मजेत घालवाव ! पण तुझ सारंच-विचित्र ! सारं कांहीं घरांत ! गप्पा मारायच्या, बडबड करायची ती सारी घरांत ! चांगला चित्रपट आला कीं तुझं आपलं कांहींतरी खुसपट निघायचं ! परवां असंच सिनेमाला चल म्हटलं तर म्हणे मैत्रिणीकडे हळदी-कुंकवाला जायचय ! म्हणजे नवऱ्यापेक्षां मैत्रिणीची काळजी जास्त तुला ! "

" असं कसं ?" लीला जरा गोंधळली, " वेळेला माणसाच्या उपयोगी नको का पडायला ? आपल्या हळदीकुंकवाच्या वेळीं ती नाहीं का

मदत करायला आली ? आणि दररोज फिरण्याचं नू संध्याकाळच्या स्वयं-पाकाचं कसं जमायच सांगावं आपणच !"

" पण स्वयपाकाला बाई ठेवतो म्हटल ..." मी बोलू लागलो.

" मला नाहीं ना तें पसंत !" लीला मध्येंच मला अडवीत म्हणाली. " स्वयंपाकीण बाईनें केलेला कसला तरी स्वयपाक खायला घालायचा तर मग माझा उपयोग तरी काय ? आपण नोकरी करून जीवाला कष्ट करून घ्यायचे त्याचा आम्ही अशतः तरी भार उचलू नये कां ?"

"म्हणजे मोलकरीण समजतां कीं काय तुम्ही स्वतांला ?" मी विचारलें.

" समजा तुम्ही पाहिजे तर ! " लीला म्हणाली, " पण आम्ही स्वतांला गृहीणी समजतो. गृहिणी अन् मोलकरीण ..."

" बरं S ! पण दुपारीं फुरसतीच्या वेळेला पुस्तक वाचायला किंवा लेख लिह यला काय झालं ?" मी मध्येच विचारले.

" वाचतेंच ना मी हळूहळुं !" लीला म्हणाली, आतां मला येवढें श्रेष्ठ दर्जांचे ग्रंथकार लवकर समजत नाहीत, किवा लेख लिहिणं जमत नाहीं त्याला मी काय करूं ? आपण एम. ए आहांत, मी मॅट्रिक आहे हें विसरतां आपण प्रत्येक वेळीं !"

" माहीत आहे ! इच्छाच नसली म्हणजे हजार सबबी सुचतात ! पुरे पुरे ! नको सांगूस जास्त कांहीं आतां !" माझा आत्तांचा स्वरच असा होता कीं लीलेला पुढे कांहीं बोलणेंच शक्य नव्हते ! एक केंविलवाणी नजर तिने माझ्याकडे टाकली. पण रागाच्या भरांत मी लक्षच दिले नाहीं तिकडे ! मुकाट्याने पुढें आलेला शिरा व चहा पार केला व कोटटोपी घालून बाहेर पडलो.

पुष्कळदां असेच होई. तसें म्हटलें तर आमचे दोघांचेहि एकमेकांवर खूप प्रेम होतें. ! एखादे वेळीं संध्याकाळीं ऑफिसमधून घरीं येतांच लीला दिसली नाहीं तर कसें अगदीं चुकल्याचुकल्यासारखें होई ! ती माहेरीं पळाली म्हणजे तर काय विचारायलाच नको ! पण इतकें असून तिचे आणि माझे खटके खूप उडत ! कारण विशेष नाहीं. ! हेंच कीं, वाङ्मयाच्या वाचनाने—वेडानें म्हणा पाहिजे तर—माझी पत्नीविषयक मतें बरींच निराळीं

झाली होतीं व लीला तंतोतंत तशी नव्हती! मला किती वाटे कीं लीलेनें खूप चांगलीं चागलीं पुस्तके वाचावींत, त्या पुस्तकांवर माझ्याबरोबर चर्चा करावी, माझ्याबरोबर संध्याकाळीं फिरायला किंवा सिनेमाला यावे, रिकाम्यावेळीं सुंदर लेख किंवा लघुकथा लिहाव्यात, एक ना दोन! पण छे! लीलाचे सारेंच उलट! लीला पुस्तकं वाचायची, पण त्यापेक्षां शिवण्यांत व कशिदा काढण्यांतच तिचा खूप वेळ जायचा! संध्याकाळीं फिरायला जाण्याऐवजीं स्वताला स्वयपाकघरांत कोंडून घ्यायची तिला भारी हौस! फार चीड यायची मला त्याची! खूप रागावे मी, आणि चडफडे पण! पण लीलेचे अश्रूपूर्ण डोळे पाहिल्यावर मात्र माझा राग थडावे! माझा मित्र वसंत त्या त्या मानानें किती सुखी! पत्नी बी. ए. झालेली कवायित्री आणि पुन्हां स्त्रीसमाजांत पुढारलेली! मला अगदीं हेवा वाटे त्याचा! आणि त्या प्रकाशांत लीलाकडे पाहिले म्हणजें अगदीं सधिप्रकाशांत दिसे मला ती! मी किती वेळां तिच्या तोंडावर विमलवहिनींचे उदाहरण फेकले असेल! पण प्रत्येक वेळां ते ती हंसण्यावारी घालवूं लागली म्हणजे फार सताप येई तिचा!

एकदां असंतोषाचीं बिजें पेरलीं गेलीं म्हणजे खटका उडायला कितीहि क्षुल्लक कारण पुरेसे होतें! त्या दिवशीं सुद्धां असेंच झालें! दोन दिवसांनंतरची गोष्ट! अद्याप लीलेने मी दिलेले नाटक न वाचल्याने जरा रागांतच होतो मी! पण त्या दिवशीं एक सुंदर बालपट आल्यानें आज लीलेला घेऊन पहिला खेळ गांठावा या दृष्टीने मी अर्धा तास लवकरच आलो ऑफिसमधून! पण घरीं पाहातो तो काय? लीलेची स्टेशनवर जाण्याची तयारी! तिची कोणशी मैत्रीण नागपूरला जाणार असल्याने ती सुशीलाताई बरोबर स्टेशनवर जाणार होती. झालें! येवढेंच कारण! पण तेवढ्यानेंच माझें डोकें फिरून गेलें.

आणि त्या दिवशीं सतापाच्या भरांत मी नाहीं नाहीं तें तिला बोललों. आतांपर्यंतचा सारा राग त्या दिवशीं शब्दावाटे बाहेर पडत होता. बिचारी लीला! आपल्या जाण्याचें महत्त्व समजावून देण्याचा तिने प्रयत्न केला; पण संतापाच्या भरांत मी तिचे बोलणेंच ऐकून घ्यायला बिलकूल तयार

नव्हतो. लीला अगदीं कांहीं न बोलतां मुकाट्याने पायाच्या आंगठ्याकडे पहात टेबलाला टेकून उभी होती. मी रागांत असलो म्हणजे कांहीं उलट उत्तर द्यायचे नाहीं हा तिचा निश्चय ! येऊ पहाणारे अश्रू मोठ्या कष्टानें थोपवून पदराच्या टोकांशीं चाळा करीत ती उभी होती. माझा रागाचा पारा आणखी चढला असतां पण इतक्यांत सुशीलाबाईच्या मोटारीचे शिंग खालीं वाजले.

"सुशीलाबाईना यायचं कबूल केलंय् मी ! काय म्हणतील बरं त्या मी नाहीं आले तर ?" लीला माझ्याकडे पहात हलके म्हणाली, " जाऊ ना मी ? आपण दुसऱ्या खेळाला जाऊं."

"मी तुझा रस्ता आडवलाय का ? " मी रागाने म्हणालों; मी इतके बोललो तरी लीलेचा स्टेशनवर जाण्याचा हट्ट कायमच, हे पाहून माझ्या संतापांत जास्तच भर पडली, " तुला वाटेल तसं तू वागत जा. मला विचारायचं कारणच काय मुळीं ?"

पडत्या फळाची आज्ञा घेऊन लीला पदराच्या टोकाने डोळे साफ करीत चप्पल घालून बाहेर पडली. मीहि कोट टोपी खुर्चीवर फेकून तसाच पलंगावर पडून एक पुस्तक वाचण्याचा प्रयत्न करू लागलो !

तीन दिवस मी याच संतापांत होतो. एक अक्षरही बोललों नाहीं लीलेशीं मी या तीन दिवसांत ! लीलेने एक दोनदा माझ्याशीं बोलण्याचा निष्फळ प्रयत्न केला, स्टेशनवर कां जावे लागले याची कारणमीमांसा एका कागदावर लिहून ती चिठ्ठीही माझ्या टेबलावर तिने ठेवली, पण अंऽहंऽ ! या खेपेचा पारा बराच चढल्याने लीलेचा कोणताच उपाय चालेना.

हे असेच चालले असतें तर कदाचित चालत्या आनंदी संसाराला कायमची असंतोषाची खीळ बसली असती. संसाराच्या सुखाला पूर्णविराम मिळून सुखाच्या संसारानें कदाचित् कायमचीच आमच्याकडे पाठ फिरवली असती. पण तसें व्हायचें नव्हतें आणि म्हणूनच वसंतानें आपल्या पत्रांत आपल्या सुखाच्या संसाराची झांकली मूठ उघडून त्याबरोबर माझे पण डोळे उघडविले.

माझ्या डोळ्यांत अंजन घालणारें पत्र एक वाजतां माझी वाट पहात

ऑफिसच्या टेबलावर पडले होते. पाकिटावरचे हस्ताक्षर पाहातांच वसंताचे पत्र म्हणून मी ताबडतोब ओळखले व उत्सुकतेने पाकीट फोडून पत्र वाचण्यास आरंभ केला. पत्र असे होते—

प्रिय प्रभाकर, यांसः—

सप्रेम नमस्कार वि. वि. परवांच्या पत्रांत आपल्या पत्नीबद्दल कुरकूर करतांना मला सुशिक्षित पदवीधर पत्नी मिळाल्याबद्दल माझा हेवा केलास! खरें आहे एका अर्थी तुझे म्हणणे! नवरा एम. एससी. बायको बी. ए. शिवाय दोघाचाही प्रीतिविवाह झालेला, अशा स्थितींत आमचा संसार नंदनवनाप्रमाणे असेल असे लोकाना वाटल्यास नवल काय! लोक नेहमीं बाह्य परिस्थितीवरूनच आपली मते बनवींत असतात. पण प्रभा, आज सारे कांहीं तुला मनमोकळपणाने लिहायचें ठरविले आहे.यावरून तूंच पहा मी कितपत सुखी असेन ते!

आमचें लग्न झाले! सहा महिने कसे गेले हे कळले सुद्धां नाहीं. लग्न झाल्यापासून तेवढा काळ खरोखरच अत्यंत सुखांत गेला. पण सहा महिन्यानंतर आम्ही या नंदनवनातून पृथ्वीवर येऊन आजूबाजूला पाहूं लागलो. आणि याच वेळेला दोघांच्या अभिरुचींमध्ये कल्पनातीत तफावत असल्याचें मला दिसून आलें. मी शास्त्रीय विषयाचा माणूस व ती वाङ्मयप्रेमी. वाचनाचा आणि लेखनाचा तिला भयंकर नाद! मी काय म्हणतो लक्षांत येईल तुझ्या. अर्थात् मला वाङ्मयाची आवड नाहीं असे माझे म्हणणे नाहीं; पण तिन्ही त्रिकाळ तोंडांतून ओ हेन्री, वूडहाऊस, गॅल्सवर्दी, इब्सेन यांशिवाय दुसरा शब्द ऐकायला न मिळणें म्हणजे जरा ओझेच होतें माणसाला, नाहीं का?

माझा संसार फार सुखी आहे असे म्हणालास, नाहीं? तुला माझें गृहचित्र दाखवितों, मग तूच स्वताशीं विचार कर मीं कितपत सुखी असेन तें! मी सकाळीं सहाला उठून स्वयंपाकीणबाईनें केलेला चहा—काढा म्हण पाहिजे तर—घेऊन एकटाच लांब फिरायला जातो. फिरून येऊन स्नान वगैरे होते तो साडेसात वाजतात. ही विमलची उठण्याची वेळ! अर्थात् तिचीं सर्व आन्हिक कृत्ये आटोपेपर्यंत माझी गिरणीमध्यें जाण्याची वेळ होत

असल्याने आम्ही दोघेजण एकदमच जेवायला बसतो. स्वयंपाक नीट न केल्याबद्दल स्वयंपाकिणीवरचा राग, आळशीपणाबद्दल गड्यावरचा राग... ह्या साऱ्या गोष्टी या वेळेस! त्यामुळे गप्पांना फारसा वेळच मिळत नाहीं. गिरणीमधून सहाला येतो, त्या वेळीं विमल ' लेडिज जिमखान्या ' मध्ये गेलेली असते ती साडेसातला परत आल्यावर जेवण! जेवतांना हिच्या गप्पा जिमखान्यांतील एखाद्या गोष्टीवर किंवा दुपारीं एखादे पुस्तक वाचलें असल्यास त्याविषयीं! जेवण झाल्यावर मग हिचें लेखन. साडेनऊपर्यंत सारख्या गोष्टी किंवा कविता खरडणे! हल्लीं कसलीशी कादंबरी लिहायला घेतली आहे त्यांतच दंग असतें! लिहितां लिहितां मध्येच एखादा सवाद कसा साधला आहे हें पाहण्याकरितां मला वाचून दाखवते. पुढे लहर असल्यास झोप किंवा दुपारीं झोप काढलीं असल्यास पुस्तक वाचीत बारा एकपर्यंत जाग्रण! हा रोजचा कार्यक्रम बरे का!

मीं कितीदा विमलला सारे समजावून सांगितले! पण जास्त बोलतां येत नसे! आणि हा प्रीतिविवाह बरे का आमचा! तुला आमच्या स्वयंपाकीणबाईच्या सुग्रणपणाचा अनुभव घ्यायचाय् का एकदा? मग अवश्य ये पुण्याला! हिची वाङ्मयीन बडबड पण ऐकायला मिळेल. सौ. वहिनीस नमस्कार.

पत्र वाचल्याबरोबर एकदम माझ्या डोक्यांत प्रकाश पडला. आत्तांपर्यंत मला वसताचा संसार नमुनेदार वाटत होता; पण वसंताच्या पत्रानें जेव्हां अज्ञानाचा पडदा बाजूला सरकवला, तेव्हां आंतलें सारें चित्र भेसूर स्वरूपांत माझ्यापुढें दिसूं लागले. किती मूर्खपणा माझा हा? नुसतें वाङ्मय वाचून संसाराला पूर्णता येते का? संसारांतील गोडी वाढविण्याकरितां वाङ्मयाचा उपयोग, जिविताकरितां वाङ्मय, वाङ्मयाकरितां जीवित असतें तर वसंताचा संसार असा कां? विमल खूप विद्वान असेल, चांगल्यापैकीं लेखिका असेल, तरी तिला स्वतांच्या पतीला सुखी कां करतां येऊं नये? माझ्यापुढे एकदम लीलेचे चित्र उभे राहिलें. लीला विमलइतकी विद्वान नाहीं, पण संसाराचा गाडा किती कुशलतेने चालवते! प्रत्येक बाबतींत माझी गैरसोय होऊ नये म्हणून किती जपते! सहा वाजता कामावरून दमून

आल्यावर स्वयंपाकिणीच्या हातचा चहा व फराळाचे खाऊन शीण घालवणारा वसंत...व सहा वाजतां ऑफिसांतून आल्याबरोबर हसऱ्या मुद्रेनें केलेल्या स्वागताचा स्वीकार करीत लीलेनें स्वत: काळजीपूर्वक तयार केलेल्या चहाचा व फराळाचा आस्वाद घेणारा मी...छे, लीलेची योग्यता आत्ताइतकी मला कधींच पटली नाहीं. नेहमींची बडबडी, प्रेमळ, हळव्या स्वभावाची लीला-आणि फक्त ती विमलइतकी विद्वान नाही म्हणून मी तिला दोष देत होतो ! माझ्या डोळ्यापुढे एकदम परवाचा प्रसंग आला. माझी मलाच लाज वाटू लागली माझ्या त्या वेळच्या वर्तनाची ! आतां ताबडतोब जाऊन लीलेची क्षमा मागून साऱ्या गोष्टी सुरळीत करायच्याच, या विचारानें मीं एकदम कोटटोपी चढवली व साहेबापुढे डोकेंदुखीचे निमित्त फेकून घरची वाट धरली.

" तारामती –ए तारामती ..." मी दरवाजापासून हाक मारीतच घरांत शिरलो. लीला आरामखुर्चीवर स्वस्थ झोपली होती. माझ्या हाकेने ती खडबडून जागी झाली.

" अग बाई ! इतक्या लवकर आज ?" लीला उठत म्हणाली, "अन् पुन्हां माहेरच्या नांवान हांक ? माझ्यावर संतापला होतांत ना आपण ?"

" तुझ्यावर फार दिवस मला कधीं संतापता येत कां ? तूच सांग !" मी हंसत म्हटले, " इतक्या वेळां आपण भांडलों."

"आपण ? " लीलेने हंसत मध्येच अडवले.

" बरं ! मी म्हण ! झालं समाधान ? तेव्हा माझा राग कधी दोन दिवसांवर टिकला का ? अं ऽ ?"

" तेवढ्याकरिता आज लवकर आलात वाटत ?"

" तुझी अगदीं मनापासून क्षमा मागायला मी लवकर आलोय् आज" मी जरा गंभीर होत म्हटले. " हसू नकोस ! खरच सांगतोय तुला मी हे ! आज तीन दिवस माझ्या मूर्खपणामुळं न् हट्टीपणामुळ तुला किती त्रास झाला हें मला समजत नाहीं असं नाहीं."

" इश्श ! मला कसला आलाय् त्रास ? उलट तुमचा प्रत्येक वेळीं हिरमोड करून मीच मात्र...' पण लीलेला मीं मध्येच अडवले,

" तूं खूप म्हणशील ! तुझ्या विनयशील वृत्तीला हे शब्द शोभूनहि दिसतात; पण मी कबूल केल पाहिजे ना ? छे ! किती वाईट बोललो तुला मी परवा ! कधीं तरी क्षमा करशील का ग त्याबद्दल मला ?"

" उगीच कशाला गडे त्याची आठवण आतां ? मी विसरून सुद्धा गेलें तें सारें ! आपण मात्र मला क्षमा ..."

" वा ! छान न्याय ! म्हणजे अपराध करणारानंच क्षमा करायची तर ! इतका चांगला स्वभाव कसा ग तुझा, लीले ? तूं सुद्धां माझ्याप्रमाणे थोडी हट्टी बनून भांडत का नाहींस माझ्याशीं ? निदान परवांच्या बोलण्याबद्दल माझी तीव्र शब्दांत कानउघाडणी तरी करायची ? मला अगदीं लाजवतेस तूं आपल्या वर्तणुकीनं ! त्या पत्रान माझे डोळे उघडले नसते तर..."

" पत्र ? कसलं पत्र ?" लीलेने मध्येच उत्सुकतेने विचारले, "कुणाचं?"

" वसंताच " पत्र तिच्या हातीं देत मी म्हटले, " चांगलंच अंजन घातलय् त्यानं माझ्या डोळ्यांत ! लीले, विमलवहिनीच चित्र नमुनेदार म्हणून बऱ्याच वेळां मी तुझ्या तोंडावर फेकले होत, हो ना ? बघ त्याच्या संसाराचं चित्र ! म्हणजे कळेल तुला माझीं मतं एकदम कशीं पालटलीं तीं !"

" पाहिलंस कसे चाललेत बिचाऱ्याचे धिंडवडे ते !" लीलेचे पत्र वाचून झाल्यावर मीं म्हटले, " अन् प्रीतिविवाह पुन्हा त्यांचा ! बोलतांहि येत नाहीं धड ! आहे ना ?"

" खरच बाई ! पण विमलबाईना येवढं कस नाहीं कळत गडे ? आपलं न् आपल्या पतीचं सौख्य कशात आहे हें त्यांना कळूं नये ..."

" अन् मला तरी पूर्वी कुठं कळत होत ? त्याहि माझ्याप्रमाणें वाङ्मयानं अंध झालेल्या ! मला सुद्धा पूर्वी नव्हतं का वाटत जीवित वाङ्मयाकरितां आहे म्हणून ? वहिनीची पण तशीच समजूत झालेली दिसतेय ! आतां या पत्रानं जसे माझे डोळे उघडले तसे कोणत्यातरी प्रसंगाने त्यांचे डोळे उघडतील तर सारं काहीं ठीक होईल ! पण लीले, खरं सांगू तुला ?"

" म्हणजे ? इतका वेळ खोटच सांगत होता तर !" लीला हसत म्हणाली, " अस्सं ! मग सागाव तर खर आता ?"

५

" मला तुझी किंमतच आजपर्यंत कळली नव्हती..." मी जरा गंभीर पणें बोलत होतें, " ती या पत्रानं पटवली आहे, "

" खरं ? किती ठरली तर माझी किंमत ? " लीलेला थट्टेची हुक्की आली होती.

" थट्टेची वेळ नाहीं ही !" मी जरा जास्त गंभीर झालो. " मला आतांपर्यंत माझी पत्नी विमलवहिनींसारखी विद्वान असावी अस किती किती वाटत होतों ! आणि तेवढ्यावरूनच तुझी किंमत मी कमी केली व वारंवार तुला मी दुरुत्तर केली. खरं म्हणशील तर तेवढ्यावरूनच माझं आयुष्य म्हणजे अभागी आहे अस मला हे पत्र वाचीपर्यंत वाटत होतं."

" म्हणजे हा सारा पश्चत्तापानं पोळलेल्या अंतःकरणाचा कबुलीजबाब समजायचा कीं काय ?" लीलेने हसत मध्येच विचारले.

" पण हें पत्र म्हणजे माझे डोळे उघडवणार झणझणीत अंजनच ठरलं आहे. यापुढं आतां तुझ्या तंत्रानं चालायचं ! समजल ? माझ्या काव्यमय दृष्टीपेक्षां तुझी व्यावहारीक दृष्टीच अधिक बरी असं मला वाटायला लागलंय !"

" बरंच लवकर कळल तर !" लीला हंसत म्हणाली.

" अन् बरं का, आतांपासून अगदी खेळीमेळीनं संसाराला सुरवात करायची, हं ऽ ! भांडण वगैरे अगदीं माफक प्रमाणांत !"

" म्हणजे ? भांडण पाहिजेच कां ? छान !"

" वा ! भांडणाशिवाय संसाराला कसली गोडी ? निम्मी गंमत तर त्यांत आहे. ठरल तर ! करारच हा ! अ ? "

" लेखी असला तर स्टॅंपवर दोघांच्या सह्या पाहिजेत ह ऽ ! सारं काही कायदेशीर पाहिजे. नुसतं तोंडी...."

" वा ! तोंडी करार करून पुन्हा त्यावर असा शिक्कामोर्तब केल्यावर कुणाची छाती आहे मोडायची ? अं ? "

इतक्यात 'कर्रर्रर्र टण् ' या घड्याळाच्या ठोक्याने दचकून आम्ही दोघांनीं तिकडे एकदम पाहिलें. घड्याळ अडीच वाजल्याचे दर्शवीत होते.

V.N.

# पुराणांतील वांगीं : ६

## प्रवेश पहिला

[ डेक्कन जिमखान्यावरील बंगल्यातील एक खोली ! पूर्वेच्या बाजूला दिवाणखान्यात नेणारा जाळी सोडलेला दरवाजा. पश्चिमेच्या बाजूला बागेचा देखावा दाखविणाऱ्या दोन खिडक्या. खोलींत एका कोपऱ्यात कॉट व दुसऱ्या कोपऱ्यांत पुस्तकांनीं व लेखनोपयोगी साहित्यांनीं सजवलेले टेबल ! मध्ये छोटे राउंड टेबल व त्यावर ठेवलेल्या फ्लॉवर पॉटमध्ये ताजी गुलाबाची फुले ! एक खुर्ची टेबलाजवळ व दुसरी खिडकीशेजारी. राउंड टेबलाजवळच एक इझिचेअर ! भिंती निरनिराळ्या देखाव्याच्या तसबिरानीं व आरशांनीं विभूषित केलेल्या. दुपारची चारची वेळ ! मनोहर इझिचेअरवर बसला आहे. जवळच राउंड टेबलावर कसलेसे पुस्तक उघडे पडले आहे. कॉटवर लीला बसली आहे. दोघेही वादविवादाच्या रंगात आली आहेत ]

लीलाः—पण मी असं नव्हते म्हणत काहीं !

मनोहरः—मग काय तर ?

लीलाः—आपलं गतायुष्य पत्नीला कळणार या भीतीनें नायकानें आत्महत्या करणे जरा अस्वाभाविक दिसते असे माझें म्हणणें !

मनोहरः—मग यांत अस्वाभाविक काय वाटतं तुला ? यावरून त्याचं पत्नीवरील प्रेम व्यक्त नाहीं का होत ?

लीलाः— हो, हो, तर.! बिचाऱ्या पत्नीला जगाच्या पाठीवर असहाय्य सोडून स्वतः जगाचा निरोप घ्यायचा तो तिच्यावरील प्रेमामुळेंच वाटतं ?

मनोहर:—तूं त्या दृष्टीनं पाहिलंस! पण दुसऱ्या दृष्टीनें नाहीं विचार केलास! पूर्वींची दुष्कृत्ये त्याच्या पत्नीला कळली असतीं तर स्वतःच्या पतीबद्दल तिच काय मत झाल असतं? प्रेमाचं रूपांतर तिरस्कारांत झालेलं पहाण्यापेक्षां त्यानं मृत्यु पसंत केला असल्यास नवल नाहीं कांहीं!

लीला:—पण प्रेमाचं तिरस्कारांत रुपांतर होईल हीच मुळीं चुकीची कल्पना आहे तुमची!

मनोहर:—अस? आपल्या पतीने पूर्वी साध्या वेश्येकरितां चोरी केली होती त्याबद्दल त्याच्या पत्नीला मोठा आदरच वाटेल वाटतं?

लीला:——मी कुठे म्हणते आदर वाटेल म्हणून? पण निदान तिरस्कार तरी करणार नाहीं ती पतीचा!

मनोहर:—मग?

लीला:—आपल्या पतीच्या दुबळ्या मनाबद्दल तिला कींवच वाटेल त्याची! आणि पुढील आयुष्यांत त्याच्या हातून अशी कांहीं चूक होऊ नये याबद्दल दक्ष राहील ती! इश्श हंसतां काय? खोटं वाटत हे सारं?

मनोहर:—(हसत) तूं त्या नायिकेला 'एकच प्याल्यांतल्या' सिंधूच्या रांगेंत बसवले आहेस की काय? वा! छान! मी तर अगदीं bet लावायला तयार आहे कीं, ही हकीकत जर त्याच्या पत्नीला कळली असती तर आकांडतांडव करून नवऱ्याला सोडून गेली असती ती! Divorce सुद्धां मागायला कमी केलं नसतं तिनं! काय वाटल तुला?

लीला:—मग तुम्हांला स्त्रीहृदयाची खरी परीक्षाच नाहीं असं मी म्हणेन!

मनोहर:—(एकदम गंभीर होऊन लीलेकडे पहात) लीले, अगदीं Seriously उत्तर दे हंऽ! माझ्याविषयीं तू असं ऐकलंस तर काय करशील? हंऽ?

लीला:—[गोंधळून] असा भलता प्रश्न विचारू नये गडे! शक्य तरी आहे कां कधीं असं? उगीच वाटेल ते बोलायचे म्हणजे काय?

मनोहर:—हे माझ्या प्रश्नाचें उत्तर नाहीं कांहीं! सांग ना! काय करशील असं कांहीं ऐकलंस तर? माझ्याविषयीं तुला अगदीं तिरस्कार नाहीं वाटणार?

लीलाः—[ हंसत ] शक्य तरी आहे कां तुमच्याविषयीं असं वाटणं ? हीच माझी परीक्षा केलीत हंऽ ! खरं सांगू ? मला खरच वाटणार नाहीं तुमच्याविषयीं असं कांहीं !

मनोहरः—[ जास्त गंभीर होऊन ] अन् समज तें खरं असलं तर ?

लीलाः—[ गोंधळून ] असं काय विचारताय तुम्ही आज ? काय उत्तर हवं आहे तुम्हाला ! ( उठून मनोहरच्या खांद्यावर दोन्ही हात ठेवून नजरेला नजर देते. एक मिनिट स्तब्धता ! ) असं काय गडे बघताय चमत्कारिक रीतीने माझ्याकडे ? काय झालंय तुम्हाला आज ?

मनोहरः—( लीलेचे दोन्ही हात आपल्या हातीं घेत ) पण माझ्या प्रश्नाचं उत्तर नाहीं दिलंस तूं अद्याप !

लीलाः—पण पूर्वी चुकून घडलेल्या चुकीबद्दल तुमचा तिरस्कार करण्या-इतकं माझं प्रेम दुबळं आहे असं तुम्हाला वाटतं तरी कसं ? माणसाच्या हातून चूक होतेच, नाहीं कां ? तेवढ्यावरून मी तुमचा तिरस्कार कसा करीन ?

मनोहरः—खरं ? Do you mean what you say ? कां emotion च्या भरांत वाटेल ते बोलते आहेस ?

लीलाः—असंच ना शेवटी ? मग माझ्यावर विश्वास नाहीं तर विचारावं तरी कशाला ?

मनोहरः—[ लीलेला शेजारच्या खुर्चीवर बसवीत ] तसं नाहीं लीले... बरं पण ते जाऊ दे ! विषय बदलू आपण !

लीलाः—हो ! आतां बरा विषय बदलूं ! मला हे सांगा, इतकं Seriously कां घेतलंत तुम्ही हें ? कुणाला वाटलं असतं खरंच कांहीं आहे.

मनोहरः—[ रागाचा आव आणून ] वा ! छान ! म्हणजे मला......

लीलाः—( मध्येंच ) असं रागावू नका गडे ! खरं सांगूं ? तुमचा तो गंभीर आवाज...तें चमत्कारिक तऱ्हेने माझ्याकडे पहाणं...कुणालाही शंका आली असती. पण discussion चाललं होतं पुस्तकावर, अन् इतकं Personal element त्यांत आणण्याचं कारणच काय मुळीं ?

मनोहरः—( हसत ) अग उगीच ! स्वतःवर घेतल्याखेरीज कुणाची

खरी मतं बाहेर पडत नसतात, म्हणून! (विषय बदलण्याच्या हेतूनें) बाकी लीले, तूं शेपटा सोडल्यावर इतकी सुंदर दिसतेस...उगीच नव्हतीस कॉलेजची Queen!

लीलाः—(लाजून) इश्श! कांहीं तरीच हंऽ! विषय बदलण्याची युक्ति ना ही? कळलं मला! कॉलेजची पोरं होतीं गाढव.......

मनोहरः—(मध्येच हसत) तुला सुंदर म्हणत होती म्हणून वाटतं? म्हणजे पर्याये मी पण गाढवच ठरलो कीं! छान?

लीलाः—(कृत्रिम रागाने) असं म्हटलं होते वाटत मी? अर्थाचा अनर्थ करायची संवयच ना! (घड्याळाकडे पाहून एकदम दचकून उठते) अग बाई! साडेतीन! खरंच गडे, मला प्रमिलाताईकडे जायचंय आत्तां! जाऊ ना मी, ? अर्ध्या तासांत येईन परत अ?

मनोहरः—(हसत) ओहो, काय पण! कुणाला वाटेल काय आज्ञाधारक पत्नी! नवऱ्याच्या परवानगीवाचून इकडले पाऊल तिकडे टाकत नाहीं!

लीलाः—(आरशांत पाहून केस कंगव्याने सारखे करीत) पाहिलंत? पुन्हां आला पूर्वींचा स्वभाव! (पायात चप्पल घालीत) दरवाजा घेऊं ना लोटून?

मनोहरः—(कॉटवर पडतां पडतां) ते टेबलावरचे पुस्तक दे अगोदर मला! ते नाहीं...ते Tolstoy च्या शेजारचं! हं तेंच! आतां जा तू वाटेल तिकडे! दरवाजा...राहूं दे उघडाच! (लीला जाते. मनोहर पुस्तक उघडतो)

पडदा पडतो.

## प्रवेश दुसरा

(पांच दिवसानंतर)

(पूर्वींचीच खोली! इझिचेअरवर हातांत कसलेसें पत्र घेऊन लीला बसली आहे. संताप, खेद, विषण्णता यांचे मिश्रण स्पष्टपणे तिच्या चेहे-ऱ्यावर दिसत आहे. मनोहर अस्वस्थपणे पुस्तकांशी चाळवाचाळव करीत खुर्चीवर बसला आहे.)

लीला:—( पत्र अस्वस्थपणे मांडीवर आपटीत ) एकूण हें खरंच तर हं ! माझी किती खात्री होती यातील सारा मजकूर खोटा आहे याची ! निनावी पत्रावर मी कधीं विश्वास ठेवला नाहीं. पण...छे ! ज्याच्याविषयीं मला इतका आदर वाटतो त्यानीं असलं घाण कृत्य करावं ! कल्पनाच सहन होत नाहीं मला !

मनोहर:—( कातर आवाजात ) लीले, चूक साऱ्याच्याच हातून होते, नाहीं कां !

लीला:—( उसळून ) चूक ? ही साधी चूक कां ? कल्पना काय आहे आपली चुकीची ? तुमच्या कृत्याने दुसऱ्याच्या अब्रूवर निखारे ठेवले जाताहेत तरी तुम्हाला ही साधी चूकच वाटते आहे ह ! खरच ते ! पुरुषाची जात ना ! स्वताचं कातडं वाचलं गेलं म्हणजे झालं !

मनोहर:—लीले...पण...

लीला:—( मध्येच ) पण काय ? आपल्या कृत्याची तरफदारी करणार ना तुम्ही ? सगळा दोष त्या बिचारीवर लादणार असाल, होय ना ? मला कळतं हे सारं ! [ जरा वेळ शांतता ] खरंच सांगावं...तुमच्या हातून असलं घाणेरड कृत्य झालं तरी कस ? आपल्या कृत्याचे परिणाम त्या बिचारीला किती भोगावे लागतील याची थोडीसुद्धां कल्पना तुमच्या मनांत कशी नाहीं आली ?

मनोहर:—(खिन्नतेने) खरंच आहे ते सारं...सर्व काहीं कळत होतं...

लीला:—पण वळत नव्हत, हो ना ? आतां पहा ना—तुमच्या कृत्याचे परिणाम कसे झालेत ते ! त्या बाईला आतां बाहेर तोंड काढायला जागा राहिली नाहीं. लोकल बोर्डाने तिला शाळाखात्यांतून काढून टाकलीच आहे, तिच्या घरीं सारंजिण बोलून बोलून तिला जीव नकोसा करताहेत ...अन् या साऱ्याला कारण तुम्ही !

मनोहर:—मला एकट्यालाच सारा दोष देते आहेस लीले तूं !

लीला:—तिचा दोष नाहीं असं कुठं म्हणते आहे मी ? बायकाची अब्रू म्हणजे कांचेचे भांडे हे तिला कळायला पाहिजे होतं ! पण अगोदरच बिचारी वैधव्यानें पोळलेली ! अविचाराच्या भरात क्षणैक विकाराला बळी

पडणे शक्य आहे. पण तिला पुढील परिणामाची जाणीव देणें तुमचें काम नव्हते कां ? तुम्हाला तरी कळत होतं ना हे सारं ? तिच्या भावाकडे एक महिना पाहुणे म्हणून जाऊन हे उद्योग केलेत ! छान पाहुणचार फेडलात हं ! आणि तिकडे हे उद्योग करून इकडे मला अगदीं उजळ माथ्याने प्रेमाचीं गाणीं ऐकवत होता. ( अतिरागामुळे येणारे अश्रु दडविण्याकरितां हातांत तोंड झांकतें. मनोहर शून्य नजरेने तिच्याकडे पहातो. तीन मिनिटे कुणीच कांहीं बोलत नाहीं. लीला जरा शांत झाल्यावर तोंड वर करून ) मग ? पुढे तुम्ही काय करायच ठरवलं आहे ?

मनोहरः—काय करूं ? गोंधळून गेलोय् मी अगदीं !

लीलाः—कांहीं तरी केलच पाहीजे तुम्हांला ! तुम्ही स्वस्थ बसलांत तर पत्रांत लिहिल्याप्रमाणे खरोखर आत्महत्या करायला मागे पुढे पहाणार नाहीं ती ! मग ? ( मनोहर कांहीं न बोलता फक्त शून्य दृष्टीनें जमिनीकडे पहातो. पुनः दोन मिनिटे शांतता. ) मी सांगते ऐकाल कां आतां ?

मनोहरः—( तिच्याकडे पहात ) काय सांगते आहेस तूं ?

लीलाः— मी आतां माहेरी जायच ठरवलं आहेच...

मनोहरः—( घाबरून मधेच ) काय लीले...तूं...( भावनातिशयामुळे पुढें बोलवत नाहीं. )

लीलाः—कां ? नवल वाटलं यात तुम्हांला ? या प्रकारानंतर मी पुढं इथं रहाणं शक्य तरी आहे कां ? सुदैवाने माझं Inter पर्यंत शिक्षण झालंच आहे. कोणत्याहि Girls High School मध्ये मला शिक्षकिणीची जागा मिळूं शकेल.

मनोहरः—( एकदम उठून ) लीले काय बोलते आहेस हे ? खरंच तूं मला सोडून जाणार ? तेही पण एकदां चुकून घडलेल्या अपराधाबद्दल ? छे ! थट्टा तर नाहीं ना करीत तूं ! तुझं प्रेम...

लीलाः—( हेटाळणीच्या स्वरांत हंसून मधेच ) माझं प्रेम! म्हणजे ते अद्याप राह्यलंच आहे अशी तुमची समजूत आहे तर ! छान, चांगला विनोद आहे हा ! स्पष्ट सांगायचं म्हणजे I hate you now ! माझ्या साऱ्या प्रेमाचं या प्रकारनं तिरस्कारांत रुपांतर झाल आहे. कळलं ?

मनोहरः—( एकदम खुर्चीवर बसून दीर्घ निःश्वास टाकीत ) हं ! तकं झालं हं ! मला थोडीशी अगोदर कल्पना असती तर...! लीले, क वेळ क्षमा नाहीं करणार तूं मला ?

लीलाः—एका म्यानात दोन तरवारी बसत नाहींत, माहिती आहे म्हांला ?

मनोहरः—( आश्चर्यानें ) म्हणजे ?

लीलाः—या स्त्रीशी तुम्हाला ताबडतोब पुनर्विवाह लावला पाहिजे !

मनोहरः—( दचकून उठून ) काय ? पुनर्विवाह ? अशक्य !

लीलाः—( तिरस्कारानें ) मग एकंदरींत तुम्ही तिला आत्महत्या रायला भाग पाडणार तर ! स्वताच्या सुखासाठीं माणुसकीला तिलांजली णार ! मनोहर, मला तुमची आता लाज वाटूं लागली आहे. इतके म्ही...

मनोहरः—( मधेच ) पण शक्य तरी आहे कां ते ? तुझ्यावर माझ म...

लीलाः—( मधेच ) प्रेम...खरोखरच तुमचं माझ्यावर प्रेम असेल र मी सागते त्याप्रमाणे तुम्हाला हा पुनर्विवाह लावलाच पाहिजे. एका ाजलेल्या प्राण्याचा जीव नाहीं दोन जीव-तुम्हाला वाचवायचे असतील तर ाच एक उपाय आहे. आणि नसेल करायचा...

मनोहरः—( मधेच ) पुरे पुरे, लीले, इतका वेळ तुझं बोलण ऐकून तल ! आता माझ म्हणणं ऐकतेस कां जरा शांतपणे ?

लीलाः—बाला ! लक्ष आहे माझ !

मनोहरः—अगोदर त्या कपाटांतील मेणबत्ती आणि काड्याची पेटी ाणतेस का जरा !

लीलाः—( आश्चर्यानें ) मेणबत्ती ! ती कशाला ! पत्र तर जाळायाचा चार नाहीं ?

मनोहरः—तूं आता मधे बोलूं नकोस ! ( लीला मेणबत्ती व काड्याची टी आणते. मनोहर मेणबत्ती पेटवतो व टेबलावरचे पत्र घेऊन मेणबत्तीवर ाहीं अंतरावर धरतो. लीला आश्चर्यानें त्याच्याकडे पहाते. )

लीलाः—( गोंधळून ) काय करताहांत तुम्ही हें ?

मनोहरः—अशी माझ्या शेजारीं ये म्हणजे समजेल ! ( लीला आश्चर्यानें मनोहर शेजारीं उभी रहाते. ) हे बघ, दिसतंय कांहीं तुला आता ? इतका वेळ अदृश्य असलेलीं कांही अक्षरं पडतात का नजरेला ! ( लीला आश्चर्यानें पाहूं लागते ) हा बघ A, ही P, हा इथे R आहे, हा I, हा L, व त्याच्याच खालीं F–o–o–l ही अक्षरं दिसलीं ! समजल आतां ! ( हंसू लागतो. )

लीलाः—( आश्चर्यानें त्याच्याकडे पहात ) अग बाई ! एप्रिल फूल म्हणजे हें सारं पत्र खोटंच कां ! कां आत्ताच खोट? काय आहे हे सांगावं ना गडे ? कुणी कुणाला केलंय April fool ?

मनोहरः—(हसत) वेडी आहेस तूं लीले ! बाईसाहेब, आज एप्रीलची पहिली तारीख, त्या प्रीत्यर्थ अस्मादिकानीं आपणाला एप्रिल फूल केलं आहे बरं कां ? कळल ?

लीलाः—( सुटकेचा दीर्घ निःश्वास टाकीत ) बाई ! केवढं ओझं छातीवरून उचलल्यासारखं झाल ! सारं खोट? छे ! अद्याप माझा विश्वास नाहीं बसत ! खरच ना सारं खोट ?

मनोहरः—भ्रमांत तर नाहींस लीले तूं ? इतकी खात्री करून दिली तरी खरं नाहीं वाटत ? डायरी दाखवू का तुला कालची मी ? बघ हवी तर ! खात्री करून घे नीट !

लीलाः—( हंसत ) इश्श ! एवढं नको कांहीं ! पण गडे, एवढा shock मला सहन नाहीं झाला. किती भलती चेष्टा केलीत ही ? दुसरे कांहीं मार्ग नव्हतेच का एप्रिल फूल करण्याचे ? छे ! आठ तास कसल्या मनःस्थितींत होते मी !

मनोहरः—बाईसाहेब, मुद्दाम आपली परीक्षा घेण्याकरितांच बरं कां हे ! परवाचे आपले त्या पुस्तकावर झालेले discussion आठवतें कां तुला ? तुझं मत होत नायकाने आत्महत्त्या करूं नये म्हणून ! त्यावेळीं 'आपल्या बाबतींत असं कांहीं कळल्यास मी बिलकूल तिरस्कार करणार नाहीं,' असं म्हणाली नव्हतीस ? मारे प्रेमाच्या अढळत्वाबद्दल गप्पा मारीत होतीस !

आणि प्रसंग आल्यावर आज ? ‘ माझ्या प्रेमाचे तिरस्कारांत रूपांतर झालें आहे ’ हे तुझेच ना वाक्य ? म्हणे ( लीलेची नक्कल करीत ) I hate you now ! अग, तुम्ही नुसती बडबड करावी, शेवटीं प्रसंग आला कीं पुराणांतील वांगीं पुराणांतच ! ( हसतो )

लीलाः——इश्श ! पण आपण आपल्यावर आरोप किती भयंकर ओढून घेतला होता, कल्पना आहे ? कोणत्याहि पत्नीला चीड आणील अशीच गोष्ट होती ती !

मनोहरः——पण तुझ्या म्हणण्याप्रमाणे तुला माझ्या दुबळ्या मनाबद्दल माझी कींवच करायला पाहिजे होती. पण त्या ऐवजीं यथास्थित वाक्ताडन मात्र चालले होते ! हो ना ?

लीलाः——मग काय करू गडे ? शिवाय आपण त्या काल्पनिक स्त्रीची Position च अशी चमत्कारिक आणून ठेवली होती ! आत्महत्या नाहीं तर पुनर्विवाह ! माझ्या जागीं दुसरी कोणी असती तर तिनें तरी काय केलं असतं बर ?

मनोहरः—[ हंसत ] तो प्रश्न नाहीं ! मला एवढंच दाखवायचं होतं कीं प्रसंग आला म्हणजे पुराणांतील वांगी पुराणांतच रहातात, कळलं ना तुला आता नायकाने कां आत्महत्या केली ते !

लीलाः——[ ओशाळून ] खरं आहे ! असं होत खरं ? आपण एरव्ही वाटेल ते बोलतो ! पण ऐन प्रसंगाला माणूस गडबडतेच ! पत्र खरं आहे कळल्यावर माझा स्वतःवरचा ताबाच नाहींसा झाला.

मनोहरः——[ मधेच ] बाकी लीले, तुला जरी आज एप्रिल फूल केलं तरी तुझी योग्यता मला छान कळली हंऽ ! तुझ्या सात्विक संतापाचा मला खरोखरच अभिमान वाटला. तुझी स्वतंत्र वृत्तीसुद्धां किती चमकली या episode मध्ये मला सोडून जाण्याच्या निश्चयांत व मला तिच्याशीं पुनर्विवाह करायला बजावण्यांत you showed a real spirit ! अशी खऱ्याखोट्याची चाड फारच थोड्यांना असते !

लीलाः——इश्श ! कांहीं तरीच ! कुणीहि असंच केलं असतं माझ्या जागीं !

मनोहरः——मुळींच नाहीं हंऽ ! तुझ्या जागीं दुसरी कोणी असती तर मुळुं मुळु रडण्यापलीकडे किंवा चार दोन दिवस घुसपुस नू आदळआपट करण्यापलीकडे कांहीं केलं नसतं ! मग पतीला सोडण...शिव शिव ! पति हा स्त्रीचा देव, आणि त्या देवाला सोडायचं ? छे ! आर्य पतिव्रता कधीं ही कबूल झाली नसती या गोष्टीला. तशी आर्यपतिव्रता तूं नाहींस याबद्दल मला खूप समाधान वाटलं ! खरं सांगू ? तू जेव्हा सतापानं बोलूं लागलीस ना, तेव्हां १९३५ ची सारी स्वतत्र वृत्ती तुझ्यांत अवतरली असा मला भास झाला.

लीलाः——एकूण रागावला नाहींत माझ्या बोलण्यानं !

मनोहरः——बिलकूल नाहीं ! उलट तुझ्याविषयीं आदर मात्र वाढला. That was a real spirit ! पण कांहीं झाल तरी शेवटीं April Fool च !

लीलाः——बरं बरं ! असूं द्या हंऽ ! आहोंतच नाहीं तरी आम्ही Fool !

मनोहरः——( तिच्याजवळ जाऊन तिचा चेहरा वर करीत ) बापरे ! खरंच कीं काय ! पाहूं पाहूं फूल ? खरच फूल हंऽ ! गालावरचे गुलाब...

लीलाः——( मागे सरकत ) पुरे हंऽ काव्य आपले ! April Fool करूनच्या करून...

मनोहरः——( हंसत ) वर बक्षिसही घेतात म्हणजे काय ? जुलूम आहे ! नाहीं ? ( बक्षिस वसूल करणार इतक्यात...)

( पडदा पडतो. )

# मात : ७

" मग काय ?" ट्रे टेबलावर ठेवतां ठेवता मालतीबाईंनीं विचारलें, " जाऊं ना मी दहा दिवस पुण्याला ?"

" अ ऽ? काय ?" माधवराव एकदम टाईम्समधून डोकें वर काढीत म्हणालें, " मला म्हणालीस तू कांहीं तरी ?"

" इश्श !" मालतीबाई भुंवया चढवीत म्हणाल्या, " म्हणजे मी कांहीं वाऱ्याशीं बोलते आहे वाटते ?"

" तस नाहीं ग !" माधवराव थोडे हंसत म्हणालें, " मला वाटलं तुझं स्वगत भाषण असेल हें !"

" तर तर !" मालतीबाई जरा रागाचा आव आणीत म्हणाल्या," जस कांहीं नाटकच चाललयू इथे नाहीं !"

" अग पण तूं हे विसरतेस कीं ससार हे एक नाटकच आहे." माधव-राव किटलींतून कपांत चहा ओतीत म्हणाले, " शेक्सपिअर नांवाचा एक मोठा नाटककार होऊन गेला इंग्लडमध्ये ! माहिती असेल कदाचित् तुला तो ! त्याने आपल्या एका नाटकात काय म्हटले आहे माहिती आहे का ? तो म्हणतो...."

" पुरे पुरें हं ऽ !" मालतीबाईनीं मधेंच त्यांना अडविलें. " All the world is a stage, and all the men and women m··ely players, हेंच वाक्य म्हणायचं असेल ना आपणाला ? माहित आहे पूर्ण तें ! होतं आम्हाला As You Like It इंटरला ! "

" अस्सं !" माधवराव उद्गारले, " तुझ्या लक्षांत राह्यलंय म्हणायचं अद्याप तें ! वा ! तेव्हां माझं म्हणणं असं कीं आपल्या संसाराचं हे जे नाटक आहे—"

" नाटक आहे काय हें ? इश्श ! कांहींतरीच बोलणं हं !"

" नाटकच नाहीं तर काय ग हे ?" माधवराव जोरांत म्हणाले, "म्हणजे आपण जी नाटक रंगभूमीवर करतो तशा तऱ्हेची नाहींत कांहीं ही! पण जगाच्या रंगभूमीवर आपला संसार हे एक नाटकच नाहीं तर काय ?"

" पुरे गडे हे पुराण !" मालतीबाई चहाचा कप उचलीत म्हणाल्या, " तो चहा तिकडे निवून चाललाय् !

" थांब ! असं अडवू नकोस मधेच मला !" चहाचा कप उचलून तोंडाला लावीत माधवराव म्हणाले, " तेव्हां या संसाराच्या नाटकाच्या आजच्या प्रवेशाचें स्थळ सोलापूर ! पात्रें दोन ! मालती न् माधव ! मालती"

" पुरे ना आतां ?" मालतीबाई जरा त्रासाने म्हणाल्या, " मी विचारलं एक अन् आपल कांहीं तिसरंच चाललं आहे ! मग काय उत्तर द्यायचं पत्राचं ?"

"मालती, वय वर्षे बावीस..." माधवराव म्हणालें, "गडबडा न् उतावीळ स्वभाव, जिभेला दम नाहीं..."

" माझ्या का आपल्या ?"

" तुझ्या, तुझ्या ! घाबरतो कीं काय मी स्पष्ट बोलायला !" माधवराव जरा हंसत म्हणाले, "आत्तांच पहा ना ! माझ्या बोलण्यांत चारदां व्यत्यय आणलास ! दुसरे बोलत असतांना माणसानें कस स्वस्थ ऐकून घ्यावं ! हंऽ! कुठपर्यंत आलो होतों बरं मी ? स्वभाव गडबडा, जिभेला दम नाहीं, अन् इंटरआर्टस्‌पर्यंतच्या ज्ञानावर शहाणपणाच्या गोष्टी शिकविणारी, पण—व्यवहार अ—हंऽ!" माधवराव जोरानें हंसू लागले.

" हं ! चालू द्या आपल वर्णन ! ऐकून घेते आहे मी !" मालतीबाई हातावर हनुवटी टेकीत म्हणाल्या.

" आणखी काय राहिल बरंऽ!" माधवराव विचार करूं लागलें, " अरे हो ! सौंदर्य ! वा ! मोठाच गुण विसरत होतों कीं मीं !"

" इश्श ! इतकी मी सुंदर आहे वाटतं ?" मालतीबाई आतां थोड्या खुलल्या .

" नाहींस? तूं सुंदर नाहींस? आरसा पाह्यला आहेस कां कधीं तूं ?अंऽ?" माधवरावांनीं विचारले, " बस्स ? मालतीचं वर्णन संपलं ? आतां माधवाकडे

वळायचें म्हणजे तो एक धीरोदात्त, व्यवहारतज्ज्ञ, गंभीर स्वभावाचा ..."

" बाई, बाई, बाई, ! " मालतीबाई हंसत मधेच म्हणाल्या, " गंभीर स्वभाव अगदीं उतूच चालला आहे, नाहीं आपला ? मघापासून सारखा थिल्लरपणा चाललाय अन् म्हणे गंभीर !"

" ए, तूं अशी मधे बोलून व्यत्यय आणूं नकोस माझ्या भाषणांत ! तेव्हां ... माधव हा गंभीरस्वभावाचा एम. ए. एल.एल. बी. सरकारी वकील ! शिवाय गडी, माणसे वगैरे वगैरे ?"

" पण बाई आपल्या एका मुख्य गुणाचा उल्लेख राह्यलाच. विसरलांत वाटत तो ?"

" कोणता तो !"

" मुख्य मुद्दा सोडून वितंडवाद घालण्याची संवय ! वा ! ही तर Speciality आहे आपली !"

" गंभीर स्वरूपाचा आरोप करते आहेस हं माझ्यावर ! पुराव्यानिशीं सिद्ध करावा लागेल तुला ?" माधवरावांनीं वकिली बाणा काढला.

" पुराव्याकरिता फार लांब जायला नको काहीं ! आत्ताच पहा मी प्रश्न विचारला होता त्याचा न् पुढल्या येवढ्या मोठ्या व्याख्यानाचा अर्थाअर्थीं कांहीं संबंध ? अं ?"

" अरे हो ! तूं मला कांहीं प्रश्न विचारला होतास, नाहीं कां ? Excuse हं S ! काय होता तुझा प्रश्न ? मुद्यावर येऊं आपण आतां !" माधवरावांनीं बाजू आपल्या अंगावर आलेली पाहून विषयाला चांगलीच कलाटणी दिली ! बिचाऱ्या मालतीबाई साफ फसल्या !

"पुण्याच्या पत्राचं उत्तर काय द्यायचं ?"

" पुण्याचं पत्र ? आलं कां ? कधीं ? अरे वा ! काय म्हणताहेत आमचे श्वशुर ?"

" आतां थट्टा पुरे गडे " मालतीबाई चिडून म्हणाल्या," सदा न् कदा थट्टा तरी किती करायची ? माणसाच्या सहनशीलतेला कांहीं मर्यादा आहे कां नाहीं ? जाऊं कां मी पुण्याला ?"

" खरंच तुम्हां बायकांना उठल्यासुटल्या माहेरी पळायची फार मोठी

वाईट सवय आहे बुवा !" माधवराव म्हणाले, "परवांच ना जाऊन आलीस पुण्याला ?" या खेपेला काय तर म्हणे हळदी कुंकू – या खेपेला काय तर मगळागौर– अगदी कांहीही निमित्त पुरतं तुम्हांला ! माझ्या मनांत तर असा विचार आलाय कीं एक circular काढून पुरुषांचं अधिवेशन भरवावं अन् त्यांत ..."

"पाह्यलंत ? मी विचारतें एक अन् आपल चालल्य तिसरंच ! माझ्या पुण्याला जाण्याशीं पुरुषांच्या अधिवेशनाचा कांहीं तरी संबध ?"

"पण मला तू हा प्रश्न कां विचारतेस हेच कळलं नाहीं !" माधवरा म्हणाले.

"म्हणजे ? काय समजूं मी यावरू ?"

"म्हणजे असं पहा !" माधवराव समजावून सांगू लागलें, "मी 'नाहीं' म्हणून सांगितलं तरी तू आपल्या जाण्याचा हेका सोडणार आहेस कां ?"

"इश्श ! पण सरळ सांगावं ना काय सागायचय् ते ! इतका आडवा घास कशाला ! " मालतीबाईंनीं जरा रागाने विचारले.

"तुला अगदीं खरं सागू का ? " माधवराव टाईम्स कॉटवर फेकून देत म्हणाले, " मला अगदी मनापासून तूं जाऊ नयेस वाटतं ! पण तुझ्या मनाविरुद्ध जाणं पण जीवावर येतय ! तेव्हां काय करूं मी ? तूंच सांग !"

"असं काय बरं ऽ ! इतकं बाबांनीं आग्रहान बोलावलय् ! अन् तशात वहिनींचे पहिलेच डोहाळ जेवण ! नको कां बरं मग जायला ?"

"खरं सांगू मालू ?" माधवराव जरा गंभीर झाले, "तूं गेलीस ना, म्हणजे माझं कशात लक्षच लागत नाहीं ? सारं घर कसं खायला उठल्यासारखं वाटूं लागत ! अन् तुला तर नेहमीं माहेरी पळायची हुक्कीयेते !"

"इश्श ! असं काहीं मी अगदीं खुषीनेच जाते, नाहीं ! " मालतीबाईचा स्वर पण गंभीर होऊं लागला, " मला तरी आपणास सोडून फार दिवस तिकडे रहावेल कां बर ? अन् सारा दहा दिवसाचा तर प्रश्न ! बाबांचा इतका आग्रह म्हणून !"

" परवानगी देतों मी तुला !" माधवराव म्हणाले, " पण माझी एक अट कबूल केली पाहिजेस तू ! अं ऽ !"

" कोणती !" मालतीबाईंनीं उत्सुकतेनें विचारलें.

" दहाव्या दिवशीं परत आलं पाहिजेस ! आज तारीख सोळा, नाहीं कां ?" माधवराव कॅलेंडरकडे पाहात म्हणाले, " सव्वीसला रात्रीच्या एक्स-प्रेसला मी तुला उतरून घ्यायला येईन ! अन् त्या गाडीला दिसली नाहींस तर...."

" अग बाई !" मालतीबाई घाबरल्यासारखे दाखवीत म्हणाल्या, "काय करणार आहांत नाहीं तर !"

" घाबरू नकोस ! एक्सप्रेसखालीं उडी नाहीं टाकणार मी !" माधव-राव हंसत म्हणाले, " पण उशीर केलास तर पश्चात्ताप होईल तुला उशीरा आल्याबद्दल ! जास्त कांहीं नाहीं सांगत मी आताच !"

" इश्श ! म्हणजे मला कांहीं काळजीच नाहीं आपली ? उशीरां येईन असं वाटलं तरी कसं आपणाला ? "

" पाहूं पाहू ! " माधवराव हसत म्हणाले, " किती काळजी आहे माझी दिसेलच कीं ! बरं ऽऽ ! त्या ड्रॉवरमधलं कार्ड घे पाहू—त्या नाहीं—हंऽ ! त्याच ! लिही तूंच आता ! मी वसंतकडे जाऊन येतों हं जरा ! "

मालतीबाईही पत्र लिहिण्यात गुतल्या.

× × ×

दहा दिवस होऊन गेले वरील गोष्टीला ! आज सव्वीस तारीख ! मालतीबाईंच्या माहेरीं सकाळीं आठ वाजता मालतीबाई, त्यांचा थोरला भाऊ मधुकर, धाकटी बहीण सुशीला व आई पार्वतीबाई यांचे मंडळ भरलें होतें.

" ए नको गडे !" मालतीबाई म्हणाल्या, " जातेच मी आज ! उगीच त्यांची गैरसोय करून किती दिवस रहायचं !"

" वा ग वा ! काय कळवळा आलाय पण पतिराजांचा !" सुशीला हसत म्हणाली, " जसं कांहीं तू गेली नाहींस दोन दिवस, तर भयंकर गैरसोयच होईल माधवरावांची, नाही ? सगळ्या केसेस ताईसाहेबांशिवाय खोळंबूनच राहयल्या असतील अगदीं ! दोन दिवसांची खोटी म्हणजे हजार बाराशेचं नुकसान ! हो ना ताई !"

" अग तिच्याशिवाय माधवरावांना केमेस तरी सुचल्या पाहिजेत ना !" मधुकर हंसत म्हणाला, " सारं लक्ष त्यांचं इकडं असेल मुळीं !"

" इश्श! हे रे काय मधु तुझं?" मालतीबाई जरा रागाने म्हणाल्या," तसं म्हटलं वाटतं मी ! आज यायच कबूल केलय मी त्याना ! त्याचा स्वभाव किती तापट आहे माहित आहे ना !"

" अग पण वत्से," पार्वतीबाई म्हणाल्या, " राहिलीस दोन दिवस म्हणून माधवराव रागावणार नाहींत कांहीं ! आतां इतक्या लांबून दोन दिवसांकरितां कमल येणार ! नाहीं तरी पुन्हा मुद्दाम प्रसंगाशिवाय कुठल्या गाठी भेटी व्हावयाच्या ! अनायासे उद्या येणारच आहे ती नागपुराहून !"

" जाऊं दे ग आई !" मधुकर मालतीबाईना खिजविण्यासाठीं मुद्दाम म्हणाला, " पतिराजाची अगदीं काळजी लागलीय हिला ! मला आश्चर्य वाटतं दहा दिवस तरी मुकाट्यानं कशी राहिली ! नाहीं तर आल्याच्या दुसरे दिवसापासून जाण्याचा तगादा !"

" अरे पण माधवरावांनीं दहा दिवस राहायला सांगितय् ना !" सुशीला म्हणाली, " उगीच लवकर आली तर तिकडूनही रागवायचे ते ! खरं ना ताई !"

" आहाहा ! नवऱ्याच्या रागाला नाहीं तरी ही मोठी किमतच देणार की नाहीं !" मधुकर हंसत म्हणाला, "उलट नवऱ्याला मुठींत ठेवलं असेल!"

" अनुभवावरून बोलतोस वाटत मधु ! अगबाई ! नवीनच कळलं हे!" मालतीबाई हसत म्हणाल्या, "विचारलं पाहिजे वहिनीला सारं अन् सुशे,खरं सांगू का? अनुभवाशिवाय तुझं बोलणं म्हणजे नुसती पोपटपंची आहे, बरं का! बाईसाहेब,लग्न झाल्यावर तुम्ही पण आहात न् मी पण आहे ! आठवण देईन म्हटलं या साऱ्या गोष्टींची ! —ए अ ई मग ग ऽ"

" रहा झालं दोन दिवस आतां !" शेवटीं पार्वतीबाईंनी निकाल दिला " अग अनायासे गांठी पडतील ! पुन्हां कोण कुणाला मुद्दाम भेटतय ! लिही तर पत्र आज माधवरावांना ! बर कां ? "

" तूच सांग ना गडे बाबांना पत्र लिहायला ? मला बाई कटाळा आलाय अगदीं !"

" कंटाळा आलाय का ? अगबाई ? भीति वाटतेय् पत्र लिहायची, म्हणून सांग ना ? " सुशीला हसत म्हणाली, " म्हणे कंटाळा आलाय ! बरं का मधु, या दहा दिवसांत तीन पत्र लिहितांना हिला नाहीं कुठे कंटाळा आला ! आतांच कंटाळलीय् पत्र लिहायला ?"

" म्हणजे ? तीन पत्रं लिहिली का दहा दिवसांत ? " मधुकर हंसत म्हणाला, " बापरे ? पोस्टखात्याला किती पैसे देतात हे लोक ? म्हणजे हिचे पावणेचार आणे अन् माधवरावांच्या उत्तराचे पावणेचार आणे..."

" पुरे रे ! " पार्वतीबाई मधेंच त्याला अडवीत म्हणाल्या, " किती एखाद्याच्या मागे लागावं ! बायको माहेरी असता तुझी पत्रं कांहीं कमी जात नव्हती ? तिला का उगीच नावं ठेवतोस ? "

" का ? आता का ? " मालतीबाई हंसत म्हणाल्या, " काय मधुकरपंत द्या ना आता उत्तर! किती छान जिरवलीस आई याची ! बोलायला तोंड कुठेय् आता ? "

पण इतक्यांत वहिनींनीं चहा झाल्याची वर्दी आणल्याने बैठक खलास झाली.

त्यानंतर दोन दिवसाची गोष्ट ! सुशिला, कमल, वहिनी न् मालतीबाई दिवाणखान्यात गप्पा मारीत बसल्या होत्या ! इतक्यांत मोलकरणीने मालती-बाईंच्या हातांत एक पाकीट आणून दिले. मालतीबाईंनी वरचे अक्षर पाहून जरा आश्चर्याने पाकीट फोडले. पण आतले पत्र वाचून मात्र त्याना हंसे आवरेना ! मग इतके त्या पत्रात काय होते कुणास ठाऊक ? बाकीच्या तिघीजणी तिच्याकडे जरा आश्चर्याने पहात होत्या.

" कुणाचं ग पत्र ? '

" आमच्या शेजारचे डॉक्टर गोडबोले आहेत ना ? " मालतीबाई अद्याप हंसतच होत्या, " त्यांच्या पत्नीचं आहे. "

असे म्हणून तिघींना आश्चर्यातच सोडून मालतीबाई हसत माडीवर गेल्या अन् त्याच दिवसाच्या डाकेने सौ. मनोरमाबाई गोडबोले याना एक व माधवरावांना एक अशा दोन पाकीट रवाना झाले.

× × ×

तीस तारखेला दुपारच्या पॅसेजरने मालतीबाई सोलापूरला आल्या.

नेहमीप्रमाणें घाईघाईने त्यानी दिवाणखान्यात प्रवेश केला. पण दिवाणखान्यातल्या दृश्यानें त्याना एकदम मधेच थाबवले. त्याच्या गोंधळलेल्या चेहऱ्यावरून असं काही दृष्टीस पडेल अशी त्याची कल्पनाच नसल्यासारखे दिसत होते.

• माधवराव रग पाघरून कॉटवर सुंदसे पडले होते. जवळच वसंतराव इंजेक्शनचे सामान बॅगेमध्ये भरत होते. नुकतेच माधवरावाना त्यानीं एक इंजेक्शन दिल्याचे दिसत होते, मालतीबाई जवळ जवळ धावतच कॉटकडे गेल्या.

" अगबाई ! काय झालंय भाऊजी यांना ? " माधवरावांच्या शेजारीं बसून त्याच्या डोक्यावर हात ठेवीत मालतीबाईनीं घाबरलेल्या आवाजात विचारले, " किती डोकं तापलय पण ! मलेरियाचा कां attack आहे ? "

" हS ! " वसतराव थोडे गंभीर स्वरांत म्हणाले, " आज चार दिवस बेजार केलय त्याला या तापानं ! आत्तांच इजेक्शन दिल मी ! "

" बाई S ! " मालतीबाईनीं अस्पष्ट उद्गार काढला ! ' अन् भाऊजी तुम्ही कांहींच कळवलं नाही मला याबद्दल ! तार केली असती तर ताबडतोब आले नसते का ? त्यांची प्रकृति इकडे अशी अन् मी मात्र...." मालतीबाईना पुढे बोलवेना ! थोडावेळ कोणीच बोलल नाहीं.

" इकडे बघायच ना डोळे उघडून थोडे ! " मालतीबाई माधवरावांकडे वळून म्हणाल्या, " मला का बरं कळवल नाही आजारी असल्याचं ? आपल्या प्रकृतीपुढे कमलची भेट मला जास्त होती का ? "

पण माधवरावानीं डोळेही उघडले नाहीं किंवा काहीं हालचालही केली नाहीं.

" रागावलात कां माझ्यावर ? क्षमा नाहीं का करायची ? " मालतीबाईचा स्वर गहिंवरलेला दिसत होता.

" वहिनी, शुद्धीवर नाहीं तो या वेळीं ! " वसंतराव मध्येंच म्हणाले, Brain fever चा attack मधाशीं फारच जोरात आला होता ! त्याच भ्रमात आहे तो ! "

" पण भाऊजी ऽ " मालतीबाई जराशा गद्गद स्वरांत म्हणाल्या, " एकदम कशामुळे हो हे दुखणं झालं ? पचवीसपर्यंत कांहीं नव्हतं ! अन् एकदमच कसा attack आला ? "

" Excuse me हं वहिनी ! " वसतराव गंभीरपणे म्हणाले, " पण याला कारण तुम्हीच ! "

" मी ? " मालतीबाईनीं आश्चर्याने विचारलें.

" हो, तुम्हीच ! " वसतराव ' तुम्हीच ' शब्दावर जरा जोर देत म्हणाले, " एखादी क्षुल्लक गोष्ट देखील नाना कशी मनाला लावून घेतो, तुम्हाला माहित आहेच ! सव्वीस तारखेला तुम्ही आला नाहींत ! न् त्याच्या मनाला ही गोष्ट इतकी बोचली कीं त्याच रात्रीं त्याला सपाटून ताप आला. दुसरे दिवशी मी नेहमीप्रमाणे येतो तो काय ? स्वारी तापाने फणफणत पडलेली ! लगेच घाईघाईन मी एक इंजेक्शन दिलं. "

" भाऊजी, मला तार करायची मग त्याच वेळीं ! "

" त्याला विचारलं मी त्याबद्दल ! पण तोच म्हणाला कीं, तिला जर येवढी गरज नाहीं तर हव कशाला ? येवढं ! पण वहिनी, कांहीही म्हणा, पण तुम्हीं जास्त दिवस रहाण्यात मोठीच चूक केलींत ! किती serious वर दुखणं गेलय् कल्पना आहे तुमची ? "

" एकूण माझ्यामुळे झाल ना हे सारं ! " मालतीबाईंना हुंदका आवरेना, "माझ्यामुळे...अगऽ आईऽगऽऽ !...भाऊजी, चक्कर येते हो मला......आईऽऽ ! "

" वहिनी, वहिनीऽऽ..." म्हणून वसंतराव त्यांना सांवरायला जायच्या आंतच मालतीबाई इझिचेअरवर बेशुद्ध होऊन पडल्या.

अन् काय आश्चर्य ! ब्रेनफीव्हरने बेशुद्धींत असलेले माधवराव...कीं ज्यांना आजूबाजूला काय चालले आहे याची बिलकूल शुद्ध नव्हती ते एकदम ताड्कन् उठून बसले.

" वसंत, वसंत काय झालं रे ? " माधवरावांनीं घाबऱ्या घाबऱ्या वसंतरावांना विचारलें; वसंतराव गडबडीनें बॅग गुंडाळीत होते, " एकदम अशी कशी चक्कर आली हिला ? "

" सारा तुझाच पराक्रम, बरं कां नाना ? " बॅग धुंडाळीत वसंतराव बोलत होते. " कांहीं अडलं होत हें नाटक करण्यावांचून ? किती निष्ठुर चेष्टा केलीस तू वहिनींची ! किती धक्का बसला त्यांच्या मनाला ! अगोदरच त्या फार हळुवार मनाच्या अन् त्यांत आपल्यामुळ तुझ दुखणं जास्त झाल्याची समजूत ! येवढा धक्का सहन झाला नाहीं त्याना ! "

" मालती, मालती......छे ! वसंत, फारच जोराची गुगी आली आहे का रे ? " माधवराव चागलेच घाबरले होते, " पाह्यलंस हात किती गार लागतोय तो ! अन् तूं बॅग काय धुंडाळतोस ! इकडे पहा ना थोडं हिच्याकडे ? "

" Damn it ! " वसतरावांनीं बॅग बद करतां करतां उद्गार काढले.

" अरे smelling salt ची बाटलीच विसरली घरीं ? नाना, कांदा आहे ना तुझ्याकडे ? लवकर घेऊन ये पाहू ? अन हे बघ, तुझ्या गड्याला......"

" अरे, गडी आहे कुठे ? पोस्टात पाठवलाय् मघाशीच त्याला ! "

" बर, बर ! तूं कांदा तरी आण अगोदर ! " वसंतराव एका ग्लास मध्यें कसलेंस मिक्श्चर तयार करीत म्हणाले.

" हॅ ऽ ! फोडून आणलास ना ? शेजारच्या खुर्चीवर बसून त्याच्य नाकाशी धर ! ह ! अन् हा ओला हातरुमाल आहे ना, तो हळू हळू त्याच्या कपाळावरून फिरव ! शुद्धीवर आल्या की मला सांग हऽ ! म्हणजे हे मिक्श्चर देऊ त्यांना ! "

" मालू, मालू" माधवराव हलक्या हाताने गार पाण्याचा बोळा मालतीबाईंच्या कपाळावरून फिरवीत बोलत होते, " आलीस कां शुद्धीवर तुला थट्टासुद्धां समजली नाहीं ना ? मी आजारी नाहीं ! पहा ना डोळे उघडून ? वसत अद्याप कशीरे ही शुद्धीवर येत नाहीं ? "

" असा धीर काय सोडतोस नाना ? वसंतराव त्यांना धीर देत म्हणाले " जोराचा attack आलाय् येतील शुद्धीवर हळूं हळूं ! "

इतक्यांत मालतीबाईंनीं थोडी हालचाल केला.

" मालती शुद्धीवर आलेस ना ? पहा... " पण मालतीबाईंचे तिकडे लक्षच नव्हते.

" माझ्याकरितां माझ्यामुळे आजारी... " असे कांहीं तरी त्या पुट-पुटल्या आणि पुनः स्तब्ध पडल्या.

" पाहिलंस नाना, तुझ्या मूर्खपणाचा किती परिणाम झालाय् तो ! " वसंतराव म्हणाले, " अन attack तरी किती जोराचा आलाय ! मला घरीं जाऊन Smelling salt ची बाटली न् इंजेक्शनची टयूब आण-लीच पाहिजे ! तोपर्यंत कॉटवर निजव तू यांना ! आणि डोक्याला या बाटलींतले औषध चोळ. आलोच मी आता. "

" पण लवकर ये ह अगदीं ! " माधवरावांनीं काकुळतीने त्यांना बजावलं. वसंतराव गेल्यावर माधवरावांनीं मालतीबाईंना हलकेच कॉटवर निजवून अंगावर रग टाकला, आणि उशाला बसून डोक्याला औषध चोळूं लागले. त्यांच्या चेहेऱ्यावरून तर ते चांगलेच घाबरलेले दिसत होते.

पांच मिनिटांनीं हळूं हळूं मालतीबाईंनी डोळे उघडले.

" मालू, शुद्धीवर आलीस ना तूं ? किती वेडी ग तूं ! तुला खरंच मी आजारी आहे असं वाटलं ? तुझी थट्टा करण्याकरितां हे सारं केलं होतं ! किती मनाला लावून घेतलंस बरं ! "

" खरंच ? " मालतीबाईंचे डोळे आनंदाने चमकूं लागले, " खरंच तुम्ही आजारी नाहीं ? Brain fever... "

" कांहीं होत नाहीं मला ! सारं कांहीं खोटं होतं तें ! पण तूं किती घाबरवलंस मला ! "

" मी तरी काय करूं गडे ? अग आई ऽ ऽ. डोक्यांत कशा चमका निघूं लागल्यात " मालतीबाई कण्हत म्हणाल्या, डोकं अगदीं कस सुंद झालंय् ! आई ऽ ! "

" फार दुखतंय् कां डोकं ? बाम् चोळूं कां थोडा ? नको ? " माधव-रावांच्या आवाजांत काळजी बरीच दिसत होती, " चू ! अन् वसंत्या सुद्धा तिकडेच जाऊन बसलाय् ! "

" माझ्यामुळें तुम्ही इतके serious झालांत हे मला कळल ना, " मालतीबाई सावकाश सांगूं लागल्या, "तेव्हां मला खरोखर रडायलाच आले! अन् भाऊजी नसते तर मी खूप रडले पण असते ! अशी निष्ठुर थट्टा कां बरं केलीत माझी? रागावला होता कां माझ्यावर यायला उशीर केला म्हणून?"

" क्षमा कर हंऽ ! इतक मनाला लावून घेशीलशी कल्पनाच नव्हती माझी ! " माधवराव म्हणाले, " पण तू इतकी कशी ग हळुवार मनाची ? इतकं..."

" अग आई ऽ ! " मालतीबाईच्या डोक्यानं पुन्हा उचल खाल्ली, "पुन्हां चमका निघूं लागल्यात ! नू घशाला कोरड किती पडलीय् ! " मालतीबाई विसाव्याकरितां थांबल्या.

" पाणी देऊं कां थोडं प्यायला ? मग दूध ? कांहीं घेतल्याशिवाय कसं बरं बरं वाटेल ? वसंतला आणूं का बोलावून ? "

" कांहीं नको गडे मला ! माझ्याजवळ अगदीं स्वस्थ बसावं ! " मालतीबाई माधवरावांचा हात हातांत घेत म्हणाल्या, " पण गडे, क्षमा केली ना मला उशीरा आल्याबद्दल ? "

" आतां क्षमा तूंच कर मला माझ्या मूर्खपणाबद्दल ! किती त्रास झाला तुला त्यामुळें ! " माधवराव त्यांच्या हातावरून हात फिरवीत म्हणाले.

" एकंदरींत कबूल करतां म्हणायचा आपला मूर्खपणा ! " मालतीबाईनीं हसत हंसत उठून अंगावरील रग बाजूला फेकून दिला. " बरं झालं बाई ! उमजल ज्याच त्याला लवकर ! "

" म्हणजेऽऽऽ ? " माधवराव आश्चर्यानें एकदम उभे राहिले. " याचा अर्थ काय ? म्हणजे तुला आलेली चक्कर...डोक्यांतील चमका..."

" साऱ्या आपल्या दुखण्याप्रमाणेच होत्या. हे सारं चोरावर मोर करण्याकरितां कारस्थान होतं बरं कां ! आपणाला हे सारं खरंच वाटल, होय ना ?"

" पण...पण मला या साऱ्याचा अर्थच कळत नाहीं ! " माधवराव चांगलेच गोंधळांत होते.

" अर्थ ? सरळ आहे अगदीं अर्थ ! आपलं कारस्थान आपल्यावर

उलटविण्याकरितांच तिघांचं तुमच्याविरुद्ध कारस्थान होतें हे ! आतां तरी आल कां लक्षांत ? ”

“ पण तिघ कोण हे ? ” माधवरावांच्या अद्याप कांहीं लक्षांत येईना.

“ इश्श ! मी, भाऊजी न् मनोरमाबाई ! दुसर कोण असणार आणखी ? ”

“ म्हणजे वसंत तुला सामील होता ? ” माधवरावांना आश्चर्याचा दुसरा धक्का बसला, “ इथं तर सारं कारस्थान त्यान arrange केलं ! अन् acting तरी किती natural झालं त्याच ! कुणाला वाटाव खरोखरच मी फार आजारी आहे ! ”

“ पण पूर्वीच ठरलं होत ते सारं आमचं ! ” मालतीबाई मध्येंच म्हणाल्या.

“ पूर्वी म्हणजे ? हें बघ ! सारा खुलासा कर पाहूं नीट ! मला कांहींच हा गोंधळ समजेना ! ”

“ आपण सत्तावीस तारखेला आपल्या कारस्थानाचा बेत भाऊजींना सांगितला ना ? ”

“ हो ! त्या दिवशीं सकाळीं ठरल आमच सगळं कांहीं ! मग ? ”

“ नंतर आपण निघून गेल्यावर, बाईचा न् भाऊजींचा निश्चय ठरला कीं आपली फजीति करावयाची या खेपेस ! त्याप्रमाणे बाईनीं त्याच दिवशीं पत्र पाठवून मला मार कळवल ! ”

“ अस्सं काय ? कान धरला पाहिजे ह्या वशाचा आतां ! मित्राचा विश्वासघात ! बरं पण ही चक्कर घेण्याची कल्पना कुणाची ? ”

“ मी त्याच पत्र वाचलं, ” मालतीबाईनी आपली हकीगत सुरू केली, “ त्या वेळीं मीं असच ठरवल होत कीं नुसतं आपल्या आजारीपणावर विश्वास बसल्याचं सोंग करावं ! पण म्हटल अशान आपल्याला कांहीं अद्दल घडणार नाहीं ! कारण अशी आजारीपणाची सोंगं घेण्याची आपणाला फार सवय आहे ! ”

“ प्रच्छन्न आरोप आहे बरं का हा ? ”

“ आरोप ? ” मालतीबाईंनीं विचारलें, “ अबोलाप्रकरण आपण विसरलां असाल, पण माझ्या ते चागलच लक्षात आहे ! त्या वेळेला ते

आजारीपणाचं सोंग घेऊन केलेला पराजय—त्याचंहि उट्टं काढायचं होतंच ! म्हणून चक्कर आल्याचं सोंग करायची कल्पना मला सुचली आणि त्या-प्रमाणं मी बाईंना भाऊजींनीं कसे वागावें याबद्दल लिहिलें सुद्धां होतें ! ”

“ अरे वा ! बरेंच कल्पक आहे कीं तुझें डोकें ! शाब्बास ! बुद्धिबळांच्या खेळांत दररोज मी तुला मात देतो ! पण व्यवहारांत माझा सारा डाव माझ्यावर उलटवून किती सुंदर मात केलीस तूं ! याला म्हणावें डोकें ! ”

“इश्श ! पुरे बाई ते सार आतां !” मालतीबाई हसत म्हणाल्या, “पण गडे, खरच सांगाव ह ऽ ! माझा एकंदर अभिनय कसा झाला ? कुठें मधें हंसले वगैरे नाहीं ना ? ”

“ खरं सागू ? माधवराव म्हणाले, “अगदीं उत्कृष्ट नटीवर ताण केलीस तूं ! म्हणजे मला शेवटपर्यंत बिलकूल संशय आला नाहीं यावरूनच पहा ना! तोंडावरचे भाव तरी शेवटपर्यंत किती keep up केलेस ! खरंच, पुण्याला कितींदा रगीत तालीम केलीस ग तू याची ? ”

“ इश्श ! नाटक होतं वाटत हे अगोदर रंगीत तालीम करायला ! ” मालतीबाई म्हणाल्या, “ कांहीं तरीच बोलायचं ! ”

“ कांहीं तरीच नाहीं, बरं कां ? ” माधवराव म्हणाले, “ जगाच्या रंगभूमीवर—”

“ मानवी जीवित हें एक नाटकच आहे, हेंच सांगायचे आहेना आप-णाला ? ” मालतीबाई मध्येच म्हणाल्या, “ पुष्कळदा ऐकलं हें वाक्य ! पण आजच्या प्रवेशांत आपला अगदीं सपशेल पराभव व्हावा ना ! ”

# गांध्या वाढदिवस ८

अद्याप त्या प्रसंगाची आठवण झाली की, हृदयाचा कसा थरकांप होतो.

त्या दिवशीं सकाळीं सुशीलाबाईचा म]ु न्युमोनियाने गेला होता. मी त्यांचं सांत्वन करण्याकरितां त्यांच्याकडे गेले होते. पण एकुलत्या एका मुलाच्या मृत्यूबद्दल आईला झालेले दुःख किती तीव्र असेल याची खरोखर इतराना यथार्थ कल्पना येणेच अशक्य आहे. त्यांचं सांत्वन करायला गेलेल्या मलाच त्यांच्या हृदयविदारक शोकाने अगदी भडभडून आले. मला फार वेळ तिथे बसवेना. आणि पांचच मिनिटांनी मीं तेथून बाहेर पडले.

घरीं आले त्या वेळीं एक प्रकारच्या धुंदीतच होते मी ! सारे अवयव बधिर झाल्यासारखे मला वाटत होते. नकळतच मी खुर्चीवर बसलें व शून्य नजरेने कुठे तरी पाहूं लागले. माझ्या हृदयात त्या वेळीं अगदीं विलक्षण खळबळ उडाली होती. तीन महिन्यांपूर्वीं पडलेल्या त्या भयंकर स्वप्नाच्या स्मृतीने एक प्रकारची भयंकर दहशत माझ्या मनांत बसली होती. सुशीलाबाईचा मधु आज गेला, आणि आतां बरोबर एक महिन्यानें ......

त्या साऱ्या मानसिक खळबळीला कढ आणण्याकरितांच कीं काय विनू एकदम कुठूनसा आला आणि त्याने माझ्या पायाला विळखा घातला.

" आई, भूक लागली, खायला दे ना ! " या त्याच्या वाक्याने मी एकदम दचकून त्याच्याकडे पाहिले.आतां मात्र माझ्या भावना आवरणे मला अशक्य झालें. मी त्याला एकदम उचलून हृदयाशीं घट्ट धरलें, आणि त्याच्या डोक्यावर गाल टेकवून अश्रू गाळण्यास सुरवात केली.

बिचारा विनू ! भांबावून गेला तो या प्रकाराने ! त्याने गोंधळून मान वर करून माझ्याकडे पाहिले आणि माझ्या गळ्याला हाताचा विळखा घालून त्यानें पुन्हां विचारले,

" आई, कां ग ललतेस ? "

त्याच्या या प्रेमळ प्रश्नाने मला दुःखाचा अधिकच उमाळा आला. आलेला हुदका कसा बसा गिळून मी पदराने डोळे पुसले, आणि दोन्हीं हातांत विनूचे डोके धरून त्याला समजेल न समजेल याचा विचार न करतां मी एकदम म्हटले, " विनू, तूं नाहीं ना मला सोडून कुठे जाणार ?"

विनूने आश्चर्याने माझ्याकडे पाहिले. त्याला माझ्या प्रश्नाचा अर्थ तरी कळला कीं नाहीं कुणास ठाऊक ?

मी त्याला पुन्हा विचारले, " सांग ना, कुठे जाणार नाहींस ना मला सोडून ? "

विनूने नकारार्थी मान हालवीत फिरून माझ्या गळ्याला विळखा घातला, " कुथ्थे कुथ्थे नाई। जानाला मी ! अगदीं फिरायला सुद्धा ! आई, पन् तूं कां ग ललतेस ? मी जाईन म्हणून ? खलंच कुथ्थे जानाल नाहीं मी ! "

" खरच नाहीं ना जाणार ? खरच ? कित्ती कित्ती शहाणा आहे बाळ माझा ! " त्या मानासिक अवस्थेतही त्याचे ते उत्तर ऐकून मला खूप आनंद झाला, आणि त्या भरांत त्याची तीन, चार, पांच चुंबन घेतली. " आपल्या आईला सोडून कुठे सुद्धां जावूं नये बरऽ ! आईला वाईट वाटत मग फार ! देव तरी कसा निष्ठूर आहे अगदीं... " मी काय बडबडत होते हे विनूला तर राहोच, पण माझे मला तरी कळत होते कीं नाहीं कुणास ठाऊक ? आतांपर्यंत हृदयांत दबून बसलेल्या साऱ्या भावनांना शद्बाच्या रूपानें जणू कांहीं वावच देत होते. थोड्या वेळानें विनूनें हळूंच डोकें वर केले.

" आई, खायला दे ना ! " त्याच्या त्या शद्बानें मी एकदम शुद्धीवर आले. माझ्या त्या स्वतःशींच चाललेल्या बडबडीने माझी मींच खजील झालें.

" चल घरांत, शिरा देतें हं तुला ! " मी त्याला बरोबर घेऊन स्वयपाकघरांत गेले व सकाळींच त्याच्यासाठीं करून ठेवलेला शिरा व पाण्याने भरलेला त्याचा गडू त्याच्यापुढे ठेवला.

दिवाणखान्यांत येऊन कॉटवर बसले मी ! विचाराचें मध्यंतरी बंद पडलेलें चक्र पुन्हां सुरूं झाले आणि मी शून्य दृष्टीनें कॅलेंडरकडे पाहूं लागलें.

किती वेळ मी अशी कॅलेंडरकडे बघत खुर्चीवर बसले होते कुणास ठाऊक ! विचाराचा कसा अगदी कल्लोळ उडाला होता मनामधे.... अन-पेक्षितपणे मनाला मिळालेल्या धक्क्याने जणू काही बधिरच झाले होते ते. आज मार्चची सत्तावीस तारीख.... आणखी एका महिन्याने विनूचा वाढ-दिवस यायचा.... आणखी योगायोगाने मधूहि आजच मृत्यूमुखीं पडावा! स्वप्नाचे हे पहिले प्रत्यतर तर आणखी एक महिन्याने विनूच्या वाढदिवशींच स्वप्नाचे दुसरे प्रत्यंतर येणार कीं काय ? छे ! नुसत्या कल्पनेने कसें हृदयाचे पाणी पाणी झाले.

माझ्या डोळ्यासमोर ते सारें स्वप्न उभे राहिले.

तीन महिने झाले असतील त्याला ! बहुतेक मी दुपारी कधींच झोंप घेत नसते-आणि झोंपलेच तर मला स्वप्न क्वचितच पडतात. पण त्या दिवशी दोन्हीहि गोष्टी घडल्या. कोणतेसे पुस्तक वाचता वाचतां-कशी कुणास ठाऊक-झोंपेची गुंगी आली मला आणि त्यातच अतिशय चमत्का-रिक-चमत्कारिक कसलं, भयकर-स्वप्न पडलं !

विनूचा तो पांचवा वाढदिवस असल्याने, तो दिवस आम्हीं विशेषच मोठ्या प्रमाणात साजरा करण्याचें ठरवलें होतें. बोलतां बोलतां सहज आमचे वैवाहिक जीवनावर बोलणे निघाले. ते म्हणत होते, " खरंच, सात वर्षे झाली आपलं लग्न होऊन ! किती सुखांत गेला आपला काळ; नाहीं ? कसल्याहि प्रकारच्या काळजीचा किंवा चिंतेचा अनुभवसुद्धा आला नाहीं आपल्याल्या कधीं ! अन् त्याच सार श्रेय तुझ्या सुशील अन् गोड स्वभावा-लाच आहे असं नाहीं वाटत तुला ? "

" तर तर ! " मी जरा लाजून म्हटले, " आपल्याकडे त्या श्रेयाचा कांहींच वाटा नाहीं वाटत ? खरं म्हणजे आपल्या मनमोकळ्या न् प्रेमळ स्वभावामुळेंच इतके आनदांत दिवस गेले. आणि त्यांत भर घालायला लवकरच विनू झाला.... "

इतक्यांत कुठून कुणास ठाऊक, एकदम सुशीलाबाई तिथे आल्या. त्यांचे रडून रडून सुजलेले डोळे, पांढराफटक चेहेरा, विस्कटलेले केस,

पाहिल्याबरोबर माझ्या छातीत एकदम धस्स झाले. मी काही विचारण्या-पूर्वींच त्यांनी बोलायला सुरवात केली.

" आमच्या मधूला कुठे पाहिलत काहो लीलाबाई ? आज एक महिना झाला.... कुठ्ठ कुठ्ठ सापडत नाही तो ! किती हुडकल मी त्याला ! तुम्हाला तरी दिसला काहो कुठे तो, भाउजी ? "

त्यांचे भाषण ऐकून मला खूप आश्चर्य वाटले. मधु गेला....एक महिना झाला त्याला जाऊन....आणि गेला कुठे ? पळून तर नाहीं गेला ? साह-जिकपणे विनूला पाहण्याकरिता माझे डोळे आजूबाजूला वळले.

"अगबाई, विनू कुठे गेलाय ? विनू तर नाही गेला त्याच्याबरोबर दोघही नेहमीं बरोबर असतात .... कुठे गेलाय तो . .त्याच्यामागे तर नाहीं गेला ? " मी घाबरून म्हटले.

" मधूबरोबर नाही गेला ना. .विनू आज गेला, मधु एक महिन्या-पूर्वींच गेला. कुठ गेले हो हे दोघेजण ? तुम्ही तरी पाहीलंत का यांना कुठे जाताना !

विनू कुठे तरी गेला हे कळल्याबरोबर माझे हृदय एकदम धडधडू लागले.

" अगबाई, विनूहि गेला वाटतं कुठ ! आता तर इथे खेळत होता, इतक्यांत कुठ गेला बाई ! विनू....ए विनू. ..अरे विनायक....'' मी जोरात हांक मारू लागले. हाकेला उत्तर येईना तशी मी अधिकच घाबरले. " विनू....अरे गेलास तरी कुठे तू ! ए विनायक." मी हाक मारण्याचा सपाटा चालू ठेवला.

" अग, गेला असेल कुठं तरी तो—येईल इतक्यांत ! हांक मारण्याचे काहीं कारण नाही. आईशिवाय बिलकूल करमणार नाहीं त्याला. कुठेंहि गेला तरी नक्की येईल तो— वेडी ! " हे मला सारखं समजावीत होते, तरी हांका मारण्याचा सपाटा मी चालूच ठेवला. हांकेला प्रत्युत्तर येईना म्हणून निराश होऊन मी अखेरची एक जोरात हांक मारली. "विनू..-."

कुणी तरी मला जोरांत हालवीत होते व म्हणत होते " जागी झालीस का नीट ! ऊठ ! स्वप्न पडत होत वाटत तुला ! हा पाहिलास का विनू ! तुझ्याजवळ तर उभा आहे....जागी हो नीट ! "

मी हळुहळू डोळे उघडले. स्वप्नातील माझ्या हाकांनीं शेजारच्या खोलीं तून आंत येऊन ते मला जागे करीत होते. व शेजारीच विनू माझ्याकडे पहात उभा होता. विनूला पहाताच मी एकदम उठले व त्याला वर उचलून हृदयाशीं घट्ट धरले.

" स्वप्न पडलं वाटत तुला कसल ! " ते मला विचारीत होते.

पण कांहींच उत्तर न देतां मी विनूच्या मस्तकावर अश्रूंचा वर्षाव करीत होते.

.... तीन महिने झाले होते वरील स्वप्नाला ! जवळ जवळ विसरत आले होते मी ते स्वप्न !—पण इतक्यात मधूच्या मृत्यूने माझ्या निद्रिस्त स्मृतींना एकदम धक्का दिला. आणि खपली काढलेल्या जखमेप्रमाणे ते घोर स्वप्न एकदम माझ्या डोळ्यांसमोर ताजेपणाने आले. माझ्या मनांत विचार आला..,..आजचा मधूचा मृत्यू व एक महिन्याने येणारा विनूचा वाढदिवस यांचा परस्परसंबंध तर नसेल ! नाहींतर मधूला मृत्यूने अगदीं आजच का ओढून न्यावे ?

वैरी सुद्धां कल्पनेनें रंगवींत नसेल अशीं चित्रं मन कधीं कधीं रंगवीत असतं ! स्वप्नातील एका गोष्टीची सत्यता इतकी अकल्पित रीतीने पटलेली पाहून माझे मन नाना तऱ्हेच्या वाईटसाईट कल्पना करू लागले. आजपासून एक महिन्यानं विनूचा पांचवा वाढदिवस......स्वप्नाप्रमाणें तोच त्याचा अखेरचा दिवस तर नाहीं ठरणार ? माझ्या डोळ्यांसमोर सकाळचे मधूच्या मृत्यूच्या वेळचे सारं चित्र उभे राहिले—मधूला नेताना सुशीलाबाईंनीं फोडलेली करुण किंकाळी अद्याप माझ्या कानांत घुमत आहेसा मला भास झाला—हाच प्रसंग एक महिन्याने माझ्या लाडक्या विनूवर येणार...लोक असेच त्यावेळीं त्याच्या कोमल देहाचे हाल करणार...नुसत्या कल्पनेने माझे अंतःकरण पेट घेतें आहेसे वाटू लागले...अश्रूंना अगदीं कढ आला आणि उशींत डोके खुपसून मी हुंदके देऊ लागले.

किती वेळ अशा स्थितींत मी होते कोण जाणें ! माझ्या खांद्यावर पडलेल्या हातानें मी दचकून उठले आणि मागे वळून पाहिले. त्यांची स्वारी माझ्या शेजारींच बसून कांहींशा साश्रुपूर्ण नजरेने माझ्याकडे पहात होती.

" वेडी...तूंच असा शोक करूं लागलीस तर वहिनींच समाधान कुणीं करायच ? रडण्याची का वेळ आहे ही आता ? मधू गेला म्हणून तला कमी दुःख झाल अस नाहीं...पण यावेळीं वहिनींचं सान्त्वन करायचं कां आपणच मुळू मुळूं रडत बसायचं ? उठ...पूस ते डोळे ! वहिनींची समजूत घाल जरा .. !"

मी मुकाट्याने डोळे पुशीत उठले. मनांतील खळबळ तशीच आंत दबवून टाकली व सुशीलाबाईकडे गेले. त्याचे रडून रडून सुजलेले डोळे आणि पांढराफटक पडलेला चेहेरा. मला एकदम भडभडून आले...सात्वन कोणत्या शब्दानी व कसे करावे हेच मला सुचेना. असा प्रसग एक महि-न्याने माझ्यावर येणार या कल्पनेने तर भावना अनावर होत...व त्याचें सांत्वन करावयास गेलेली मीच अश्रू गाळू लागे.

कितीदां तरी मनांत येई की, सागावी त्यांना स्वप्नाची सारी हकीकत. पण पुन्हां वाटे कशाला काळजीचे बीज आतापासून त्याच्या मनांत पेरायचे ? होणार असेल ते कांहीं झाले तरी टळणार आहे थोडेच ? माझ्यां मनांत पेटलेला चिंतेचा डोंब मला जाळतो आहे तितका पुरे नाहीं का ? त्याची झळ त्यांना कशाला उगीच. ?—आणि असा विचार मनात आला कीं, ओठावर आलेले शब्द आतल्या आत विरून जात आणि तोंडावर ओढून ताणून आणलेल्या हास्यांनीं मनांतील सारी खळबळ मी त्याच्या-पासून लपवून ठेवी.

जसजसे दिवस उलटू लागले तसतशी माझी अस्वस्थता जास्त जास्तच वाढूं लागली. आपल्या अल्पायुषी पतीचा मृत्युदिन माहीत असलेल्या सावित्रीसारखी हुबेहूब माझी मन:स्थिति झाली होती. पतीऐवजी पुत्र येव-ढाच काय तो फरक ! दररोज उठून तारखेचे पान फाडतांना माझ्या मनांत विचाराचें वादळ उठे ! प्रत्येक तारखेचे पान फाडतांना सत्तावीस तारखेला एकेक तारीख जवळ जवळच आणले आहे या विचाराने हृदय थरारे, व डोळ्यांत न कळत अश्रू उभे रहात. विनूच्या पाचव्या वाढदिवसानिमित्ताच्या समारभाचे त्यांचे मोठमोठे बेत चालले होते...व पुष्कळ वेळ ते मजजवळ त्यासंबंधीं चर्चाहि करीत. पण त्या प्रसगीं नेमकी मला त्या स्वप्नाची आठ-

वण होऊन हृदय भरून येई व त्याना आपले अश्रू दिसूं नयेत म्हणून चर्चा चालू असतांना मध्येच मी कांहीं तरी निमित्त काढून निघून जाई. त्याचा मृत्यूदिन व वाढदिवस एकदमच येणार याची त्यांना थोडी तरी कल्पना असती तर! अज्ञानांतच खरे सौख्य असतें हे किती खरे ?

विनूला मात्र या महिन्यांत मी बिलकूल विसबत नसे. जरा कुठे तो नजरेआड झाला कीं, मी धडधडत्या हृदयानें त्याला सगळीकडे शोधूं लागे. थोडें कुठें त्याचें अंग ऊन झाल्यासारखे वाटलें कीं, माझ्या मनांत एकदम धडकी भरे आणि वाटे ही सुरुवात तर नाहीं ना ? एकदोनदां रात्रीं झोपेंत तो खोकल्याबरोबर मी एकदम दचकून जागी झाले. या खोकल्यांत तर त्याच्या आजाराचें मूळ नाहीं ना, अशी शंका माझ्या हृदयाला चाटून गेली. त्याबरोबर मी त्यांना म्हटलें, " ऐकलं कां—आज दोनतीन दिवस विनू खोकतो आहे सारखा ? डॉक्टरला तरी दाखवावा उद्यां ? "

माझ्या भाषणानें त्यांना काळजी वाटण्याचे दूरच राहिलें. उलट ते जोर-जोरांत हंसू मात्र लागले ?

" इतकी कशी घाबरट तू ? " हंसत म्हणाले, " आज त्याला पहिल्यानें खरा खोकतांना ऐकतो आहे मी ! असेल साधंच कांहीं तरी ! नसत्या शंका डोळ्यांसमोर उभ्या करून स्वतःला उगीचच घाबरवून सोडतेस ! वेडी !"

" बरंऽ ! असूं द्या मी वेडी ..." बोलतां बोलतां माझ्या डोळ्यांत अश्रूं उभे राहिलें, " पण उद्यां त्याची प्रकृति डॉक्टरना दाखवायला हवी ! आपण अगोदरपासून काळजी घेतलेली बरी ... ऐकलं ना ?"

माझ्या डोळ्यांतील अश्रूं पाहून तेही गंभीर झाले व विनूला दुसरे दिवशीं डॉक्टरकडे नेण्याचे त्यांनीं कबूल केलें.

पण त्याची प्रकृतिच जिथे सुदृढ होती तिथें डॉक्टर काय सांगणार ? त्यांनी विनूची अगदीं कसून तपासणी केली— मी होतेंच त्या वेळीं हजर ! आणि तो अगदीं पूर्ण निरोगी असल्याची तीनतीनदां मला ग्वाही दिली तेव्हां कुठें माझ्या मनाचें समाधान झालें.

सव्वीस एप्रिलचा दिवस ! विनूचा पाचवा वाढदिवस म्हणून मोठा

समारंभ करावयाचें आम्ही ठरवले होते. पण मधूच्या आकस्मिक मृत्यूने तो बेत रहित करून घरच्या घरींच छोटासा समारंभ करण्याचे ठरवले होते व त्याचीच तयारी करण्यांत मी गुंतले होते. मन कामात व्यग्र असल्याने मनांतील हुरहुरीला कांही वेळ तरी विश्रांति मिळाली होती. शेजारीच विनू पत्त्याचा बंगला बांधीत बसला होता.

" आई, मधू कुठे गेला ग ?" या त्याच्या आकस्मिक प्रश्नानें मी एकदम दचकून त्याच्याकडे पाहिले. मधूबद्दलचे विचार त्याच्या डोक्यांत कसे आले हेंच मला समजेना. बंगला बांधण्याचे काम अर्धवट सोडून तो माझ्याकडे पहात होता.

" काकू म्हणतात, तो देवाघर्ली गेला – खल कां ग ?" मी बोलत नाहीं हे पाहून त्याने पुन्हां विचारले.

" हो बरं बाळ—" मी त्याला एकदम जवळ घेऊन मांडीवर त्याचे डोके ठेवून त्याच्या केसांवरून हात फिरवीत म्हटले, " मधू देवबाप्पाकडे गेलाय...विनू उद्यां तुला कोणत्या गमती आणावयाच्या रे ?" त्याच्या डोक्यांतून ते विचार घालवून टाकण्याचा मी प्रयत्न करूं लागलें.

"आई, मी जाऊ का ग मधुकदे, देवाच्या घर्ली ? कुथं आहे ते अपाल्या देवाचं घल ?" विनू गंभीरपणे माझ्या मांडीवर पडल्या पडल्या माझ्याकडे टक लावून बोलत होता. विनूचा हा प्रश्न ऐकून माझ्या अंगावर भीतीचा कांटा उभा राहिला. भवितव्यता तर विनूच्या मुखानें बोलत नसेल ना ? भावनेच्या भरात विनूचे डोके वर उचलून मी ते छातीशीं धरले व त्यावर माझा गाल टेकला.

"असं बोलू नये बाळ ! तूं गेल्यावर मला कर मेल का बर तुझ्यावांचून ? आईला असं एकटं सोडून जावं का ? नाहीं जाणार ना तू मधुकडे ?" मी अगदीं वेड्यासारखी वाटेल ते बोलत होते. जणूं कांहीं विनू एखाद्या गावालाच चालला होता. विनूला माझें बोलणे कितपत समजलें कोण जाणे ! माझ्या डोळ्यातील अश्रू मात्र त्याला दिसले. त्यानें हलकेंच तोंड वर केलं व माझ्या गळ्याभोवतीं हात टाकून म्हणाला, " आई ग, पण लवकर येईन मी अगदीं ...अगदी लवकर !"

मी कांहीं न बोलतां साश्रुयुक्त नयनांनी त्याची तीन चार चुंबनं घेतली.

अखेर तो सत्तावीस एप्रिलचा दिवस उगवला ! विनूचा वाढदिवस— आम्ही दोघेहि सकाळपासून त्याला नटवण्या सजवण्यांत व त्याचें कोड-कौतुक करण्यांत किती दंग झालो होतो ! त्याच्या आनंदाला विशेषत: आज जास्तच भरती आली होती. आतांपर्यंतचे सगळे वाढदिवस आजोळी झाल्याने यदाचा पांचवा वाढदिवस विशेषच उत्साहाने साजरा करण्याविषयीं त्यांचा कटाक्ष होता. माझी मात्र मन:स्थिती अगदीं विलक्षण झाली होती. स्वप्नात कळलेल्या भयंकर सत्याने आज माझी छाती सारखी धडधड होती. आज त्याचा घातवार -कोणत्यावेळीं कसे आणि काय घडेल याबद्दल मला अतिशय काळजी लागली होती. विनूला त्यामुळे मी क्षणभरहि विसं-बावयाला तयार नव्हतें. न जाणों, मी मधेच कुठे गेले आणि पटकन् त्यावळ्या वेळांत निर्दय काळाने आपला दावा साधला तर ! काळ कधी कुणाला सागून येतो थोडाच !

त्याच्याबरोबर नाहीं गेला तो. विनू आज गेला, मधू एका महिन्या-पूर्वी गेला. सुशीलाबाईचें स्वप्नांतील शब्द सारखे माझ्या कानात घुमत होते. आज महिना झाला मधुला जाऊन ! आतां विनूची पाळी ...नुसती कल्पना हृदयाचे पाणी करी व वाटे — रडावे खूप एकीकडे जाऊन ! पण विनूचा वाढदिवस आज ... डोळ्यांत पाणी तरी कसे आणायचें ? इतरांच्या आनंदावर आतांपासूनच विरजण ! एकदोनदा तर कल्पनेच्या अतिशयच आहारी गेल्याने अश्रू अगदीं आवरेनात ... त्यांनीं ते पाहिले.

"वेडे" ते जवळ येत पाठीवरून हात फिरवीत म्हणाले.

" किती दिवस मधूच्या आठवणीने अश्रू गाळणार तू ? वहिनींना हे अश्रू दिसलें तर त्यांना किती दु:ख होईल ? विसरायला नकोस का या गोष्टी आतां ?"

मी मुकाट्यानें अश्रू पुसले. त्यांना वाटत होतें मी मधूबद्दलच शोक करते आहे. माझ्या हृदयातील खळबळ त्यांना काय माहिती ? आपणा-वरही आज असाच प्रसग येणार आहे याची त्याना थोडी तरी कल्पना असती तर !

संध्याकाळचे सहा वाजले तरी कांहींच घडलें नाहीं. विनू अगदीं मजेंत होता. मला आतां शंका येऊं लागली— मीच कल्पनेने नसत्या शंका काढत नाहीं ना ? मझ्याच कल्पनेचे तर हे सारे खेळ नाहींत ? स्वप्न जशीं कांहीं कुणाला पडतच नसतील—अस प्रत्येक स्वप्न खरं होऊं लागलं तर अनर्थ ओढवतील एकेक ! छे ! मीच वेडी असली पाहिजे माझ्या बाळा-विषयीं नसत्या कल्पना करण्यांत !... पण...पण मग मधूचा मृत्यु ? तो कसा अगदीं स्वप्नांत सांगितलेल्या दिवशींच झाला ? योगायोग ? मग योगा-योगानें स्वप्नाचा हाही भाग खरा कशावरून होणार नाहीं ?

आणि कालचे विनूचें भाषण ? त्याचा काय अर्थ करायचा ? लहान पोराला असं भाषण करण्याचं ज्ञान कुठून असणार ? भवितव्यताच तर नव्हती बोलत त्याच्या तोंडून ?

छे ! कांहीं तरीच ! लहान पोर ते काय—आणि त्याच्या बोलण्यावर मी कल्पनेचे मनोरे उभारते ते काय ? ऐकलं असेल त्याने कुठे कांहीं तरी, आणि आला असेल तेंच बडबडत !

अशा परस्परविरोधी विचाराच्या लाटांनीं थैमान घातला होता माझ्या मनात नुसता ! अतिशय मोठ्या वादळामुळें असहाय्य झालेल्या जहाजा-सारखी माझी मनःस्थिति झाली. सगळीं कामं नुसतीं एखाद्या यंत्राप्रमाणें चाललीं होतीं माझीं ! काय करीत होते हें माझे मलाच समजून येत नव्हतें.

साडेसहाच्या शोला विनूला टॅक्सींतून नेण्याचें ठरलें होतें. त्याप्रमाणे आम्ही तिथे गेलों...दोन तास मी चित्रपटगृहांत होतें. पडद्यावर चित्रं हालत होतीं...कानावर कसले तरी आवाज येत होते...पण त्यापासून बोध मात्र कांहींच होत नव्हता. विचार दुसरीकडेच भरकटत होते ! सिनेमा सुटल्यावर यांत्रिक पुतळीप्रमाणें मी उठले, व विनूला हाताशीं घेऊन त्यांच्या मागोमाग चालू लागले.

चांदणें असल्यानें चालत जायचें आम्हीं ठरवलें. मधेच विनूला खेळणीं घेऊन देण्याकरितां आम्ही एका दुकानात शिरलों. त्याच्या आव-डीचीं तीन चार खेळणीं घेतल्यावर परत फिरलो.

रस्त्यावरून जात असतांना मी त्याचा हात माझ्या हातांत घट्ट धरून ठेवला होता. जणूं कांहीं माझ्यापासून त्याला नेण्याकरिता कुणीतरी टपू-नच होता.

पण मधेंच वाऱ्याचा मोठा झोत आला. उडालेला पदर सांवरण्याकरितां मी विनूचा हात सोडला.

विनूची डोक्यावर सैल बसणारी साहेबी टोपीही त्याच वेळीं उडाली. "आई... टोपी." म्हणत तो टोपीमागें रस्त्यावर धांवला.

अन् त्याच सुमाराला तिकडून येणाऱ्या मोटारचा हॉर्न...ब्रेकचा कर्कश आवाज.. विनूची किंकाळी....सारं कांहीं क्षणार्धांत झालंऽ!

"विनूऽ!" मी एकदम किंकाळी फोडली. माझ्या डोळ्यापुढें एक दम अंधारी आली. फुटपाथवरच मी बेशुद्ध झाले.

× × ×

मी डोळे उघडले त्यावेळीं खोलींतच कॉटूवर मी असल्याचें आढळून आले. सर्व अंग कसं अगदीं जळत असल्यासारखं वाटत होतं...डोक्यावर कुणीतरी घणाचे घाव घालत असल्याचा मला भास होत होता. माझ्या शेजारींच ते माझ्या कपाळावर असलेल्या बर्फाच्या पिशवीवर हात टेकून बसले होते. मी डोळे उघडलेले पहाताच ते जरा हंसले.

"कसं काय...बरं वाटतं ना तुला आतां? डोकं फार दुखतंय् कां? नाहीं ना? अं—हं काढूं नकोस ती पिशवी! पुन्हां आणखी ताप चढेल! कालपासून किती घाबरवून सोडलेंस मला तूं! कल्पना आहे?

मी कांहीं न बोलतां डोळे मिटले. प्रथम मला कांहींच आठवेना! डोक्यांत चक्र फिरत असावंसं वाटत होतं! पण एकदम साऱ्या गोष्टी मला आठवल्या. मला पडलेलें स्वप्न—कालचा मोटार अपघात...विनूची किंकाळी...सारं कांहीं एकदम मनःचक्षुपुढें उभं राहिलं! मी लगेच उठून बसण्याचा प्रयत्न करीत विचारलें. "विनू...विनू कुठे आहे?"

"झोपला आहे तो पलीकडील खोलींत!" त्यांनीं शांत आवाजांत उत्तर दिलें, "बाकी काल जीवावरच बेतली होती त्याच्या! मोटारचा

धक्का लागून उलट बाजूला पडला म्हणून बरं! नाहीं तर घडगत नव्हती त्याची! थोडं खरचटलं आहे..."

"सारं—सारं खोटं आहे अगदीं!" मी मधेच किंचाळले, ओरडलें, "मला सांगायचं नाहीं म्हणून दडवून ठेवतां सारं! सांगा ना कुठें आहे विनू? आणा ना त्याला इकडे! शेवटलं तरी पाहूं द्या मला त्याला..." जवळ जवळ अर्धवट हुदक्यांतच मी वाक्य संपवलें आणि उशीवर डोकें टेकवून हुदके देण्यास सुरवात केली,

"असा काय वेडेपणा करतेस लीले, तूं? शुद्धीवर आहेस कां? रडायला काय झालं एकाएकी तुला?" त्यांच्या आवाजांत गोंधळ स्पष्ट दिसत होता. "ऊठ! अशा त्राग्याने ताप चढेल मात्र! तो पाह्यलास कां विनू?"

मी एकदम डोकें वर केलें...अन् खरंच.. दरवाज्यांत बँडेज गुंडाळलेली विनूची बालमूर्ति! डोळ्यांवर विश्वास ठेवावा कीं नाहीं हाच प्रश्न पडला मला! हें स्वप्न कीं सत्य? एकूण मला पडलेलं तें दुष्ट स्वप्न खोटंच ठरलं तर! अहाहा! किती छान!

उठवत नव्हतं तरी मी उठले न् जवळ जवळ धांवतच विनूकडे गेले.

"विनू!" हांक मारीत मी एकदम त्याला उचलले आणि हृदयांशीं घट्ट धरले. जणूं कांहीं माझा हरवलेला ठेवाच कोणी परत आणला होता. आनंदाच्या भरात माझ्या डोळ्यांतून अश्रूंच्या सरी ओसरूं लागल्या. त्यांचेही डोळे हें चित्र पाहून, अश्रूंनीं भरून आले.

"आई, कां ग ललतेस?" गळ्याभोंवतीं उजव्या हाताचा विळखा घालून डाव्या हाताने डोळ्यांतील अश्रू पुसत विनू म्हणाला. मला वाटलं, इंद्राच्या नंदनवनांतच मी हिंडतें आहे.

पण हा आनंदाचा धक्का मला सहन झाला नाहीं. एकदम मला चक्कर येत आहेसें वाटूं लागलें. त्यांनीं जर गडबडीनें मला सांवरलें नसतें तर मी खालींच आपटलें असतें.

वाढदिवस मोठ्या उत्साहाने साजरा करतो. पण प्रत्येक वाढदिवसाच्या प्रसंगी मला विनूच्या पांचव्या वाढदिवसाची आठवण झाली कीं त्या नुसत्या आठवणीने हृदयाचा थरकांप उडाल्याशिवाय रहात नाहीं.

---

# परीक्षा : ९

" अगऽ बाई ! " तारेला पाहिल्याबरोबर सज्जांत उभी राहिलेली सुमन ओरडली, " नेहमीं पांचला उगवणारा तारा आज चारलाच कसा उगवला ! लायब्ररीनें आज फार लवकर सोडलें वाटतें ? "

" इश्श ! ' तारा हंसत वरती येत म्हणाली, " जसं कांहीं मला लायब्ररीने अगदीं बांधून ठेवले होते नाहीं ? काहीं तरीच बोलतेस तूं सुमे ! '

" कांहीं तरीच काय आहे ग त्यांत ! " सुमनने प्रश्न टाकला, " अग, लायब्ररीनें नसेल बांधून ठेवले ! पण मिल्टन, शेक्सपिअर वगैरे लोक तर कुठें गेलें गेले नव्हते ना ? बरं पण, आज लवकरशी आलीस ? अभ्यास होईना वाटतं तिथं ? "

" अग' आज एक गंमतच झाली ! " तारा सुमनच्या खोलींत शिरून कॉटवर बसत म्हणाली, " आज मी ते Hudson चं Introduction क्लेम करून ठेवलं होतं ना ? ते म्हणे आज कुणीं प्रोफेसरनीं issue करूनच नेलं आहे. मग तिथ बसून तरी काय करायचं ? तेव्हां म्हटलं खोलींत जाऊन Solid Geometry तरी बघावी थोडी ! "

"अग पण Introduction च्या दोन copies आहेत ना लायब्ररींत?" सुमननें विचारलें!

" हो ! पण दुसरी मुलांच्या Section मधें engage झाली होती ! " तारा म्हणाली, " तेव्हां थोडा Hazlitt चाळला अन् आलें झालं परत !"

" म्हणजे ? Hazlitt चा Milton वाचलास वाटतं तूं ! बघूं बघूं काय उतरून घेतलंस त्यांतलं ! ,' असें म्हणत सुमन तारेच्या हातून वह्या घेऊं लागली. पण एकदम चपापून ती म्हणाली, " अगबाई, तारे, चांगलंच तापलं आहे तुझं अंग ! ताप आलायू वाटतं ? "

" खरंच ? " तारेनें विचारले, " असेल बाई ! मलाही आज कसं अंग मोडून आल्यासारखं वाटायला लागलंय् सकाळपासून ! "

" अन् अशा स्थितींत तूं सारखी अभ्यास करते आहेस ! " सुमन तिच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाली, " तारे, बरं नाहीं हंऽ हे ! "

" पण गडे, मी तरी काय करूं मग ? " तारा तिच्याकडे पहात म्हणाली, " परीक्षा पंधरा दिवसांवर आली आहे. अभ्यास नको करायला ?"

" पण इतका अभ्यास ? " सुमन म्हणाली, " आजारी पडायचं आहे वाटतं अशानं ऐन परीक्षेच्या वेळीं ! खरंच तारे, दोन दिवस तूं विश्रांति घेतलीस तर ! "

" दोन दिवस ? " तारा एकदम आश्चर्यानें म्हणाली, " इश्श ! नुसता आज ताप आलाय् तर केवढ लावलं आहेस त्याचं तूं ! परीक्षा पंधरा दिवसांवर, अन् दोन दिवस फुकट घालवूं म्हणतेस ? कमाल करतेस बाई तूं ! "

" खरच तारे, मी अगदीं seriously सांगते आहे तुला ! तूं कधीं या चार महिन्यांत आरसा पाहिला आहेस कां ग ? हा बघ बरं आरसा ! " सुमन तारेच्या हातांत टेबलावरचा आरसा देत म्हणाली, " अन् पहा, " सोलापुराहून दिवाळीच्या सुमारास आलेली तारा अन् ही तारा एकच आहे कां ? बघ, बघ ना थोडं आरशांत ? बाजूला काय ठेवतेस असा ! "

" आतां हें बघ, " तारा हंसून म्हणाली, " सोलापूरला गेल्यावर किनई मी अगदीं तूं सांगशील तसं वागेन ! तूं सांगशील तितकं लांब फिरायला येईन, तूं सांगशील तितका Exercise घेत जाईन, अंऽ ! मग होईन ना मी पूर्वीची तारा ? "

" पण परीक्षेची काय व्यवस्था ? " सुमननें विचारलें.

" कसली व्यवस्था ? " तारेने आश्चर्यानें प्रश्न टाकला.

" अशा रीतीनें प्रकृतीची हेळसांड करून तूं जर अभ्यास करूं लागशील तर परीक्षेच्या सुमाराला खात्रीनें आजारी पडशील. " सुमननें आपलें प्रामाणिक मत दिलें.

" अग पडले तर पडले आजारी ! तारा मिस्किलपणे हंसून म्हणाली, " तूं आहेसच ना शुश्रूषा करायला ? "

" हंसूं नकोस तारे ! " सुमन गंभीरपणाने म्हणाली, " मी तुला अगदीं जीव तोडून सांगतें अन् तूं सारं हंसण्यावारीच घालवते आहेस ! "

" अग हंसूं नको तर काय करूं ? " तारा हंसत म्हणाली, " एक दिवस कुठें थोडा ताप आला नाहीं तों काय मनोरे रचतेस त्याच्यावर ? "

" एक दिवस ! " सुमन तिच्याकडे पहात म्हणाली, " खोटं बोलूं नकोस हंऽ तारे ! आज सातआठ दिवस पहाते आहे मी. नेहमीं तुझा चेहरा कसा आजारांतून उठल्यासारखा दिसत असतो ! अंहंऽ ! नाकबूल करूं नकोस तूं ! आज सातआठ दिवस तूं आपलं दुखणं लपवून ठेवते आहेस ते मी तेव्हांच ओळखलं होतं ! सांगेन सांगेन म्हणता म्हणता आज वेळ आली ! "

" जाऊं दे गडे त्या गोष्टी ! " तारा रिस्टवॉचकडे पहात मधेच म्हणाली, " बरं ! मी जातें आतां खोलींत ! अद्याप Solid Geometry बघायची आहे. "

" आलीस पुन्हां मुद्यावर हंऽ ! " सुमन म्हणाली.

" वा ग वा ! मग मूळ परीक्षेचा मुद्दा सोडूं काय ? बरीच आहेस कीं ! " तारा हंसून पुस्तकें घेत म्हणाली, " परीक्षा पंधरा दिवसांवर...... "

" हंऽऽऽ ! " सुमननें मधेच दीर्घ निश्वास टाकला. " तुला कितीहि सांगितलं तरी उपयोग काय म्हणा ! "

" बरं ! मग सहाला फिरायला जातांना ये हं माझ्याकडे ! " असे बजावीत तारा निघून गेली.

तारा अन् सुमन या दोघींचेहि वडील सोलापूरचेच ! दोघांचीही विशेष मैत्री असल्यामुळें एकाच बंगल्यांत दोघेही रहात होते ! अन् त्यामुळेच तारा अन् सुमनच्या मैत्रीला हें मूर्त स्वरूप प्राप्त झालें होतें, पण दोघी मैत्रिणीमध्ये किती तफावत ! एक स्कॉलर तर दुसरी स्पोर्ट ! तारा इंटर-आर्टसूला पहिला वर्ग मिळवायचा प्रयत्न करीत होती तर सुमननें Sports मध्यें चांगलेंच प्राविण्य मिळविलें होतें. शिवाय सुमन बोलकी असल्यामुळें

सगळ्या मुलींची ती आवडती होती तर तारेबद्दल मुलींना स्कॉलर म्हणून आदर वाटत होता. पण ही तफावत त्यांच्या मैत्रीला बिलकुल बाध आणत नव्हती. उलट विरोधाने मैत्री जणूं काय वाढतच होती.

पुढील पंधरा दिवस दोघींचे असेच धांदलींत गेले. सुमनचा बराच अभ्यास राहिल्याने ती अगदीं गभीर झाली होती, तर तारेला सगळा Portion, revise करायचा असल्यानें तिलाही वेळ मिळत नव्हता. या दिवसांत रेसिडेन्सीलाही मोठें गंभीर स्वरूप प्राप्त झालें होतें. सारे गप्पा क्लब केव्हांच बंद झाले होते. एकेकीच्या खोलींत रात्रीं बाराबारा, एकेक वाजेपर्यंत लाईट्स दिसू लागले! पूर्वीं गजबजलेले Tennis court आतां भकास दिसूं लागले. Bath-Room मधून पूर्वीं ऐकूं येणारे आलाप सुद्धां आतां विशेष ऐकू येईनासे झाले.

हां हां म्हणतां परीक्षेचा दिवस येऊन ठेपला. सकाळचा साताचा सुमार होता. तारा Paradise Lost चं explanation पाहण्यांत गढून गेली होती! इतक्यांत......

" टक् टक् टक्! " दरवाज्यावर टॅपिंग ऐकूं आलें.

" कोण आहे? " तारा त्रासून म्हणाली. तिला असा disturbance खपला नाहीं. " सुमे तूं कां! थोड्या वेळाने ये गडे! "

" तारे, दार उघड बघूं! " सुमनचा आवाज ऐकल्याबरोबर तारा दचकून उठली. एखाद्या आजाराने अशक्त झालेल्या माणसाप्रमाणे सुमनचा आवाज येत होता. तिनें झटकन् दरवाजा उघडला. अन् बाहेर उभी राहिलेल्या सुमनला पाहिल्याबरोबर एकदम दचकून दोन पावले मागेंच सरली.

सुमन दरवाजाचा आधार घेऊन उभी होती. तिचा चेहरा आरक्त झाला होता. अन् हात तरी किती कांपत होते.

" अगबाई, सुमन, " तारेनें आश्चर्यानें विचारलें, " काय झालंय तुला? चेहरा किती लाल झालाय् तो? "

" तारे, डॉक्टरला घेऊन येतेस कां जरा? " सुमन हळूं हळूं आंत येत तारेच्या कॉटवर बसत म्हणाली, " आज दोन वाजेपासून छातींत कशा कळा येऊं लागल्यात माझ्या? अन् डोकं भारी जड झाल्यासारखं वाटतं?"

" अगबाई, चांगलाच ताप आला आहे सुमे तुला ?" तारा सुमनच्या अंगाला हात लावून म्हणाली, "अन् दोन वाजेपासून छातींत कळा येताहेत. अन् आतां सांगतेस काय ! वा ग वा ? "

"अग, मला इतकं serious वाटलं नाहीं ? अन् अपरात्रीं कुणाला त्रास द्यायचा ! पण आतां कळा फारच असह्य झाल्यात गडे ? " सुमन छातीवर हात ठेवून विसाव्याकरितां दोन मिनिटं थांबली, " मला तेरवांपासून रात्रीं सारखी थंडी वाजून येत होती. पण परीक्षेच्या धामधुमीत तिकड विशेष लक्ष दिलं नाहीं मी ! "

" चांगलं आहे ! " तारा तिच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाली, " दुसऱ्याला सांगे ब्रह्मज्ञान...अन् स्वतः मात्र दुखणं लपवून ठेवायचं, हंSSS ! तुझ्यापेक्षा मला परीक्षा जास्त होती वाटतं ! अगबाई, किती कापतेस सुमे तूं ! थंडी फार वाजते आहे कां ? नीट इथेच नीज ना तूं कॉटवर ! मी आतां डॉक्टरला घेऊन येतें. "

सुमनच्या अंगावर रग टाकीत तारेनें विचारले, " आणखी पाहिजे कां पांघरायला सुमे ? रहाते कां थंडी यानें ? नाहीं तर तुझ्या खोलींतला रग आणतें आणखी ! "

" हं आण गडे लवकर तो ! " सुमन क्षीण आवाजांत म्हणाली, "थंडी किती वाजते आहे म्हणून सांगूं ! "

तारेनें ताबडतोब सुमनच्या खोलींतून रग आणला व सुमनच्या अंगावर घातला !

" मी डॉक्टकडे जाऊन येतें हंS ! " तारा पायांत चप्पल घालीत व दार लोटून घेत म्हणाली.

" हो सुमे..." दार लावतां लावतां तारेनें एकदम विचारलें, " आपल्या तारामतीला पाठवूं कां तुझ्याजवळ बसायला मीं येईपर्यंत ? "

" नको नको ! " सुमन म्हणाली, " तिला नको उगीच त्रास ! मला कांऽहीं होणार नाहीं तूं येईपर्यंत ? जा तूं ! "

तरी पण तारेनें जातां जातां तारामतीला सुमनकडे बघायला सांगितलेंच! अन् पांच मिनिटांत सुमन आजारी असल्याची बातमी सारीकडे पसरली.

सगळ्यांचीच ती आवडती असल्यामुळे सारा मुलींचा घोळका तारेच्या खोलीकडे वळला. पांच मिनिटात ताराही प्रिन्सिपॉलला घेऊन आली व दहा मिनिटांनीं डॉक्टरचीहि मोटार फाटकासमोर घडकली.

थोड्याच वेळांत डॉक्टर आणि प्रिन्सिपॉल कांहींशा चिंताग्रस्त चेहेऱ्यानेच बाहेर आले.

" Serious case आहे फार ! " डॉक्टर हलक्या आवाजांत म्हणाले, " " न्युमोनियाने दोन्ही लंग्ज बिघडून गेलेत अगदीं ! दोन-तीन दिवस आजारांत परिश्रम केल्याचा परिणाम आहे. "

" मग ! " प्रिन्सिपॉलनीं चिंताग्रस्त चेहेऱ्याने विचारले, " हॉस्पिटल-मध्यें नेता येईल कां यांना ! "

" छे ! शक्य नाही ! " डॉक्टरनीं सांगितलें, "अशा स्थितींत रोग्याला तर बिलकुल हलवतां येत नाहीं. अन् शुश्रूषासुद्धां फार काळजीपूर्वक व्हायला पाहिजे यांची ! गावांत यांचे कुणी relatives नाहींत का ? कारण यांच्या वडिलांना तार जाऊन ते येईपर्यंत यांच्याजवळ कुणी पाहिजेच! of course I will send a nurse ! पण We must not be wholly dependent on her !

" Relatives ! प्रिन्सिपॉल विचार करीत म्हणाले, " पण ते Miss Sathe ना विचारलें पाहिजे. त्या दोघींची चांगली मैत्री आहे. " असें म्हणून प्रिन्सिपॉलनीं तारेला बाहेर बोलावून घेतले.

" यांचे कुणी relatives आहेत कां गांवांत ? " प्रिन्सिपॉलनीं विचारलें.

तारेचा चेहेरा या प्रश्नाबरोबर एकदम पडला. दुखणं फार serious स्वरूपाच आहे हें तिला या प्रश्नाने चांगलेंच कळून आलें.

" छे ! कुणीच नाहीं ! " तिने उत्तर दिलें, " कां ? भारी serious आहे कां दुखणं ! " तारेचा आवाज गहिंवरलेला दिसत होता.

" बरं, पण यांच्या वडिलाना आता तार केली तर ते केव्हा येऊं शकतील ! " प्रिन्सिपॉलनें तिच्या प्रश्नाला उत्तर न देता उलट प्रश्न केला.

" संध्याकाळच्या मेलशिवाय गाडीच नाहीं दुसरी ! रात्रीं दोनच्या

सुमाराला येतील इथे ! " तारा म्हणाली. ती आतां चांगलीच घाबरलेली दिसत होती,

" चूचू ! म्हणजे रात्रीं दोन वाजेपर्यंत कुणीच नाहीं काळजीचं यांच्याजवळ बसायला ! " डॉक्टर जरा अस्वस्थ चित्ताने म्हणाले, " बरंय् मग मी नर्स देतो पाठवून हॉस्पिटलमधून ! We can't help it. "

" पण डॉक्टर, " तारेने गहिंवरलेल्या आवाजांत विचारले, " मीं तिची शुश्रूषा केली तर ? चालेल ना ? "

" तुम्हीं ! " डॉक्टरांनीं आश्चर्याने विचारले, " तुमची परीक्षा ना आज ? "

" पण मी परीक्षेला बसणार नाहीं ! " तारेने खुलासा केला,

" काय ? " प्रिन्सिपॉलनीं एकदम दचकुन विचारले, जिच्यावर कॉलेजची hope तीच परीक्षेला बसणार नाहीं हे कळतांच त्यांना एकदम shock बसला, " खरं म्हणतां तुम्ही हें ? You don't mean to say...

" सर " तारेच्या डोळ्यांत आतां पाणी आले, " माझी मैत्रीण इतकी serious अन् मी परीक्षेला बसूं तरी कशी ? पेपर लिहायला तरी मला सुचेल का ? "

" हें पहा मिस् साठे, " प्रिन्सिपॉल थोडे सानुकंप दृष्टीने तारेकडे पहात म्हणालें, " तुमच्या मनःस्थितीची मला कल्पना नाहीं असं कां तुम्ही समजतां ! तुमच्या मैत्रिणीची प्रकृति serious आहे हे खरं ! पण तुम्ही तरी त्यांच्याजवळ राहून विशेष काय करणार! अन शिवाय तुमची तयारी—"

" पण सर..." तारा एकदम मधेंच निश्चयी आवाजांत म्हणाली, "या बाबतींत तरी तुम्ही माझं मन वळवण्याचा प्रयत्न करूं नका ! माझा निश्चय अगदीं पक्का झाला आहे. " असे म्हणून तारा सुमनकडे खोलींत गेली. प्रिन्सिपॉल आणि डॉक्टर ती जिकडे गेली त्या दिशेकडे आश्चर्याने पहातच राहिले.

अन् सुमन आजारी पडली या बातमीपेक्षांही जास्त commotion तारा परीक्षेला बसणार नाहीं या बातमीनें झालें. बहुतेकजण हळहळूं लागले.

तारेची तयारी सगळ्यांना माहिती होती व ती पहिल्या वर्गात येणार याबद्दल कुणालाच शंका वाटत नव्हती. कित्ती जणींनीं तिचे मन वळवायचा प्रयत्न केला ! खुद्द सुमनने क्षीण आवाजांत एकदां सांगून पाहिले ! पण अंह ! तिचे आपले एक उत्तर ! " आपली मैत्रीण इतकी serious असतांना आपण परीक्षेला बसण शक्य नाहीं. "

दुसरे दिवशीं सकाळच्या एक्सप्रेसने सुमनची आई, तारेची आई, व दोघींचेहि वडील आले. पण सुमन त्यावेळीं त्यांना ओळखण्याच्या स्थितींत नव्हती.

दहा दिवस सुमन मृत्यूशीं जणूं कांहीं झगडाच खेळत होती, पण सर्वांच्या....विशेषतः तारेच्या....अविश्रांत श्रमाने सुमनचा मृत्यू टळला व ती बरी होण्याच्या पथाला लागली. तरी पण अशक्ततेमुळे तिचा आजार उलटण्याचा फार संभव होता, म्हणून डॉक्टर तिला हलवायचा बिलकूल सल्ला देत नव्हते. पधराव्या दिवशीं डॉक्टरच्या सल्ल्यानीं तिला डेक्कन जिमखान्यावरील बंगल्यात नेण्यात आले.

सुमनच्या आजाराचा हा १६ वा दिवस ! तिची प्रकृति बरीच निवळली होती, पण अद्याप अशक्तता बरीच होती. बिछान्यावर तिला अर्ध्या तासापेक्षा जास्त बसवतही नव्हते.

सकाळच्या सातचा सुमार होता. सुमन कॉटवर कसल्या तरी गूढ विचारात गुंग होऊन वरच्या आढ्याकडे पहात पडली होती. इतक्यांत तारा आंत आली

" अगबाई, उठलीस वाटतं ? " सुमनकडे पहात तारा म्हणाली, " औषधाची वेळ झाली आता ! घ्यायचं ना ! "

" अंऽ औषध होय !" एकदा तंद्रींतून जागी होऊन सुमन म्हणाली, " नको गडे इतक्यांत ! भारी कडू आहे गऽ ! "

" असं काय बर करतेस सुमे ? " तारा तिच्या शेजारीं बसून तिचे केस सारखे करीत म्हणाली, " लवकर बरं नाहीं कां व्हायचं आता ? अगदीं लहान मुलाच्या वर करतेस गडे तू ! औषध घेतल्यावर मोसंब्याची फोड खा म्हणजे झाल ! मग घेतेस ना ? थांब हं ! मी मोसंब सोलते तोपर्यंत !"

" तारे, गडे किती खटपट करतेस ग तूं माझ्याकरतां ! " सुमन तिच्याकडे पहात म्हणाली, " माझ्या सख्या बहिणीनं सुद्धां इतकं केलं नसतं ! "

" हे बघ सुमे, " तारा हंसत म्हणाली, " माझी स्तुति करायची आहे कां तुला? मग ती बरी झाल्यावर कर ना गडे? पण आपण स्तुतीचं ताम्हण एकमेकींच्या चेहेऱ्याभोंवतीं फिरवूं म्हणे ! पण आतां स्वस्थ पड जरा ! डॉक्टरांनीं तुला पूर्ण विश्रांति घ्यायला सांगितलं आहे ना ? "

" अहंऽ !" सुमन म्हणाली, " आज मी कुण्णाचं ऐकणार नाहीं. आज मला बोलायची लहर आली आहे. हें बघ तारे, इकडे बघ ना जरा ! मला अगोदर हे सांग कीं, मी इतकी जीव तोडून सांगत असतांना तू परीक्षेला कां बसली नाहींस ? फार रागावलें आहे मी तुझ्यावर त्याबद्दल ! "

" सुमे, कितीदां अन् किती जणाला उत्तर देऊं या प्रश्नाचं ? " तारा मोसंब सोलीत म्हणाली, " तू इकडे serious, अन् मला पेपर लिहिणं तरी शक्य होतं कां ! अन् अशा प्रसंगीं सुमे, तूं स्वतः तरी काय केलं असतंस ग ? "

"माझी case अगदीं निराळी आहे तारे!" सुमन म्हणाली, "माझ्यावर कॉलेजचा honour इतका dependent नाहीं. पण गडे, तूं बसली नाहींस म्हणून कॉलेजचा एक First class गेला ना ! "

" पण पुढल्या वर्षीं मी तो honour कॉलेजला मिळवून देणार नाहीं असं कां वाटतं तुला ? " तारा हंसत म्हणाली, " पण जाऊं दे गडे तो विषय ! हें मोसंब सोललं पहा ! घेतेस ना औषध आतां ? "

" राहूं दे ते थोडे बाजूला ! " सुमन म्हणाली. " जरा माझ्या शेजारीं बैस पाहूं ! अशी नको. इऽ अशी ! आतां माझ्याकडे पहा पाहूं ! "

" म्हणजे ? " तारा तिच्याकडे पहात हंसत म्हणाली, " वेड तर नाहीं लागलं तुला सुमे ? काय पाहिजे तुला ? "

" बस्स ! मला पाहिजे होते तें सांपडलें ! " सुमन आनंदाने हंसत म्हणाली. " आण पाहिजे तर औषध आतां तू ! "

" म्हणजे ! " तारा गोंधळून म्हणाली, " सांपडलं काय ? अन् गेलं होत कुठं ? सुमे शुद्धीवर आहेस ना ? काय सांपडलं तुला अन् कुठें ? "

" निर्व्याज प्रेम !" सुमन आपल्याच आनंदात होती, " तुझ्या नजरेत मला आज ते सापडलं ! इतके दिवस जवळ असूनही मला ते दिसलं नाहीं ! वेडी समजू नकोस मला तारे ! पण गडे, तुझी खरी किंमत मला या पंधरा दिवसात कळून आली."

" संभाळ हंऽ सुमे, तारा हंसून म्हणाली, " मला तर तुझी चिन्हं ठीक दिसत नाहींत बाई ! कवयित्री होण्याची पूर्वचिन्हं दिसताहेत !

" थट्टा करूं नकोस तारे ! सुमन गंभीरपणे म्हणाली, " खरंच सांगते तारे मी इतके दिवस तुला Scholar या पलीकडे विशेष समजत नव्हते ! I never thought you would make yourself a best friend. पण माझी ही समजूत खोटी ठरली याचा मला किती आनंद होतोय् !"

" मग उतरले म्हणतेस मी तुझ्या परीक्षेला !" स्टुलावरची औषधाची बाटली घेऊन ती हलवीत तारेने हसत विचारले.

" अगदी पहिल्या वर्गात !" सुमनने हंसत उत्तर दिले.

" खरंच सुमे," तारा जरा गंभीर झाली, " किती अवघड गेली परीक्षा मला ही ! युनिव्हर्सिटीच्या परीक्षेची मी तयारी तरी केली होती ! पण ही परीक्षा किती अनपेक्षित ! मनाची बिलकुल तयारी नसल्याने किती त्रास पडला मला मन शांत करायला ! खरच सांगते सुमे, दोन तीनदा माझे मनोविकार इतके प्रबळ झाले होते कीं मी एकटी खोलींत जाऊन किती वेळ रडत होते ! बाकी..." तारा हंसत म्हणाली, " इतके कष्ट केल्यासरशी परीक्षकाने पहिला वर्ग दिला हे नशीब ! नाहीं ? त्या नाहीं या परीक्षेत तरी पहिला वर्ग !"

" खरच तारे, किती किती चांगली आहेस ग तूं !" सुमन तिच्याकडे पहात म्हणाली, " अशी मैत्रीण मिळाल्याबद्दल खरोखर बाकीच्यांनीं माझा हेवा केला पाहिजे !"

" बरं बरं !" तारा ग्लासात औषध ओतींत म्हणाली, " फार गोड बोलायला लागली आहेस तू ! कडूं औषध घे हे थोडं, म्हणजे ताळ्यावर

येशील ! " तारेनें तिच्या तोंडाला ग्लास लावला अन् लागलीच सोललेली मोसंबीची फोड तिच्या जिभेवर ठेवली.

"बरं मी जाऊं ना आतां ? " तिच्या आंगावरचे पांघरूण नीट करीत तारा म्हणाली, " माझं अंग धुणं व्हायचं आहे अद्याप ! तुला कांहीं नकोना आतां ? मग माझं आटोपल्यावर मी एक नवीन गंमत आणली आहे, ती वाचूं हंऽ ! "

" कसली गंमत गऽ ? " सुमननें उत्कंठेनें विचारलें.

" अहंऽ ! त्याच वेळेला दाखवीन मी तुला ! आत्तां नाहीं ! " असें म्हणून तारा खिडकीचा पडदा नीट लावून निघून गेली.

अन् सुमनही वरच्या आढ्याकडे पहात आपल्या तंद्रींत गुंग झाली.

---

# रंगीत तालीम 

कमलः—प्रॉम्टर. विमलाः—प्रॉम्टर. सरलाः—शिवाजी. उषाः—जिजाऊ
प्रमिलाः—सईबा. ताराः—तानाजी. वनमालाः—येसाजी.
इंदुमतीः—अफझुलखान. नलिनीः—तिरमारखा
मावळे, खानाचे शिपाई वगैरे.

( स्थळ:—Girl's High-school चा असेंब्ली हॉल ! स्टेजच्या पुढच्या बाजूस एक रंगीत पडदा सोडलेला आहे. बाहेरच्या बाजूस खुर्चीवर बरेच प्रतिष्ठित गृहस्थ व स्त्रिया बसलेल्या आहेत. त्यांच्या मागल्या बाजूस कांहीं आगातुकीने व कांहीं स्वतःच्या बहिणीच्या वशिल्याने प्रवेश मिळविलेले कॉलेजचे विद्यार्थी ! दुसरा मजला मुलींच्या घोळक्याने अडवलेला ! सर्वजण आपसात गप्पा मारण्यांत गुंग झाल्यामुळे रंगभूमीच्या बाहेरच बाजारचा प्रवेश चालला आहे कीं काय असा भास होतो. बहुतेकांच्या तोंडी रंगीत तालिमींविषयीं चर्चा चालली आहे व अद्याप पडदा कसा उघडत नाहीं, म्हणून बरेचजण रिस्टवॉचकडे पहात आश्चर्य प्रगट करीत आहेत. आंतील बाजूः—सरला, तारा, इंदुमती वगैरे मुली, कुणी फेटा बांधण्यात, कुणी दाढी नीट बसवण्यात, तर कुणी मिशा नीट डकविण्यांत गुंग होऊन गेल्या आहेत. इतर मुली धांवपळ करून मदत करण्याऐवजीं उलट गोंधळच करीत आहेत. डायरेक्टरीण सरस्वतीबाई प्रत्येकीची वेषभूषा नीट होते कीं नाहीं हें पहात व प्रत्येकीला Direction देत हिंडत आहेत. )

सरस्वतीबाईः—( इकडे तिकडे हिंडत व घाई करीत ) बाई, बाई ! कमाल झाली हं ऽ साडेनवाला सुरवात व्हायची, ते साडेदहा व्हायला आलेत ! अद्याप नाहीं आटोपलं तमचं ? भागीरथ बाई वेंधळ्या तशी !

आटपा—आटपा लवकर ! इंदे, दाढी कशी बांधली आहेस ? नीट जरा वर घे सरकावून ! अन् मिशा जरा बाजूला घ्यायच्या ! कुणी बांधली ग तुझी दाढी ? इकडे ये पाहूं जरा !

इंदुमतीः—किती लांब मेली ही ! लहान दाढी घेतली तर नाही का चालायच बाई ?

बाईः—गाढव आहेस तूं इंदे अगदीं ! अफझुलखानाची दाढी लहान असल्याचे वाचले होतेस का कुठे ? ( तिची दाढी नीट बांधते ) पहा बरं बसली कां नाहीं नीट आता ! पाहूं ! ( लांबून इंदुमतीकडे पहाते ) वा ! आता सजला खरा अफझुलखान ! पण हा विजारीचा पठाणी घोळ जरा सावरूनच हंऽ ! नाहींतर पायात अडकून घालायचे खानसाहेब लोटांगण !

इंदुमतीः—इश्श ! ( पण आपल्या सोंगाकडे समोरच्या आरशांत पाहिल्याबरोबर तिचे तिलाच हसे आवरत नाहीं. )

सरस्वतीबाईः—( वनमालेकडे वळून ) अहो कंक, आटपा आता ! कां फेटा नाहीं जमत वाटतं ! अशी कशी ग तूं ? ( फेटा बांधूं लागते )

वनमालाः— पण बाई, तारेला दाढी कुठे ?

सरस्वतीबाईः—करायची काय तिला दाढी ? नाहींतरी तानाजीला दाढी नव्हतीच ! ( फेटा बांधून झाल्यावर ) झालं ? पण काम चालू असतांना फेटा पडूं देऊं नकोस हंऽ ! नाहीं तर हा येसाजी की येसूबाई हा लोकांना प्रश्न पडायचा ! ( साऱ्या हंसतात ) अहो शिवाजी महाराज, दाढीला गम् नीट लावलाय् ना ! नाहीं तर हातात यायची हंऽ ! झाली सगळ्यांची तयारी ? वा, उषे, तुला कुंकवाची आडवी कोर लावायला सांगितली होती ना ? जिजाऊ काहीं १९३० सालातली फॅशनेबल मुलगी नव्हती येवढं बारीक कुंकू लावायला ! जा, कोर लाव लवकर ! झालं सगळं ! हंऽ ! सिंधु, बिंदु, मालती, या इकडे ! पडदा उघडला कीं तुम्ही न घाबरतां शिकवलेलं पद म्हणायचं, बरं कां ? घाबरायचं नाहीं ! मालती, हे तबक ठेव तुझ्या हातांत ! पद संपलं कीं गुलाल उधळायचा आणि आंत यायचं ! राहील ना लक्षात ? जाऊं मी ? तयार रहा बरं कां ? मी बाहेर थोडें भाषण करून येतें हंऽ !

( सरस्वतीबाई पडद्याबाहेर येतात. त्यांना पाह्यल्याबरोबर सारेच एकदम शृशृशृSS ! करून शांतता प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करितात. दोन मिनिटांनीं सगळीकडे पूर्ण शांतता ! आतां नाटकाच्या Prologue ला सुरवात झाली असं समजायला कांहीं हरकत नाहीं. )

सरस्वतीबाई:——( गंभीरपणें ) सभ्य स्त्री पुरुषहो, आमच्या रंगीत तालमीला आपण इतके जण हजर आहांत हें खरोखर आम्हांला उत्तेजनकच आहे ! हल्लींच्या काळीं हिंदुस्थानची आर्थिक परिस्थिति किती बिकट झाली आहे हें आपण सर्वजण जाणतांच आहांत ! ( दोन्ही हातांत रुमालाचा बोळा करीत ) तेव्हां अशा वेळी Girls High-School लाही त्याची झळ लागली असल्यास नवल नाहीं. ( रुमालाची डाव्या हाता-भोवतीं गुंडाळी ! ) पण प्रत्येकवेळीं नागरिकांपाशीं आर्थिक साहाय्याची याचना करणें हें आम्हांलासुद्धां जरा......कसेसेंच वाटतें. म्हणून त्यांच्या सहाय्याच्या मोबदल्यांत त्यांची अल्पशी सेवा करण्याच्या हेतूनें ही नाटकाची टूम काढली आहे. नाटक ( बांगड्यांची चाळवाचाळव करीत किंचित् अभिमानानें ) अर्थात् मीच लिहिलें असल्यानें मी त्यावर जास्त बोलूं इच्छित नाहीं. पण काम करणाऱ्या मुली अगदीं नवख्या असल्याकारणानें प्रथमच रंगभूमीवर पदार्पण करतांना जरा.. हें...... व्हायचा संभव आहे. तरी त्यांच्याकडून कांहीं चूक झाल्यास त्यांचा पहिलाच प्रयत्न म्हणून... ( पुढे कांहींच आठवत नाहीं. गोंधळलेल्या चेहेऱ्यानें आठवण्याचा प्रयत्न करितात. त्यांची स्थिति पाहून audience च्या चेहेऱ्यावर हास्य व त्यांच्या कपाळावर घर्मबिंदू चमकू लागतात. ( इतके बोलून मी आपली रजा घेतें. ( गडबडीनें आत जाऊं लागतात. घाईंत पातळाचा घोळ पायांत अडकून अडखळतात. सगळीकडे हंशा. शेवटीं त्या आंत गेल्यावर तिसरी घंटा होते.)

पडदा उघडतो.

## नांदी.

( सिंधु, मालती व बिंदु अगदीं जवळजवळ उभ्या आहेत. मालतीच्या थरथरत्या हातांत तबक आहे. पडदा उघडल्यावर तिघी गाण्याला सुरवात करितात. )

प्रथम नमन त्याऽ प्रभुवराऽऽऽ । प्रेक्षक वृंदाऽऽऽविनति हीच

मग ऽऽ ॥ ध्रु ॥

प्रथम कृतीऽ मम दोषाऽऽ स्पद जरीऽऽ । आपुलकीऽऽऽनें क्षमाऽऽ करोनीऽऽ । शांतपणेऽ अवलोऽकनऽऽ करण्याऽऽविनति हीऽऽऽच मग ॥१॥

( तान घेतां घेता चुकून सिंधूच्या हाताचा धक्का मालतीच्या हातातील तबकाला लागतो. तबक खालीं गळून पडते व मालतीच्या अंगावर सर्व गुलाल सांडतो. तिघीही गोंधळून एकमेकींकडे पाहतात. सगळीकडे हंशाचा गोंधळ ! )

मालतीः—( हलके ) हे ग काय सिंधू ? असा कसा धक्का दिलास ?

सिंधू:—( रागांत आपण कुठ आहोत हें विसरून ) मी ग कधीं दिला ? वा वा आपणच.......( पण वाक्य पुरे होण्याच्या अगोदरच सारे लोक हंसूं लागतात. कॉलेजग्रूपच्या भ गांतून टाळ्यांचा गोंधळ ! शेवटीं विंगमध्ये उभ्या असलेल्या सरस्वतीबाईच्या खुणेवरून तिघीही टाळ्यांच्या कडकडाटांत आंत जातात. तबक तेथेच पडतें. ) पडदा पडतो.

## प्रवेश पहिला

( प्रतापगडावरील एका महालाचा देखावा ! मध्यभागीं वर गादी घातलेली एक किर्लोस्कर स्प्रिंग कॉट् टेवली आहे. उजव्या बाजूला एक कोच व डाव्या बाजूला चार पांच खुर्च्या आहेत शिवाजी अस्सल मराठेशाही वेषात प्रवेश करितो. पायांपेक्षां चढाव बराचसा मोठा असल्यानें त्याचा जोडयासारखाच उपयोग होत असतो. डोक्यावर तुऱ्याची टोपी तिरपी बसलेली असते. उजव्या बाजूच्या विंगमध्ये कमल व डाव्या बाजूच्या विंगमध्यें विमल बसली आहे. पडद्यामागें एकही प्रॉम्टर नाहीं. )

शिवाजीः—( थरथर कांपणारा हात तलवारीवर ठेवून कांपऱ्या व बारीक आवाजांत ) अस्सं ? म्हणजे या विजापूरकरांची मजल येथवर आली हंऽ ? देशमुखांना पकडण्याची यांना छाती होईल अशी माझी कल्पना पण नव्हती. अरेरे ? असे माझे एकेक मदतनीस जाऊ लागले तर ही स्वराज्याची इमारत तरी कशी पुरी होणार ? ( रंगभूमीवर दोन चार चकरा; विमल व कमल एकमेकींकडे पाहून हंसतात ) आणि याला कारण ( दांत

ओठ खात ) तो घोरपडे ! असे निमकहराम जर हिंदुस्थानात निर्माण होऊं लागले तर ही स्वराज्याची इमारत ढासळून पडेल यांत काय संशय ? परमेश्वरा...( गातो )

विनति तुजला हीऽपरमेश्वराऽ ।। धृ ।।

निर्मू नको तू निमकऽहराऽमा । वणवा बघऽ देशांऽत पसरतो ।
कारण तेच तयाऽऽलाऽऽ

धर्म रक्षण कराऽवयाऽऽला । मातृभूमि स्वतंत्र करण्या ऽऽ
बल दे तू मज सखयाऽऽऽ परमेश्वराऽऽ ।।

( गाणे गाताना ताना घेत घेत पुढे येतो तोंच खालीं पडलेल्या तबकाला पाय लागून मोठा आवाज होतो. सगळे हंसू लागतात व टाळ्यांच्या गजरांत गोंधळलेल्या शिवाजीचे गाणें बंद पडतें. )

शिवाजी:—( टाळ्याचा गजर थांबल्यावर ) आज माझा डावा डोळा कां लवतोय बरं! छे ! हे काहीं चांगले लक्षण नाहीं. आज पुन्हां इथे येतांना मांजरही आडवं गेल ! काय प्रकार असावा काहीं कल्पना येत नाहीं. कदाचित् ... ( घुटमळतो. पुढे काहीं आठवत नाहीं.विंगकडे जात हलक्या आवाजांत ) ए विमे, पुढे काय ग ?

विमल:—( शुद्धीवर येऊन ) पुढें ! कशाच्या पुढें ?

शिवाजी:—( रागानें हळूच ) अग ' कदाचित् ' च्या पुढें ! लवकर, लवकर ! सारे लोक हसू लागले बघ !

विमल:—( वही पहात ) कदाचित्च्या पुढें...अ ! हं ! रायबाला बोलावून.

शिवाजी:—( एकदम मध्यें घेऊन ) कदाचित् रायबाला बोलावून... ( पण हंसण्याच्या गोंधळांत वाक्य अर्धेच रहातें. ) रायबा ... ( अरे रायबा प्रवेश करितो. )

रायबा:—( मुजरा करून ) काय आज्ञा आहे सरकार ?

शिवाजी:— अरे तानाजी,येसाजी वगैरे आले असल्यास पाठवून दे पाहू!

रायबा:—जी सरकार ( मुजरा करून जातो. )

(शिवाजी स्प्रिंग कॉटवर बसतो, व हातावर गाल टेकवून विचारांत मग्न

असण्याचा चेहेरा करितो. इतक्यांत तानाजी, येसाजी व दोन मावळे प्रवेश करितात. चौघांनींही मावळी धर्तीचा पोषाख करण्याचा 'प्रयत्न' केला आहे. पण तानाजीच्या कॉलेजी फॅशनच्या काच्यामुळे, येसाजीच्या अंगांतील शर्टच्या कॉलरमुळ, व बाकीच्या दोघांना न शोभवल्याने त्यांच्या गौरवर्णामुळे सारेच कांही विचित्र दिसत. आल्याबरोबर सर्वजण शिवाजीला मुजरा करितात. )

शिवाजी:—( दचकून ) कोण तानाजी ! आलात ! बसा सर्वजण असे ! ( खुर्च्यांकडे बोट दाखवितो. येसाजी व तानाजी खर्चीवर बसतात. मावळे खालींच बैठक मारतात. कमलच्या बारीक आवाजातलि प्रॉम्प्टिंग खेरीज करून रंगभूमीवर पूर्ण शान्तता ! )

शिवाजी:—( तानाजीकडे पहात ) कां तानाजी ? आज चेहरा असा म्लान कां ? विशेष बातमी कळली कीं काय ?

तानाजी:—( शक्य तितका दुःखित व मोठा स्वर काढण्याचा प्रयत्न करीत ) सरकार, आज दुर्दैवाने एक अत्यंत वाईट बातमी कळविण्याचा प्रसंग माझ्यावर आला आहे. सरकार...( घुटमळतो )

शिवाजी:—( एकदम उठून ) काय ? कोणती ती बातमी ? आणि खंच, देशमुखाची काय खबर आहे ? कांहीं सुटकेचा प्रयत्न केलात का ?

तानाजी:—( डोळ्यांस सिल्कचा हातरुमाल लावीत ) सरकार आम्ही कांहीं खटपट करण्यापूर्वीच विजापूरकरांनीं त्याचा शिरच्छेद केला. आणि...

शिवाजी:—( मध्येंच ) काय ? शिरच्छेद केला ! अरेरे ! शेवटीं स्वराज्याची एक पायरी अशी निखळून पडली ना ? आणि विजापूरकरही इतके मस्तवाल झाले हऽ ! ठीक ! या वधाचं प्रायश्चित्त लवकर त्यांना भोगावं लागेल. आणखी कांही ?

तानाजी:—विजापूरकराच्या दरबारांतून आपल्याला ठार मारण्याचा विडा उचलून अफझुलखान नांवाचा सरदार आपणावर प्रचंड सैन्यानिशीं चाल करून आला आहे. त्याचा मुक्काम सध्यां शेजारच्याच अरण्यांत आहे.

शिवाजी:—(आश्चर्याने)काय ? शत्रू इतका जवळ आला तरी आम्हांला दाद नाहीं ? मग हे हेर करतात तरी काय ? कोण आहे रे तिकडे !

रायबा:—( प्रवेश करून ) सरकार, आईसाहेब बाहेर आल्या आहेत.

शिवाजीः—( रागाने ) मग गाढवा, आंत घाडून द्यायच्या कीं नाहीं ? ्खांसारखी वर्दी द्यायला आलास ? जा लवकर, आंत आण त्यांना ! रायबा मुजरा करून जातो. )

येसाजीः—( हळूच तानाजीस ) ए तारे, गडे माझी मिशी सरकूं ागली ग ! कसा मेल्यानें गम लावला कुणास ठाऊक ? आता ?

तानाजीः—( हळूच ) अगदीं अजागळ आहेस तू बने ! जा ात लवकर ! नीट गम् लावून चिकटवून ये ! जा पळ ! ( येसाजी टकन् आंत जातो. जिजाऊ प्रवेश करिते. सर्वजण उभे रहातात. )

जिजाऊः—( सगळीकडे पहात ) शिवबा काय झालय् आज ? असा लान चेहेरा का तुझा ! तानाजी, तुम्ही असे खालीं मान घालून कां उभे ाह्यलांत ? बोला, येसाजी तुम्ही तरी काहीं बोला ( सर्वजण येसाजीची रकामी जागा पाहून हसतात.जिजाऊ गोंधळते व पुढील भाषण विसरते.)

जिजाऊः—(हळूच शिवाजीस ) ए सरू, पुढे काय ग ? या गोंधळांत ाई भाषणच विसरलं माझं !

शिवाजीः—(हळूंच) इश्श ! मला ग काय विचारतेस ? मला तुझं भाषण ाठ आहे वाटत ? त्या कमीला विचार ! ( जिजाऊ विंगकडे जाऊं लागते. ागळीकडे हंशा !

कमलः—( हळूंच ) तुम्हाला कांहीं विशेष बातमी...

जिजाऊः—( एकदम Right about turn करून ) तुम्हाला कांहीं वेशेष बातमी कळली वाटतं ? ( हशा )

शिवाजीः—( दुःखित मुद्रेने ) मासाहेब, देशमुखांचा विजापूरकरांनीं शेरच्छेद केला.

जिजाऊः—( आश्चर्याने ) काय ? खरच ? आणि मग तुम्ही काय करत होतां ? तानाजी, येसाजी, तुमच्यासारखे पराक्रमी सेवक गादीचे आधारस्तंभ असताना तुम्ही हा शिरच्छेद होऊं कसा दिला? बोला ! त्यांना सोडवून आणण्याची एकाच्याही अंगीं हिंमत नव्हती का !

येसाजीः—( एकदम प्रवेश करून ) मासाहेब, आम्ही प्रयत्नांची पराकाष्ठा केली, पण...

जिजाऊः--पण काय ?

( येसाजी भाषण न आठवल्याने गोंधळून कमलकडे पहातो. बिचाऱ्या कमललाही भाषणाचा भाग लवकर सांपडत नाहीं. ती जिजाऊस एकदम गाणें म्हणण्यास सुचविते. त्याप्रमाणे अचानक जिजाऊ गाण्याला सुरवात करते. पण पेटीवाले व तबलेवाले बेसावध असल्यामुळें सूर व ताल नीट जमत नाहीं. सारा एकच गोंधळ उडतो. हशाचे फवारे मात्र फार उडतात.

जिजाऊः—

हा पराक्रमाचाSSसमय पहाSSआलाSSS ॥ धु ॥

दाखवि रिपुला । आपुल्या सर्व शौर्याला । नक्षा जिरवुनी सर्व तयाचा ।

वठणीवर आणा त्यालाSSसमय पहाSSआलाSS ॥ १ ॥

( जिजाऊ गाणें म्हणत असताना शिवाजी दाढीवरून हात फिरवीत असतो तो चुकून दाढीला गम् पुरेसा नसल्याने-दाढीच त्याच्या हातांत येते. सगळीकडे हंशाचा एकच गोंधळ उडतो. शिवाजी— I Mean सरला अगदीं गोंधळून जाते. गाणें आपोआपच बंद पडतें, शेवटीं डायरेक्टरीण-बाईच्या सूचनेवरून पडदा पडतो )

## प्रवेश दुसरा

( प्रतापगडाच्या शेजारचें अरण्य ! दाढी सांवरीत अफझुलखान व मराठ्याच्या वेषांत त्याचा हेर तिस्मारखां प्रवेश करितात. )

अफझुलखानः ( निम्म्या स्टेजवर आल्यावर हळूच तिस्मारखांस ) खरंच नले, येतांना तलवार उपसून आवेशानें यायचे विसरलेंच कीं ! आतां उपसूं कां ?

तिस्मारखांः-( हलकेंच ) मूर्ख आहेस तूं इदे अगदीं ! आतां तसंच सुरूं कर भाषण ! लवकर इंS ! त्या बघ बाई डोळे वटारून पाहूं लागल्या !

अफझुलखानः-( एकदम आवेशानें ) बस्स ! त्या हरामखोर शिवाजीला पकडून या तलवारीने ठार मारल्याशिवाय माझ्या मनाला शांती मिळणार नाहीं. ( तलवारीकडे हात नेतो. पण तलवारच आंत विसरून आल्यानें

गोंधळतो. सगळीकडे हंशा. ) काय करूंऽ ! त्याच्या नरडीचा घोट घेण्या-करितां माझे हात कसे शिवशिवताहेत ! त्याला एकदा माझ्या दृष्टिपथात तरी येऊं दे ? उभा चिरून काढतो नुसता ! तिस्मारखां........

तिस्मारखां:—जी हुजूर ?

अफझुलखान:—त्या शिव्याला कधीं पाह्यल आहेस कां तूं ?

तिस्मारखां:—नाहीं हुजूर ! पण त्याच्याबद्दल पुष्कळसे ऐकलं मात्र आहे. दिसायला अगदीं किरकोळ आहे म्हणतात. पण लढाईत फारच भारी !

अफझुलखान:—अरे ज्या ! एवढी काय प्रतिष्ठा लागून राहिली आहे त्याची ! डोंगरांतल्या बिळात लपून रहाणारा उंदीर तो ! ( आठवल्या-सारखे करून ) हो पण खरंच, तूं गेली होतीस....(एकदम जीभ चावून) भाषण बदलतो. ज्या थोड्यांच्या लक्षांत येते त्यांच्या चेहेऱ्यावर हास्य झळकतें मग करीमखानला सांगितलांस कां माझा निरोप ?

तिस्मारखां—(हसे दाबण्याचा प्रयत्न करीत ) हां हुजूर ! आपणाकडेच ते यायला निघाले होते. आपल्या तंबूपर्यंत ते पोचले पण असतील ? तो पहा हुजऱ्या आपणाकडे येतो आहे. ( हुजऱ्या प्रवेश करून कुर्निसात करतो. )

हुजऱ्या—हुजूर, करीमखां आपणाकडे आले आहेत. तंबूत वाट पहात बसले आहेत.

अफझुलखान:—आच्छा ! अब्बींसे अब्बी आयेंगे ! ( सारे हंसतात. हुजऱ्या जातो ) बरं तिस्मारखां, हिंडत तूं गडाच्या पायथ्याशीं जा, आणि कांहीं नवी बातमी कळते कां बघ ! मात्र सावधगिरी बाळग हं ! हल्लीं मराठ्यांचे हेर वाटेल त्या वेषात हिंडत असतात. फसूं नकोस. ( मुद्दाम जातां जातां वात्रटपणा करण्याच्या हेतूनें ) अल्ला तेरा भला करेगा, ( पुन्हां हंशा. दोघेही दोन दिशांनीं जातात. )

## प्रवेश तिसरा

( पडदा उघडतो. गडाखालचा देखावा. तिस्मारखां प्रवेश करितो )

तिस्मारखां:—बापरे ! हे मरगट्टे म्हणजे काय पाताळयंत्री प्राणी आहेत ! जिकडे तिकडे अगदीं कडेकोट बंदोबस्त ! इतकं वेषांतर बेमालूम केलंय,

पण खेड्यांतला प्रत्येक जण संशयानं माझ्याकडे टवकारून पहातो आहे. माझ्या वेषांतरांत कांही चूक तर नाहींना झाली ! ( स्वतःकडे पहाते ) My God.... ( एकदम जीभ चावते. हंशांचा आणि टाळ्याचा कड-कडाट, डायरेक्टरीणबाईना सुद्धां हसे आंवरत नाहीं. गोंधळ कमी झाल्यावर पुन्हां भाषण सुरू करते ) काय गाढवपणा केला मी ! ( पुन्हां हंशा व टाळ्या ! Right-O म्हणून कॉलेजच्या कंपूमधून एक आवाज ! शांतता प्रस्थापित झाल्यावर पुन्हा भाषण सुरू ! ) मुसलमानी नाजुक चढाव घालून खुशाल फिरतो आहे. छे ! सारा घोटाळा ! देऊ का फेकून हे चढाव इथेंच पण नको ? पुन्हां लोकांना जास्तच संशय यायचा ! (इकडे तिकडे पहातो) हा कोण मरगट्टा येतो आहे इकडे ? बावळटपैका दिसते आहे स्वारी ! बनवून काढून घेतली पाहिजे सारी हकीगत याच्याकडून ! ( जरा बाजूला जातो. तानाजी साध्या वेषात प्रवेश करतो.)

तानाजी—(स्वगत) कुणीतरी मुसलमान हेर मराठयाच्या वेषांत फिरतो आहे असे कळले म्हणून इकडे आलो पण इथें तर कुणीच नाहीं. गेला तरी कुठे तो ?

तिस्मारखां—( पुढे येऊन ) हँहँ हँ हँऽऽ! रामराम— दोस्त रामराम !

तानाजी—(दचकून त्याला न्याहाळीत, स्वगत ) अरे हा कोण ? हाच तर हेर नव्हे ? अगदीं हाच ! पायांतले चढाव आणि न टोंचलेलें कानच सांगताहेत ना ! बरें सांपडलांत बच्चजी ! (उघड) हँहँ हँ रामराम रामराम.

तिस्मारखां—काय दोस्त ? इकडे कुणीकडे ?

तानाजी— वा दोस्त मी तर या खेड्यातलाच कीं ! पर तुम्ही कुणीकडे इकडे? ऑं?

तिस्मारखां—हँ हँ ! कसच कसचं ! भटकतोय आपला ! बरं पण गडा-वरची खबर ? महाराजांना देवीचा दृष्टांत झालाय म्हणे.

तानाजीः- (स्वगत) अरे चोरा इथपर्यंत बातमी काढलीस कां ? (उघड) असं म्हणतात खरं बुवा ! मग खरंखोटं काय आहे राम जाणे !

तिस्मारखांः—वा दोस्त ! अहो ही तर बातमी सारीकडेच झालीय न् तुम्ही गुळमुळीतच ? छान बनवताय राव !

कमलः–(हलकेच) तारे, ए तारे, शुक शुक हे बघ; याच्या पुढलं 'असं मला वाटलंच होतं' इथपर्यंत सारं भाषण गाळायचं बरं का? बाईंनी सांगितले आहे तसं! आणि नलीला पाठव विमलकडे.

( तानाजी तिस्मारखाला विमलकडे जाण्याची खूण करतो. तो तिकडे जातो. सगळीकडे हंशा !)

तानाजी–(घाबरून हळूंच कमलेस ) अगबाई ! माझी तलवार आत राहिली वाटतं ! जा कमे ! पळ लवकर ! आण आण ! लढाईचा आणिबाणीचा प्रसंग आणि जवळ शस्त्र नाहीं. ( कमल हंसते व तलवार देते. तानाजीला कमलच्या हातची तलवार घेताना पाहून सगळीकडे हशा !)

तानाजी—(दात ओठ खात मागे वळून ) अस्सं मला वाटलंच होतं ! या माहितीनिशीं धडपणे मोगलाच्या छावणीत परत जाशील असं तुला वाटतं होय? सोडून द्या ती कल्पना ! उपसा तलवार आपली !

तिस्मारखा–(तलवार उपसण्याचा प्रयत्न करीत ) अरे चल ! दीड दमडीचा मरगट्ठा तू ! अजून प्राण वाचव ! पहा गडावरची माहिती देत असशील तर अजून सोडून देतो मी तुला ! नाहीं? अच्छा ! मरायच दिसतय तुला? ( तलवार काढायाचा प्रयत्न करतो. हलकेच ) काय मेली घट्ट बसली आहे. (मोठ्या प्रयासाने तलवार म्यानातून निघते. सर्व हंसतात.

तानाजीः–(तलवार परजून) कुणाचा मृत्यु जवळ आला आहे तें दिसेलच

( दोघांची लढाई सुरू होते. एकदम स्टेजवर हिरवा लाईट पडतो. तलवारीच्या खड्खड् आवाजाशिवाय सगळीकडे पूर्ण शांतता. पेटी वाजू लागते. तीन मिनिटे दोघे साऱ्या स्टेजवर तलवार फिरवीत हिंडतात.)

तानाजीः—( हळूंच ) नले, पुरे गडे आता ! लाठीचा क्लास आपण दोघींनींहि join केला आहे याची कल्पना आली लोकांना ! उगीच कंटाळा येईल लोकांना !

तिस्मारखाः—( हळूंच ) थांब ग ! अशी गंमतीची वेळ पुन्हां येणार थोडीच ! आपल्या पट्टयाच्या हाताचे कौशल्य तरी लोकांना दिसू दे !

[ वार करता करता बेसावधपणें एक वार चुकून तानाजीच्या–तारेच्या हातावर जोरात लागतो, त्याबरोबर ' अग आई, मेलेऽ ' अशी किंकाळी

फोडून तारा तलवार फेंकून हात दाबून धरून खालीं बसते. एकदम डायरेक्टरीणबाई विंगमधून धांवत स्टेजवर येतात व हात दाबून धरतात. त्याबरोबर पहिल्या रांगेत बसलेले एक डॉक्टरही टुनकन् स्टेजवर उडी मारून तारेकडे धांवतात. तोच पडदा पडतो. सगळ्या असेंब्लीहॉलमध्यें पुन्हा अस्वस्थता माजते. पांच मिनिटानतर डॉक्टर स्टेजवर येतात. सगळीकडे शांतता ! आता epilogue ला सुरवात झाली असं म्हणायला कांहीं हरकत नाहीं,)

डॉक्टरः—सभ्य स्त्री पुरुषहो, मला कळविण्यास फार वाईट वाटते कीं, कु. तारा गोडबोलेच्या हाताला वारामुळे बरीच इजा झाल्यानें नाटकाचे पुढील अंक होणे शक्य नाहीं. अगदीं प्रथमच रंगभूमीवर आल्यानें मुलींच्या हातून बऱ्याचशा चुका झाल्या खऱ्या ! पण त्या सर्व नीट सुधारून ह्याच खेळाची रंगीत तालीम पुढल्या शनिवारी होईल ! मला वाटतें, आतां आपण disperse व्हायला कांहीं हरकत नाहीं.

( डॉक्टर आंत जातात. सगळीकडे पुन्हां बाजाराचा सीन )

Good Night

*

# सुलूचा फोटो    ११

आज सात दिवस झाले बर का? दररोज मी आठवण करून देते आहे न् रोज तुम्ही कांहीं तरी निमित्त पुढे करतां!" लीला सुलूला थोपटीत माझ्याकडे पहात म्हणाली. "अशी चालढकल न् टाळाटाळी करण्यापेक्षा स्पष्ट नकार द्यावा, हें बरं नाहीं कां?"

मी ज्ञानप्रकाशांतून डोके वर काढले व प्रश्नार्थक दृष्टीने लीलेकडे पाहिले "कशाबद्दल म्हणते आहेस तूं?" मी विचारलें.

"इश्श! म्हणजे तेहि विसरलांत का? कमाल आहे बाई!" लीला सुलूच्या अंगावरचे पांघरूण नीट करीत म्हणाली. "भारीच विसराळू स्वभाव नाहीं तरी तुमचा!"

"स्मरणशक्तीचे स्टोअर–हाऊसच कीं नाहीं तूं?" मी आहेराची परत फेड केली. "तरी बरं, कालच्या बिनसाखरेच्या चहाची आठवण अद्याप गेली नाहीं."

"बाई, बाई आता महिनाभर गाजेल अगदीं हें प्रकरण! पण मुद्दामच दिला हो मी बिनसाखरेचा चहा आपल्याला. आपण म्हणत नव्हतां पूर्वी कीं तुझ्या हातचा बिनसाखरेचा चहा सुद्धां गोड लागेल म्हणून? पहायची होती मला त्याची सत्यता!"

"असं असं!" मी हंसलो, "म्हणून स्वतः देखील बिनसाखरेचा चहा कसा लागतो, हें पहाण्याकरितां कप तोंडाला लावला वाटतं? अन् एक घोट घेतल्यावर तोंड वाईट करून 'अगबाई, कमाल झाली माझ्या विसराळूपणाची' असं म्हणालीस तें सुद्धा मुद्दामच होय ना?"

लीला यावर हंसली व माझ्या शेजारच्या टेबलावर बसत म्हणाली, पण वादाच्या भरांत मूळ मुद्दा विसरूं द्यायची नाहीं मी तुम्हांला! मी सुलूचा फोटो काढण्याबद्दल म्हणत होते."

"बरं मग ?" मी ज्ञानप्रकाशांतील सिनेमाच्या जाहिरातीवरून डोळे फिरवीत म्हटले. लीलेने माझ्या हातून ज्ञानप्रकाश हिसकावून घेतला.

"बर काय ! केव्हां काढायचा मग फोटो ? नसेल काढायचा तर तसं स्पष्ट सागाव !"

"का घाई झाली आहे पण तुला इतकी ? काढूं ना सावकाश ! सुलू कुठे पळून जात नाहीं.— फोटोग्राफरही इथच आहे—"

"ते कांहीं नाहीं ! उद्या फोटो काढून आणलाच पाहिजे तिचा !" लीला कमांडर–इन–चीफच्या आवाजांत म्हणाली, "नाहीं तर—"

"नाहीं तर काय?" मी मध्येच विचारले, "माहेरी जाण्याची नेहमींची धमकी देणार आहेस कीं काय ?"

"असहकारिता" ! "लीलेने गंभीर मुद्रेने उत्तर दिले, "फोटो काढून आणीपर्यंत मी न् सुलु तुमच्याशी बिलकूल बोलायच्याच नाहीं."

मी हंसलो व सुलोचनेकडे पाहिलें. माझी कल्पना ती झोपली असेल पण ती लबाड पोर आपल्या आईकडे सारखी टक लावुन पहात होती.

"पाहिलस ?" मी म्हटले, "ती सुलोचनासुद्धां तुझ्या वेडेपणाची कींव करते आहे. बघ कशी बघते आहे तुझ्याकडे."

"अगबाई झोपलींच नाहीं कीं काय पोर ही ! न् मघांची कशी अगदीं डोळे झाकून पडली होती. लीला सुलूकडे जात म्हणाली. "शुले ए शुले, आज झोप नाहीं वाटत ? अं ? आज निन्नी कलायची नाहीं कां बाळाला ! ए, हें हंसायला काय झालं ग ? लबाड पोलगी !"

"आपल्या आईला हंसत आहे ती !" मी मध्येंच वाक्य सोडलें,

"नाहींच मुळीं—नाहींच ! नाहीं ना सुले ? नाहीं ना ?" लीलेनें सुलूला कडेवर घेऊन माझ्याकडे आणले. "नाहीं म्हणून साग सुले त्याना" 'नाहीं' म्हणताच सुलूनें नंदी बैलासारखी मान हालविली. 'नाहीं म्हटलें कीं मान हलवायची येवढेच तिला माहीत होतें. "पाहिलंत कशी शहानी पोल आहे अगदीं ? आतां किनई, फोतो काढायचा बालीचा ! एका गंम- तीत–गंमतींत न्यायचं बालीला, अन् तिथं फोतो काढायचा, फोतो ! त्या- वेळीं हलायच नाहीं अगदीं ! अगदीं बाहुली सालखं सालखं बसायचं – हें

अस्सं बाहुलीसारखं बसायचं बलं कां ?" असें म्हणत लीलेनें सुलूला टेबलावर ज्ञानप्रकाशावरील बसवलें.

" अग ज्ञानप्रकाश..." मी मधेंच म्हटलें.

" राहुं द्या ! भारीच कौतुक त्या ज्ञानप्रकाशाचं ! अगबाई बिघडलं वाटतं ? ओ, ओऽऽ !" लीला सुलूला कडेवर घेत समजावीत म्हणाली; " खाली नाहीं बचायचं ? सारख कडेवर घ्यायला पाहिजे ? लबाड—लुच्ची! बरऽ नाहींऽ ! घुस्सा तर कसा अगदीं—! आतां दुदू घ्यायचं ना बालाला चला घलांत आतां ! आतां बाल दुदू पिनाल नू अंगाई कलनाल, हो ना ? आता कलायची ना अंगाई बालाला ? कां स्वयपाक कलतांना त्लास द्यायचा आईला ? छे ग बाई ! आतां निन्नीच कलायची आमच्या बालाला. चला तल घलांत द्या म्हणावं त्यांना ज्ञानप्लकाश ! नको आमाला !" असें म्हणत ज्ञानप्रकाश माझ्या अंगावर फेकून लीला आंत निघून गेली.

आणि दुसरे दिवशीं खरोखरच असहकारिता सुरू झाली. मला प्रथम थट्टाच वाटली ही सारी! पण चहा झाला—स्नानाला पाणी काढलें—दुसऱ्यांदा चहा झाला. तरी अं—हं ! सारा मुक्याचा कारभार ! नेहमींप्रमाणें सुलूला खेळविण्याची कामगिरीसुद्धां माझ्याकडे आली नाहीं. आतां मात्र प्रकरण अगदीं हातघाईवर आलेले मला दिसले. मी मुकाट्याने उठलों व कोट-टोपी चढविली.

" शरण बुवा आपण अगदीं !" मी स्वयपाक घराच्या दरवाजांत उभे रहात लीलेला म्हटलें, पराभव कबूल ! सुलूला सजवून ठेवा तोंपर्यंत ! ते कुलकर्णी फोटोग्राफर आहेत कीं नाहीं हें पाहून मी आतां आलोंच."

लीला हंसली. विजयाचा आनंद तिच्या हास्यांत प्रतिबिंबित झाला होता पण तिला कांहीं बोलण्याची संधी मिळण्यापूर्वींच मी बाहेर निसटलों होतों.

सुदैवानें कुलकर्णी स्टुडिओंतच होते. त्याना आमच्या आगमनाची आगाऊ वर्दी देऊन मी परत फिरलो.

लीला तोंपर्यंत सज्ज होऊन माझीच वाट पाहात होती. सुलूचा थाट तर कांहीं विचारावयालाच नको होता. लीलेनें तिला चांगलेंच सजविलें होतें. तिचें तोंड स्वच्छ धुवून त्यावर पफनें हलक्या हातानें पावडर लावली

होती. कपाळावर बारीक तीटाची टिकली — डोळ्यांत काजळ—केसांचा व्यवस्थित पाडलेला भाग अन् निळ्या रंगाचा अंगांत फ्रॉक! कुणाचीहि दृष्ट लागेल अशीच तिची ऐट होती. त्या दोघींची ती तयारी पाहून मी मोठ्यानें हंसलों.

" अरे वा! दोघीहि मायलेकी तयार झाल्यांत कीं अगदीं! पण फोटोग्राफरचा कुठें पत्ता आहे? ती स्वारी कुठं बेपत्ता झाली आहे कुणास ठाऊक?"

" खरंच?" लीलेची निराशा तिच्या आवाजांत स्पष्ट दिसून येत होती. " काही तरीच! वेळीं अवेळीं आपली थट्टाच!"

" अग खरंच! फोटोग्राफर घरीं नव्हते मी गेलों तेव्हा! हो चाललीस कुठें?" लीलेला स्वयंपाकघरांत परततांना पाहून मी म्हटले, " अग, घरीं नव्हतें याचा अर्थ ते स्टुडिओत होते! थट्टा सुद्धां कळत नाहीं! बघ शुले कशी वेडी आहे तुझी आई!" मी सुलूला घेण्याकरितां हात पुढें केलें. पण त्या बाईसाहेब आईला सोडायला तयार नव्हत्या. मी हात पुढें केल्याबरोबर तिने तोंड वळविलें.

" ए लबाड, आईला सोडायचं नाहीं वाटतं?" मी तिला बळेंच घेतलें. नापसंती व्यक्त करण्याकरितां सूर निघणार हें मी ओळखलें. "बलं—बलऽ! ललायला आलं वाटतं? ती बघ हम्मा-आहेऽ? हम्माला बोलाव पाहूं? हम्मा-येऽयेऽऽ!" सुलूची समजूत तेव्हांच पटली. मी लीलेकडे वळलो. " अहो बाईसाहेब, आटपा ना आतां! तुम्ही बायका म्हणजे..."

" अगदीं तुम्हां पुरुषांसारख्याच, बर कां?" लीला दरवाजाला कुलूप लावीत म्हणाली. " परवां नाटकाला जायचं होतं तर दाढीपासून तयारी करावी लागली, उगाचच बायकांना नांवें ठेवायची संवयच ना!"

" बरं, बरं! चला आतां!" मी सुलूला घेऊन बाहेर पडलों.

आम्ही गेलों त्या वेळीं कुलकर्णी कॅमेरा वगैरे लावण्याच्या गडबडींतच होते. व मागच्या बाजूला काळा पडदा होता. आम्ही आंत गेल्यावर कुलकर्णी आमच्याकडे वळले.

" या अगदीं तयारींतच होतो मी!" इतक्यात त्यांचे सुलोचनेकडे

लक्ष गेलें " अर्रर्र ! शेवटीं हा घोटाळा झालाच तर ! माफ करा बुवा ! तीन चार दिवसांनीं यावं लागेल तुम्हांला पुन्हा आता !"

" का हो, काय झालं ?" मी गोंधळून विचारले. लीलेच्या तोंडावर सुद्धां गोंधळ स्पष्ट दिसत होता.

" काजळानें घोटाळा केला सारा !" कुलकर्ण्यांनीं स्पष्टीकरण केलें. " डोळ्यात काजळ घालून फोटो काढला, कीं खराब येतात डोळे अगदीं ! मी सांगण्याचं विसरलो– तेव्हांच मला वाटलं असं कांहीं होईलसं ! आता चार एक दिवस लाबणीवर टाकला पाहिजे फोटो. मात्र तोपर्यंत बिलकूल काजळ घालू नका तिच्या डोळ्यांत ! आज मंगळवार नाहीं का ? रविवारीं याच वेळेला या ! काय ? जुळेल ना ?"

" हो! वा ! न जुळायला काय झालं ? अच्छा !" मी दरवाजाकडे वळत म्हटलें, " रविवारी साडेनऊला येऊ तर !"

" अच्छा तसदी पडली विनाकारण तुम्हाला ! मात्र तीन चार दिवस काजळ अजीबात घालूं नका हं ऽ !" बाहेर पडता पडतां कुलकर्ण्यांनीं पुन्हा एकदा आम्हाला बजावले. रस्त्यावर येताच मी लीलेकडे पाहून हंसलो.

" तुझा प्रताप बरं का सारा ?" मी हंसत म्हटलें. " कशाला काजळ घातलेस तिच्या डोळ्यात ?"

" इश्श मला काय हे फोटोग्राफीचे नियम माहिती ?" लीला सुलूला माझ्याजवळून घेत म्हणाली, " पण तुम्ही नव्हतं मला सांगायच ?"

" मळा माहिती असेल तर ना ?' मीं हंसत म्हटले. " बरी झाली पण एका माणसाची फजिती ! असहकारिता पुकारायला पाहिजे काय ?"

" होऊं द्या हंऽ ! झाली तर झाली !" लीला जरा फुरंगटून म्हणाली.

" बाकी त्या वेळेला सुलूच्या ऐवजी तुझाच फोटो घ्यायला सांगणार होतो कुलकर्ण्यांना !" मी जास्तच मोठ्याने हंसत म्हटलें. " आतां तरी तीन चार दिवस डोळ्यांत काजळ न घालण्याची आठवण ठेव !' नाहीं तर स्मरणशक्तीचे स्टोअर–हाऊसं तूं—'

" बरं, बरं ऽ !' लीलेनें मधेच अडवलें.

आणि दुसरें दिवशीं माझ्या अटकळीप्रमाणें बरोबर लीला काजळ न

घालण्याचें विसरली. मी जवळच ज्ञानप्रकाश चाळीत बसलों होतों. तिनें सुलूच्या डोळ्यांत काजळ घातल्याबरोबर मी जोरांत हंसायला सुरवात केली. लीलेने आश्चर्यानें प्रश्नार्थक दृष्टीनें माझ्याकडे पाहिलें. तरी मी उत्तर न देता हंसतच होतों.

" झालं काय हंसायला ?" तिनें जरा रागानेंच विचारलें.

" हेच का तुझे स्मरणशक्तीचे स्टोअर हाऊस ? त्यांतील स्मरणशक्तीचे डबे रिकामे झालेले दिसताहेत ! मी हंसत म्हटले, "कालच डोळ्यांत काजळ घालायचं नाहीं असं ठरलं होतं."

" अगबाई ! खरंच कीं !" लीला गोंधळून म्हणाली. " अगदींच कशी बाई विसरलें मी !"

" कधीं विसरत नसतेस तूं ?" मी म्हटलें "थांब ! इकडे आण पाहूं ती काजळाची डबी ! त्याच्यावर एक स्मरणपत्र लिहून ठेवतों."

टेबलावर एक पोस्टाचें लेबल पडलें होते तें घेऊन त्यावर 'सुलूचा फोटो ' अशीं अक्षरे दोन्ही बाजूवर पेननें लिहिली व दोऱ्यानें तें लेबल त्या डबीला बांधून टाकलें.

" पण इतकें कशाला ? मी ती डबी बॅगमधें ठेवूनच देतें म्हणजे झालें." असें म्हणत तिनें टेबलाशेजारीं असलेली बॅग उघडून ती डबी त्यांत तशीच टाकली. "म्हणजे पुन्हां विसरायलाहि नको न् काहीं नको!"

" चहा करणार आहेस ना तूं आतां ?" मी विचारलें " कां तेंहि विसरलीस !"

" हो पण ! सुलू झोपली आहे, तिला निजवते, आणि करतेंच चहा !" असें म्हणत ती सुलूला थोपटूं लागली.

मीहि ज्ञानप्रकाशांतील जागतिक घडामोडी पहाण्यांत गुंतलो.

संसारांत सुखदुःखाचं प्रमाण किती आहे हें मला माहिती नाहीं. त्या दृष्टीनें विचार करण्याचा प्रसंगच मला आतांपर्यंत आला नव्हता. लीलेसारखी सुस्वभावी व प्रेमळ पत्नी, व सुलोचनेसारखी आईबापाचा आनंद द्विगुणीत करणारी गोड पोरगी यांच्या सहवासामुळें संसार म्हणजे नंदनवन-असल्याचें मला वाटत असल्यास नवल नव्हतें. दुःखाची झळ कधी ही अद्याप

आम्हाला कागलीच नव्हती. संसार हा सुखदुःख यांनी विणेलला गोफ आहे, याची जाणीव मला अद्याप यावयाची होती. सुखाच्या अत्युच्च शिखरावर उभे असतांना शेजारींच धुक्यानें व्यापलेली दुःखाची खोल दरी जरी दिसत नसली तरी ती तेथेंच असतें, हें तितकेंच खरें नाहीं का? आयुष्याच्या सुखमय रस्त्यांतून जातांना वळणावर दबा धरून बसलेलें दुःख आपणाला त्यावेळीं कसे दिसणार! आम्हीं इकडे रविवारीं सुलुचा फोटो काढण्याचें ठरवीत होतों पण दैवाच्या मनांत दुसरेंच होतें.

गुरुवारीं सकाळीं सुलूला एकाएकीं जो ताप आला तो एकदम ४ डिग्री पर्यंत! त्या तापांतच तिला मोठा वाताचा झटका पण आला. घाबऱ्या घाबऱ्या ताबडतोब डॉक्टरांना आणले. त्यांनीं एक इंजेक्शन देऊन डोक्यावर बर्फाचा मारा करण्यास सांगितले. रात्रंदिवस बर्फाचा मारा करूनही ताप तीनच्या खालीं येईना. सिव्हिलसर्जनच्या सांगण्यावरून तिला हॉस्पिटलमध्यें नेण्यांत आले. पण तेथेंहि कुणाचा इलाज चालेना. शेवटीं कुणाच्याच प्रयत्नाला दाद न देतां तिनें रविवारीं सकाळीं हें जग सोडलें.

त्या दिवसाची आठवण झाली कीं अद्याप अंगावर शहारे येतात. तिला पोहोंचवून आलों. तरी एक प्रकारच्या भ्रांतीमध्येंच होतों, इतक्या मोठ्या आकस्मिक आघातानें मन कसें अगदीं बधीर होऊन गेलें होते. स्मशानांत तिचा अत्यंविधि उरकतांना माझे सारें अवयव यंत्राप्रमाणें काम करीत होते. पण मनाला मात्र त्याची कांहींच जाणीव नव्हती. हें सारं एक भयंकर स्वप्नच पडत आहे असं मला अद्याप वाटत होते!

घरीं आलो—आजूबाजूला पाहिलें. मला वाटलं, इतक्यांत कुठून तरी सुलू येईल. घरांत गेलो. आंत तीन चार बायका न् मामी बसल्या होत्या. एका कोपऱ्यांत लीला शून्य नजरेनें जमिनीकडे दृष्टी लावून बसली होती. इथेंही सुलू नव्हती तर! पुन्हां मी बाहेर येऊन खुर्चीवर बसलो. सहज घड्याळाकडे लक्ष गेलें. साडेनऊ वाजले होतें. मला आठवलें, फोटोग्राफर-कडे याच वेळेला सुलूला घेऊन जायचे होते; पण सुलू कुठें होती तेथें?

इतक्यांत लीला हळुं हळू दिवाणखान्यांत आली. पांढरा फटक चेहेरा व तारवटलेले डोळे पाहून हीच ती लीला, हें सांगूनहि कुणाला ओळखं

आले नसतें. दुःखातिशयाने तिच्या मनावर झालेला आघात जबरदस्तच होता. इतक्या भयंकर मानसिक वेदनेंत मी होतो तरी मला लीलेकडे पाहिल्याबरोबर मॅकबेथमधील लेडी मॅकबेथच्या झोपेत चालण्याच्या प्रवेशाची आठवण झाल्याशिवाय राहिली नाहीं. तसेच तारवठलेले डोळे—तसाच पांढरा फटफटीत चेहेरा —— ! लीला माझ्या खुर्चीजवळ आली.

" कुठं नेलीत सुल्लू तुम्ही ?" तिन विचारले.

काय उत्तर देणार मी या प्रश्नाला ? काय सांगू तिला ? जिला अगदीं तळहाताच्या फोडाप्रमाणें आम्हीं जपत होतो, त्या नाजुक फुलाला या हातांनीं ... ! अगदीं असह्य झाली ही मनःस्थिती ! कांहीं न बोलतां मी दोन्ही हाताच्या पंजात डोकें खुपसले.

"आज तिचा फोटो काढायचा ना ! कुलकर्णी वाट पाहात असतील !" लीलेचा आवाज तप्त शिशाप्रमाणे माझ्या कानांत शिरला. आतां मात्र मला अश्रू अगदीं आवरेनात. अगदीं लहान मुलासारखा मी स्फुंदू लागलों. इतक्यांत मामी आत आल्या.

" लीले, वेडी आहेस कां तूं ? आंत चल पाहूं आतां ! चल आंत ! अगदीं कांहीं बोलायच नाहीं आतां !" मामी लीलेला समजावीत आंत नेऊं लागल्या. " नाना तूंहि असा धीर सोडलास ? शोक करून आतां येणार का आहे ती ? लीले चल बाळ आंत ?"

लीला अगदीं आज्ञाधारक मुलीप्रमाने आंत गेली. मी हातरुमालानें डोळे पुसले व शून्य नजरेनें ज्ञानप्रकाश उचलला.

तीन दिवसांत लीला इतकी खालावली, की दुःखातिशयानें तीच आतां आजारी पडते कीं काय अशी नवीनच भीति माझ्या मनांत उद्भवूं लागली. शेवटीं मामींच्या आग्रहावरून एक महिना रजा घेऊन पांचगणीला मामाकडे हवा बदलण्याकरितां जाण्याचें ठरविलें.

सुंदर हवा व रम्य वनश्री यामुळें हळूं हळूं दोघांच्याहि मनाला बसलेला धक्का कमी होत चालला. शिवाय दुःख कितीहि मोठें असलें तरी काळ हळूं हळूं त्याचा विसर पाडायला लावतोच. याला आम्ही अपवाद कसे

असो ! एक महिन्यांत आमच्या मनाचा समतोलपणा बराचसा परत आला व मी कामावर रुजू झालों.

तीन महिन्यानंतरची गोष्ट ! मी ऑफिसचें उरलेलें काम घरीं आणलें होतें. माझें काम चालले होतें व शेजारच्याच आरामखुर्चीवर लीला हचिन्सनची ' इफ विन्टर कम्स' ही कादंबरी वाचत बसली होती. काम करतांना मधें एकदम कागदावर डाग पडला म्हणून मी टीपकागद पाहू लागलो. पण टीपकागद सगळे टेबलाशेजारील बॅगमध्यें होते.

" लीले, त्या बॅगमधील ब्लॉटिंगपेपर काढतेस का जरा ? मी विचारलें.

" कां ? डाग पडला वाटतं ! सारी घांदल ना !" असे जरा हंसत म्हणत तिने शेजारच्या खिळ्यावरील किल्ली घेतली व बॅग उघडली.

दोन तीन मिनिटं झालीं तरी टिपकागद मिळेना. मी कामांतून डोके वर काढलें व लीलेकडे पाहिले.

लीलेच्या हातांत कसला तरी जिन्नस होता व ती अश्रूपूर्ण नजरेनें त्याकडे टक लावून बघत होती.

" काय आहे ग तें ?" मी विचारलें. लीलेनें कांहीं न बोलतां तो जिन्नस माझ्या हातांत दिला.

मी आश्चर्यानें पाहिले. तीच पूर्वीची काजळाची डबी व त्याला बांधलेलें तें लेबल ! माझी नजर आपोआपच लेबलाकडे वळली. त्याच्यावर लिहिलें होते, ' सुलूचा फोटो !'

नकळतच माझ्या डोळ्यांत अश्रू उभे राहिलें. मी लीलेकडे पाहिलें. तीहि अश्रुयुक्त नयनांनीं माझ्याकडे पहात होती.

दोघांनाहि त्या दृष्टिक्षेपाचा अर्थ कळला.

त्या एका दृष्टिक्षेपांत किती तरी मागील आठवणी भरल्या होत्या !



# उलटलेला डाव ११

( टिळक रस्त्यावरील बंगल्यामधील एक खोली. खोलींत जरी फार सजावट–सामान नसलें तरी आहेत त्या जिनसा अगदीं टापटिपीनें ठेवल्या आहेत. पश्चिम बाजूला दोन खिडक्या असून त्या दोन खिडक्यामध्ये रस्त्याचा देखावा दाखविणारी एक लहानशी गॅलरी आहे. उजव्या बाजूला खिडकीला कोन करून भिंतीला टेकून एक, निरनिराळ्या पुस्तकांनीं व रायटिंग पॅड्, पेन–होल्डर, पेपरवेटस्, टाइमपीस वगैरे वस्तूंनीं सुसज्ज असलेलें टेबल आहे. त्याच्या शेजारीच एक खुर्ची आहे. डाव्या हाताच्या खिडकीशीं दोन आरामखुर्च्या जवळ जवळ ठेवल्या आहेत. विजेच्या दिव्याचा स्टॅंड सध्यां डाव्या बाजूच्या खिडकींत आहे, खोलीला दक्षिणोत्तर भिंतींना समोरासमोर दरवाजे असून एका दरवाजानें गॅलरींत जातां येते व दुसऱ्या दरवाजानें जिन्याकडे जाण्याची वाट आहे. खोलींत मध्यभागीं एक मोठी संतरजी घातली असून निरनिराळे फोटो व चित्रं यांनीं भिंत सजविली आहे.

पडदा उघडतो त्या वेळीं उषा खुर्चीवर बसून नोटपेपरवर कांहीं तरी लिहिण्यांत गढून गेलेली असते. उषा एकोणीस वर्षांची तरुणी असून एकंदरींत बांधा नाजूक, सडपातळ सशक्त आहे. चेहऱ्यावर बुद्धिमत्तेची चमक व करारीपणाची झांक दिसत आहे. डोळ्यांकडे पाहिलें तर ही मुलगी मनांत आलेला निश्चय पार पाडल्याशिवाय कधींहि राहाणार नाहीं असेंच कुणालाहि वाटण्याइतकें तेज तिच्या नजरेंत आहे. या वेळीं तिचा चेहेरा बराचसा त्रासिक व किंचित् दुःखी असा दिसतो. एखादी अप्रिय गोष्ट अगदीं मनाच्या भावना दबवून करतांना जसा एखाद्याचा चेहेरा दिसेल तसाच या वेळीं तिचा दिसत आहे. खालचा अधर दांतानें घट्ट धरून व कपाळावर दोन चार आंठ्या चढवून ती लिहितां लिहितां मधेंच कांहीं आठवण्याचा

प्रयत्न करते. घड्याळाकडे एक दृष्टिक्षेप टाकून शेजारीं पडलेलें पत्र उचलून वाचू लागते. वाचतांना तिच्या चेहेऱ्यावरील आंठ्यांचे जाळे अधिकच विस्तृत होतें. पत्र खालीं ठेवून पेन उचलून ती पुन्हां लिहावयास लागणार इतक्यांत दारावर टकटक ऐकूं येतें. एकदम दचकून पेन खालीं ठेवून ती उठते. जरा आश्चर्यानें टेबलावरील टाइमपीस व मनगटावरील रिस्टवॉच या दोहोंकडे दृष्टि टाकते. )

उषा---( मोठ्यानें ) येस ! कोण आहे ? ( पुन्हा टकटक. ) आलें हं ! एक मिनिट ! ( घाईघाईने आरशासमोर उभी राहून केस नीट करते, व तोंडावरून पफ्चा हलक्या हाताने बोळा फिरवून घाईने दरवाजा उघडण्यास जाते. दरवाजा उघडल्यावर तारा- १८ वर्षांची तिचीच वर्गभगिनी—आंत येते. ) इश्श ! तूं होय ? काय गडबडले पण मी ! मला वाटले कोण आल कुणास ठाऊक !

तारा---( आंत येत तिच्याकडे न्याहाळून पहात ) कुणी येणार आहे वाटतं आत्तां तुझ्याकडे ? अगदीं वाट पहात असल्यासारखी दिसतेस ?

उषा---हो ना! मोठे सन्माननीय पाहुणे येणार आहेत आज माझ्याकडे! त्यांच्याच स्वागताची मी तयारी करीत होतें इतकी !

तारा---( कुतहलाने ) अगबाई; खरंच ! मोठी महनीय व्यक्ति दिसते आहे येणारी ! स्वागताची इतकी तयारी करावी लागण्याइतके कोण पाहुणे येणार आहेत बाई ?

उषा---( हसत ) ओळख पाहूं ! बघूं तुझी कल्पनाशक्ति कुठपर्यंत धांवते ती !

तारा---मला कसं सांगतां येणार ? काल कॉलेज सुटल्यानंतर आपली भेट तरी झाली होती कां ? बोलावल असशील एखाद्या कॉलेजमधल्या मुलाला गप्पा मारायला ! दुसरं काय ?

उषा---( हंसत ) अहा ग वेडाबाई ! मग त्याला स्वागताची इतकी तयारी लागते वाटतं ? पुन्हां ओळख ! आणखी एक संधि देतें तुला !

तारा---नाहीं बाई तर्क करतां येत ! तूंच सांग ना आतां !

उषा---सांगू ? आश्चर्यचकित होऊं नकोस हं---! श्रीयुत वसंतराव गोडबोले आज माझ्या भेटीला येणार आहेत. कां ? दचकलीसशी ?

तारा---( आश्चर्यानें ) कोण म्हणालीस तू ? गोडबोले येणार आहेत तुला भेटायला ? वसत गोडबोले ?

उषा---( जरा हसत ) हो, हो, वसंत गोडबोले, बी. ई., सिव्हिल एंजिनियर, गोडबोले वकिलांचे ज्येष्ठ चिरंजीव ! बरीच आश्चर्यचकित झालीस तू ?

तारा---मला अद्याप नाहीं खरं वाटत हें ! परवांच्या त्या बेजबाबदार पत्रानंतरहि त्यांना तुला भेटण्याचा धीर होतो हें खरोखर आश्चर्य आहे. थट्टा तर नाहीं करत तूं माझी ?

उषा---( तिच्या हातांत टेबलावरचें पत्र देत ) हें पत्र वाचून पहा ना ! म्हणजे कळेल मी कितपत थट्टा करते आहे ती !

( तारा आश्चर्याने पत्र घेते. पत्र वाचतां वाचतां तिचा आश्चर्याचा पारा चढत जातो. पत्र वाचून झाल्यावर क्षणभर ती पाकिटावरील पत्त्याकडे पहाते आणि पत्र पाकिटांत घालून टेबलावर ठेवून देते. )

तारा---( जरा हंसून ) अस्सं ! मग काय खुलासा करण्याचं ठरवलं आहेस तू ?

उषा---त्याबद्दल सल्ला घेण्याकरितांच तुला बोलावलं होतं मीं ! हें बघ तारे, दोन प्रश्न आहेत माझ्यापुढं सध्यां !

तारा---कोणते ते ?

उषा---तूं येण्यापूर्वी मी हें पत्र लिहीत होते ( टेबलावरील अर्धवट लिहिलेलें पत्र तिच्या हातांत देते ). एकदां वाटतं कीं, गोविंदाच्या हातीं पत्र देऊन बाहेरच्या बाहेर वाटेला लावावं त्यांना ! पण पुन्हा वाटतं कीं एकदां भेट झाली म्हणजे खुलासा तरी होईल नीट ! पुन्हा गैरसमजुतीला वाव नको. तुला काय वाटतं ?

तारा---( पत्र वाचून उषेला परत देत ) मला वाटतं, प्रत्यक्ष भेट घ्यावी हेंच उत्तम ! व्हायचा तो खुलासा प्रत्यक्ष झाला म्हणजे बरं नाहीं कां ? नाहीतर तूं त्यांना पत्र लिहायचं, त्यांनीं पुन्हा त्या पत्राचं उत्तर

लिहायचं, असं चालायचं प्रकरण ! त्यापेक्षां एकदम सोक्षमोक्ष झालेला काय वाईट ! ( उषा पत्र टेबलावर ठेवून खुर्चीवर बसते. ताराहि आराम-खुर्चीवर बसते ) पण तुला आता स्पष्टच सागते, तुझ्या या खुलाशाचा किंवा या भेटीचा कांहीं उपयोग होईल असं मला तरी निदान वाटत नाहीं.

उषा--( आश्चर्यानें ) कां ! का होणार नाहीं ! साऱ्या गोष्टी इतक्या उघड रीतीनं सांगितल्या तरी त्याना त्या पटणार नाहींत असं तुला वाटत !

तारा—वेडी आहेस उषे तूं ! तुला काय वाटत—त्यांचा देशमुखाविषयीं गैरसमज झाला म्हणून त्यानीं ते पत्र लिहिलं असेलस ! पण तूच सांग, एक वर्षापूर्वीं जेव्हा तुमचं लग्न ठरल त्यावेळीं तुझी आणि देशमुखाची मैत्री असलेली त्याना माहिती नव्हती कां ! तुम्ही दोघेहि इंग्लिश शाळेपासून एका वर्गात आहात, आणि देशमुख सख्ख्या बहिणीपेक्षांहि तुला जास्त मानतो, हें त्या वेळीं त्यांना माहिती होतच ना ! मग त्या वेळीं जी घाणेरडी शंका त्यांच्या मनांत सुद्धा आली नाहीं तिनं याच वेळीं कसं ग डोकं वर काढलं !

उषा—( आश्चर्यानें ) मग म्हणणं काय तुझं ! त्यानीं मुद्दामच वाङ्-निश्चय मोडण्याकरितां हे निमित्त काढल असं तर म्हणायचं नाहीं तुला !

तारा—असंच म्हणणार आहें मी ! थांब, आश्चर्यचकित नको होऊस ! मी काय म्हणते ते ऐकून घे सगळं ! पूर्ण माहिती मिळाल्याशिवाय मी कोणतेच विधान करीत नाहीं. काल मी माझ्या दादाजवळ तुझी हकीगत सांगितली; त्या वेळीं दादा म्हणाला—

उषा—( मध्येच ) काय ! काय म्हणाला तो !

तारा—सुधा साठे नावाच्या सीनियर बी. ए. तल्या मुलीवर त्याचं प्रेम जडलं आहे.

उषा—( आश्चर्यानें एकदम उभी राहून तिला आडवीत ) सुधा साठेवर त्यांचं प्रेम ! छे ! अशक्य ! विश्वास नाहीं बसत यावर माझा !

तारा—अगदीं खरी गोष्ट आहे ही ! तुला आश्चर्य वाटेल, पण गोडबोल्यांनीं माझ्या दादाच्या एका मित्राजवळ हें सारं सांगितलं आहे. एवढंच नव्हे तर, तिच्याशीं लग्न करण्याचा निश्चयहि त्यांनीं त्याच्याजवळ

बोलून दाखवला आहे.आणि मला तर नक्की वाटतं, की हा तुझ्याशीं ठरलेला वाङ्निश्चय मोडण्याकरिता देशमुखाशीं तुझी मैत्री ही निव्वळ सबब आहे. ( उषा भाषण चालूं असतानाच आश्चर्यानें खुर्चीवर बसते व डोके दोन्ही हातामध्यें घेते. तारा उठून तिच्याजवळ जाते. ) माफ कर हं उषे ! अगदीं वाईट बातमी सांगितली ना मी तुला ? मला सुद्धां भारी वाईट वाटलं ही बातमी कळल्यावर ! किती मूर्खपणा हा !

उषा—( उसळून ) मूर्खपणा ? ते पत्र आल्यापासून मी त्यांना फक्त मत्सरीच समजत होते; पण आतां त्यांना नीच, कपटी, विश्वासघातकी यापैकीं कोणतं विशेषण द्यावं हेच मला कळेनासं झाल आहे. वरून साळसूदपणाचा आव तर केवढा ! कुणाला वाटेल सारी चूक आमचीच ! ढोंगी कुठले ! येतील च आतां ते ! त्याना अगदीं स्पष्टच विचारते आतां—

तारा—( तिला आडवीत ) असा वेडेपणा नको करूंस हं ऽ ! अशी गोष्ट ते एकदम कबूल करतील अस कां तुला वाटतं ? डोक्यांत अशी एकदम राख नको घालून घेऊस ! अगदीं शांत ठेव डोकं ! संतापामुळं तुमच्या भेटीपासून निष्पन्न मात्र कांहीं व्हायचं नाहीं !

उषा—( त्राग्यानें ) इतका त्यांचा मत्सर दिसून आल्यावर मला माझं मस्तक शांत ठेवणं कसं जमेल ग ? पुरुषाची जातच खरोखर विश्वासघातकी! इतके दिवस प्रेमाच्या गोड गोड थापा दिल्या, आणि आतां— ( गळा दाटून आल्यामुळें पुढें बोलवत नाहीं. डोळ्यांतील अश्रू तारेला दिसूं नयेत म्हणून ती तोंड फिरविते.

तारा—( खुर्चीच्या हातावर बसत, तिच्या खांद्यावर एक हात ठेवून ) इतकं काय मनाला लावून घेतेस उषे ? खरोखर अशा पुरुषाशीं होऊं घातलेला तुझा विवाह मोडला याबद्दल मला तरी आनंदच वाटतो. (खालीं घंटा वाजते. तारा झटकन् उठते ) वसंतराव आले वाटतं. हं ! मी उघडतें दरवाजा ! मात्र तू डोकं अगदीं शांत ठेवशील ना ? त्रागा करण्यापासून कांहीं उपयोग नाहीं. काय ? राहील ना लक्षांत ? ( उषा मुकाट्याने मान हालविते. तारा दरवाजा उघडण्याकरितां जाते. उषा पदरानें डोळे पुसून चेहऱ्यावरील विकार नाहींसे करण्याचा प्रयत्न करते. दरवाजा उघडून प्रथम

तारा व नंतर वसंत गोडबोले आत येतात. वसंतनें तपकिरी रंगाचा सूट चढविला आहे. केस उलटे वळविलेले, डोळ्यांवर चष्मा घातलेला. एकंदरीत प्रथमदर्शनीं कुणावरहि छाप पाडील अशीच त्याची आकृति आहे. तो आल्यावर उषा खुर्चीवरून उठते )

उषा---( शक्य तों तोंडावर स्मित आणण्याचा निष्फळ प्रयत्न करीत ) या, बसा या खुर्चीवर ! ( टेबलाशेजारील खुर्ची पुढें करते. वसंत कांहीं न बोलता खुर्चीवर बसतो. ) उषा पलीकडील आरामखुर्चीवर बसते. ) बैस ना तारे ! उभी कां अशी ! ( तारा तिच्या शेजारील आरामखुर्चीवर बसते. कांहीं वेळ कुणीच बोलत नाहीं. घड्याळाच्या टिकटिकीखेरीज पूर्ण शांतता).

वसंत---माझं पत्र मिळालंच असेल आपणांला ?

उषा---मिळालं, पण अर्थ नाहीं कळला त्याचा नीटसा ! कसला खुलासा पाहिजे आहे आपणाला माझ्याकडून !

वसंत---( जरा साशंक दृष्टीने तारेकडे पहात ) माफ करा हं ! यांच्या-समोर मी विषय काढला तर हरकत नाहीं ना आपली !

उषा---बिलकूल नाहीं ! ही माझी जीवश्च-कंठश्च मैत्रीण आहे आणि हिच्यापासून मी कोणतीहि गोष्ट लपवून ठेवीत नसते हे माहीतच आहे आपणाला ! कांहींहि बोलायचं असल्यास निर्धास्त मनानं बोलायला कसलीच हरकत नाहीं.

वसंत---ठीक ! तर माझा इथं येण्याचा मूळ उद्देश हा आहे कीं, आपला श्रीयुत देशमुखांशीं जो संबंध आहे---

तारा---( रागाने मध्यें ) संबंध ? मि. गोडबोले, तुम्ही शब्दप्रयोग जरा काळजीपूर्वक कराल तर ठीक होईल.

वसंत---( जरा वरमून ) क्षमा करा हं ! मराठी भाषेचं नीटसं ज्ञान नसल्यानं असं होतं कधीं कधीं ! संबंध शब्द योग्य नसेल तर आपण मैत्री म्हणूं ! तेव्हां मी असं विचारीत होतों कीं, तुमची आणि देशमुखांची मैत्री यापुढं अशीच चालू रहाणार आहे कीं काय ?

उषा---( शांतपणें ) ' अशीच ' या शब्दाचा स्पष्टसा खुलासा कराल कां ?

वसंत—'अशीच' म्हणजे हल्लीं चालू आहे तशी! रात्रीं बेरात्रीं त्याच्याबरोबर नाटक–सिनेमा वगैरेला जाणं, वेळीं अवेळीं त्याच्याशीं टेनिस खेळणं—

उषा—(राग आवरण्याचा शक्य तो प्रयत्न करीत) का? यांत तुम्हांला हल्लींच वावगं वाटूं लागलं आहे?

वसंत—पश्चात मीं तुम्हाला सारं कळवलंच असताना तुम्ही मला हा प्रश्न विचारावा हें आश्चर्य आहे. अर्थात् पत्र मी फार कडक भाषेंत लिहिलं ही माझी चूक झाली आणि म्हणूनच आज मी मुद्दाम तुमच्याकडे आलों. पण देशमुख कोणत्या तऱ्हेचा माणूस आहे हे मला वाटतं, मी तुम्हाला त्या पत्रांत कळवलं होतं! (उषा कांहींच न बोलतां फक्त गॅलरीवर आपली नजर खिळवते) लक्ष आहे ना माझ्या बोलण्याकडे? आणि वाटेल तशी भुरटी बातमी नाहीं ही! तुम्हाला सांगायला कांहींच हरकत नाहीं; पण माझ्या मित्रानं प्रत्यक्ष पाहिलेली ही हकीगत आहे. आणि अशा माणसाशीं तुमचा संबंध असावा—

उषा—(जरा रागानें) हें पहा, तुमच्यापेक्षा मी देशमुखांना जास्त ओळखतें हें तुम्ही विसरत चाललात! आज इंग्रजी सिसरीपासून त्यांची अन् माझी चांगली मैत्री आहे. त्याच्याविरुद्ध उठलेल्या वाटेल त्या वावटळी-वर माझा विश्वास बसेल असं तुम्हाला वाटलं तरी कसं?

वसंत—(जरा आश्चर्यानें) अस्सं! म्हणजे विश्वासच बसत नाहीं तर तुमचा या गोष्टीवर?

उषा—कसा बसावा? आज आपल्या वाङ्निश्चयाला एक वर्ष होत आलं–त्या अवधींत तुम्हांला देशमुखाविषयीं कांहींच गैर दिसलं नाहीं, तो उलट प्रत्येक वेळीं त्याची स्तुतीच करीत होता; आणि आत्तांच तुम्हांला तो म्हणजे एक दुर्गुणाचा पुतळा दिसूं लागला, याचा अर्थ काय समजायचा?

वसंत—पण माणसाचं खरं स्वरूप कधीं कधीं फार उशीरां कळत असतं हें विसरू नका!

उषा—हो तर! आणि तें स्वरूप असल्या बाजारगप्पावर विश्वास ठेवू-नच जास्त लवकर कळतं, नाहीं?

तारा— बाकी तुम्ही स्वतःला न कळत एक सत्य गोष्ट बोलून गेलांत हें मात्र खरं !

वसंत—( हातघाईवर येऊन ) मला या जास्त भानगडीची बिलकूल गरज नाही ! मला तुम्हाला एवढेच सांगायचं आहे कीं, तुमचा या देशमुखाशी असलेला वाढता संबंध तुम्हाला कमी केला पाहिजे—नव्हे जवळजवळ तोडला पाहिजे.

उषा—म्हणजे माझ्यावर तुमचा बिलकूल विश्वास नाहीं तर !

वसंत—तुमच्यावर खूप विश्वास आहे माझा, पण देशमुखावर नाहीं ना; त्याला काय करणार ?

उषा—अस्सं ! ( जरा हंसत ) म्हणजे मत्सर नांवाच्या रोगान तुम्हाला सध्यां ग्रासलं आहे तर ! ( जरा गंभीर होऊन ) मी देशमुखाची मैत्री तोडायला तयार आहे—पण एका अटीवर !

वसंत—कोणती अट ती ?

उषा—तुम्ही सुधा साठेशीं असलेला आपला सर्व संबंध अजीबात तोडून टाकला पाहिजे.

वसंत—( दचकून ) सुधा साठे ? तिचा इथं काय संबंध ?

उषा—जो संबंध देशमुखाचा तोच तिचा ! का ? विचार पडला इतका ? कठीण जायला नको वास्तविक तुम्हाला ! नवीनच ओळख दिसते आहे; संबंध तोडणं फारस कठीण जाणार नाहीं.

तारा—हें पहा गोडबोले, मला तुमच्या आजच्या भेटीचा उद्देश काय तो सांगू शकाल का ?

वसंत—( जरा आश्चर्यानें तारेकडे वळून ) प्रथमच सांगितला आहे मीं तो उद्देश !

तारा—तोच उद्देश आहे तुमचा; नक्की खात्री आहे ना ?

वसंत—अगदीं !

तारा—म्हणजे उषेनं देशमुखाची मैत्री तोडली तरच तुम्ही तिच्याशीं लग्न करायला तयार आहांत; असंच ना तुमचं म्हणणं ?

वसंत—( गोंधळून ) उत्तर काय द्यावं हेंच समजत नाहीं. असंच कांहीं–म्हणजे तसा नव्हता माझ्या बोलण्याचा अर्थ !

तारा—तुमच्या बोलण्याचा काय अर्थ होता मग ? तो तरी नीट कळूं द्या ! त्यावर मागून घोटाळे नकोत. ( वसंत कांहींच बोलत नाहीं. उत्तर काय द्यावें याचाच त्याला प्रश्न पडतो, काहीं वेळ शातता. थोड्या वेळानें वसंतचा कांहीं निश्चय ठरतो. तारा तें ताडते ) मग काय ठरवलंत मघांच्या प्रश्नाचं उत्तर ?

वसंत—देशमुखाशीं उषेचा असलेला संबंध पसंत नाहीं हेंच मी सांगायला आलो होतो. माझ्या भेटीचा उद्देश हाच होता.

तारा—पण ती आता त्याची मैत्री सोडायला तयार आहे मग !

वसंत—आतां ती तयार असेल; पण आतांपर्यंत घडलेल्या तिच्या गैरवर्तणुकीबद्दल जबाबदार कोण ? ( स्फोट ! उषा व तारा रागाने एकदम उठतात. वसंत शांतपणे दोघींकडे पहातो आणि आपल्या विधानांचा त्यांच्यावर झालेला परिणाम अजमावतो. )

उषा—( रागाने ) वसंतराव, माझा अपमान करण्याकरितां तर तुम्ही इथं आला नाहींत ? कोणत विधान करतां आहांत माझ्या बाबतींत ? ( रागातिशयाने पुढें बोलवत नाहीं. )

तारा—( रागातच ) जिभेला हाड नाहीं म्हणून वाटेल ते बोलण्याचं तुम्हीं ठरवल आहे वाटत ? शरम वाटायला पाहिजे होती हें विधान करतांना ! देशमुखांवर तुम्ही केलेला आरोप मला आता तुमच्यावर करावासा वाटतो.

वसंत—( शातपणें ) तुम्ही दोघीहि माझ्यावर उलटणार असं मला वाटलच होतं ! पण सत्य कितीहि अप्रिय असलं तरी तें सत्य असतं हें विसरून चालायच नाहीं. माझ्या लक्षात ही गोष्ट आली नव्हती असं का समजता तुम्ही ?

उषा—( रागातिशयानें ) चूप ! एक शब्द आतां जास्त बोलाल तर गोविंदाला बोलावीन मी वरती ! निर्लज्ज ! विश्वासघातकी !

वसंत—पहा ! यांच्या रागाचा अर्थ मी काय करूं आतां !

तारा—( उषेला खालीं बसवीत ) उषे खालीं बस बघूं ! मिस्टर गोडबोले, वाङ्निश्चय मोडण्याच्या निश्चयानं तुम्ही आलां आहात हे आम्हाला माहीत होतं; पण अशी बेजबाबदार विधानं करायची तुम्हाला खरोखर लाज वाटली पाहिजे. इतके शिकलेले तुम्ही—

वसंत—( रागाने मध्येच ) मिस् बापट, मला वाटतं तुम्ही व्यर्थ लुड-बुड करीत आहात या प्रकरणात ! मी उषेशीं बोलतो आहे हें विसरूं नका तुम्ही !

तारा—आणि उषेची मैत्रीण या नात्यानं असल्या अपमानकारक विधानांना उत्तरं देणं माझहि कर्तव्य आहे हेंहि तुम्ही विसरूं नका ! तुमचा आणि सुधा साठेचा सबंध कसल्या तऱ्हेचा आहे ते तुम्ही सांगूं शकाल ना ?

वसंत—पुन्हां तुम्ही सुधा साठेला या प्रकरणात गोवताच आहांत ! तिचा इथं संबंध येतो कुठं हेंच मला समजत नाहीं !

तारा—तिच्याशीं लग्न करण्याकरितांच तुम्हांला हा विवाह मोडायचा आहे ना ?

वसंत—अगदीं खोटी गोष्ट आहे ही !

तारा—सुधा साठेनं अशी माझ्याजवळ कबुली दिलेली आहे हें सांगि-तलं तर तुम्हाला आश्चर्य वाटेल का ? उतरलासा चेहेरा तुमचा ? घाबरूं नका ! माझी न् तिची कालच नवीन ओळख झाली आहे—

वसंत—( उठून ) अच्छा ! मला वाटतं, मी आता येथून जावं हें उत्तम. मिस् काळे, आपल्या या मुलाखतीचा योग्य तो बोध आपण घ्यालच ! तर आपल्या वडिलाना आपला विवाह मोडल्याची बातमी सांगण्याची कामगिरी मी आपल्याच गळयात घालतो. जातो मी ! ( जाऊं लागतो ).

उषा—( एकदम उठून ) थांबा ! ( वसंत आश्चर्यानें थांबून तिच्याकडे बघतो. ) तुम्ही माझ्याबद्दल आता केलेलीं अपमानकारक विधानं परत घेतलीं पाहिजेत !

वसंत—नाहींतर काय कराल तुम्ही ?

तारा—काय कराल ? माझी न् साठेची ओळख झालेली आहे हें विस-

रतां तुम्ही ! तुम्ही तुमचे शद्ब परत घेतले नाहींत तर या मुलाखतीचा शब्द अन् शद्ब साठेंच्या कानावर जाईल हे लक्षांत ठेवा !

वसंत—( उपहासाने ) अस्सं ! धमकी देतांय् तर तुम्ही मला ! तुमच्या धमकीनं मी अगदीं गोंधळून जाईन असं वाटत असेल नाहीं तुम्हाला ? तरीपण तुम्हाला तीं विधानं इतकीं जाचक होत असतील तर परत घेतो मीं ! ( उषेकडे वळून ) मात्र तुमच्या वर्तणुकीचं तिऱ्हाइताच्या दृष्टीनं एकदां पृथक्करण करून पहा, येवढेंच मला जातांना सांगावंसं वाटतं !

उषा—( रागाने ) जातां जाता तुम्हाला मला येवढंच सांगावसं वाटतं, कीं तुम्ही नीच आहात, कपटी आहांत—

वसंत—( हसतो ) वा ! आभारी आहे आपल्या स्पष्टवक्तेपणाबद्दल ! अच्छा ! घेतों तर निरोप. ( दरवाजा उघडून जातो ).

( तारा दरवाजापर्यंत जाते व दार आतून लावून घेते. पण उषेच्या हुंदक्यांच्या आवाजानें ती एकदम दचकून मागे वळते. उषेनें दोन्ही हातात आपलें तोंड दडवून अश्रु आंवरण्याचा प्रयत्न चालविलेला असतो. )

तारा—( उषेच्या खुर्चीवर बसून तिच्या पाठीवर थोपटीत ) अहा ग वेडाबाई, रडतेस तू असल्या माणसाकरिता ? असल्या माणसाशीं तुझा विवाह झाला असता तर काय झाले असत कल्पना कर ! आनंद मानायच्या गोष्टीबद्दल वाईट वाटून घेणारी तू खुळीच दिसतेस एक ! ( तिचा चेहरा बळजबरीने वर उचलून पदराने तिचे डोळे पुसते ) वेडी कुठली ! खरच उषे, तुला हंसता येतं का ग ? ( उषा हंसण्याचा निष्फळ प्रयत्न करते. पण ते साधत नाहीं. डोळ्यात पुन्हा अश्रु येतात. )

उषा—खर सांगू तारे ! मला त्याच्या स्वभावाची ही बाजू आजच कळली. मनाला फारच धक्का बसला त्यामुळं ! इतका वेळ मनानं कसा तग धरला हेंच समजत नाहीं. साऱ्या कल्पना पत्त्याच्या बंगल्याप्रमाणं वाऱ्यान पूर्ण कोसळाव्या, तस झालयू माझं !

तारा—पण सबंध एक वर्षात तुला त्यांच्या स्वभावाची परीक्षा नीट झाली नाहीं याचंच आश्चर्य वाटत मला अद्याप !

उषा—मलासुद्धा तेच नवल वाटतंय ! मत्सराचं बीज त्यांच्या

मनांत पेरलं गेलं असेल याची मला कल्पनाहि नव्हती. पण त्या पत्रानं चांगले डोळे उघडले माझे ! आणि आत्तांच्या प्रसंगानं कळसच चढवला त्या सर्वांवर ! छे ! अद्याप मी हें सारं स्वप्नच अनुभवतें आहे असं मला वाटतंय् ! ( थोडा वेळ स्तब्धता ! ) पण तुला ती सुधा साठे कधीं भेटली होती ग ?

तारा—( हंसत ) छे ! भेटली कुठची ? मीं तिला पाहिलीहि नाहीं कधीं ! दिली एक थाप ठेवून स्वारीला !

उषा—( आश्चर्यानें ) मग तूं सांगितलेली सारी बातमी—

तारा—दादाच्या मित्रानं सांगितली मला ती ! त्या स्वारीच्या वर्तणुकी-वरून आतां तर खात्री झाली पक्की ! पण उषे, मला एक सांग, अगदीं खरं खरं उत्तर दे ! ते गेल्यावर तुला जो हुदका आला त्याचं कारण काय ? ( उषा कांहींच बोलत नाहीं ) अद्याप प्रेम आहे तुझं त्याच्यावर ? इतका त्यांनीं अपमान केल्यानंतरहि ? ( तरी उषा कांहीच उत्तर देत नाहीं. शेवटचा प्रश्न ऐकल्यावर ती तोंड फिरवते व पदराच्या टोकानं अश्रु पुसते ) ए. बोल ना ?

उषा—तारे, कृपा करून हा विषय काढूं नकोस ना आतां ! माझ्या मनांत वादळ चालू आहे आणि तूं त्याला भरती आणते आहेस ! झालं ते गेलं आतां ! त्यांचा नू माझा विवाह आता यापुढं होणं शक्य नाहीं हें मात्र अगदीं नक्की ! ( पूर्ण स्तब्धता ! तारा मुकाट्यानं आपल्या समोरच्या कॅलेंडरकडे पहात असते. उषेने आपली शून्य दृष्टि जमिनीवर लावलेली असते. एकदोन मिनिटें अशींच स्तब्धतेत जातात. इतक्यांत दारावर 'टक्‌टक्' असा आवाज येतो. तारा उठते ).

तारा—( दरवाजा उघडीत ) काय रे गोविंद ? काय आहे ?

गोविंद—( आंत येत ) गोडबोलेसाहेब खाली बसले हायती ! ( उषा आश्चर्यानें त्याच्याकडे पाहाते ) कागद् दिलाय् त्यांनीं उषाबाईसाठीं ! उत्तर लवकर मागुतलय. ( पत्र तारेच्या हातात देतो ).

तारा—( आश्चर्यानें कागदाकडे पहात ) बरं ! जा तूं खालीं ! उत्तर लिहिलं म्हणजे बोलावीन मी तुला वर ! ( गोविंद जातो. तारा दार लावून

घेते. उषा आश्चर्यानें व कांहींशा तिरस्कारयुक्त संतापानें तारेच्या हातांतील पत्राकडे पहाते. तारेचे आश्चर्यसुद्धा तिच्या चेहेऱ्यावर प्रतिबिंबित झालेलें असतें ).

उषा---तारे, दे पाहूं तें पत्र इकडं !

तारा---अंऽहं, ! बिलकूल नाहीं मिळणार तुला तें ! घेऊन ताबडतोब चिंध्याच करणार असशील ना ? जरा शांत हो ! हा आणखी मत्सराचा कोणता प्रकार आहे तें पाहूं--आणि योग्य उत्तरहि देऊं या पत्राचं !

उषा---( संतापाने ) मी ते पत्र बिलकूल वाचणार नाहीं ! इतका अपमान करून वर पुन्हा पत्र लिहिण्याचंहि धारिष्ट ! यांचं काळीज अगदींच उलट आहे कीं काय कुणास ठाऊक ! ( उषेचे भाषण चालू असतांनाच तारा तें पत्र वाचत असते. आणि वाचत असताना आश्चर्याचा पारा एक एक अंशानें चढत चढत, पत्र संपल्यावर अगदीं परमावधीस पोचून 'अगबाई' असे उद्गार तिच्या तोंडातून निघतात. त्याबरोबर उषाहि पण तिच्याकडे आश्चर्यानें पहाते ).

तारा---( आश्चर्याच्या भरांत ) अग उषे, पाहिलंस काय लिहिलं आहे त्यांनीं ?

उषा---तूं पत्र इकडं आण पाहूं !

तारा--- अं-हं ! वाचून दाखवते मी तुला ! ऐक ! ऐकताना आश्चर्याचा पारा मात्र चढू देऊं नकोस हं ! ( वाचू लागते. ) 'प्रिय उषे-'

उषा---( रागाने ) लाज वाटायला पाहिजे हे शब्द आता वापरतांना !

तारा---तू पत्र संपेपर्यंत बिलकूल बोलू नकोस बघू ! मुकाट्यानं ऐक अगदीं ! ( वाचते ) 'क्षमा कर मला फसवणुकीबद्दल ! मधाचं सारं नाटक होतं अगदीं ! काहीं काहीं खर नाहीं त्यांतलं ! सुधा साठेबद्दलची मिस् बापटची गैरसमजूत मींच मुद्दाम माझ्या मित्राकरवीं करून दिली होती. अर्थात् साध्या ओळखीशिवाय त्या बाबतींत कांहींच तथ्य नाहीं.' ( पत्र चालूं असताना अत्यंत आश्चर्यानें उषा उठून उभी राहते व विस्फारित नेत्रांनीं तारेकडे बघूं लागते ).

उषा--( मधेच ) जरा थांब ! एखादी अरेबियन नाइटस्‌मधील गोष्ट तर नाहीं ना वाचून दाखवत तू !

तारा--( शांतपणें ) पत्रांत आहे तो मजकूर वाचून दाखवतें आहे तुला ! एक शब्दहि माझा नाहीं यांतला ! नीट ऐक आतां ! मधे अडवूं नकोस पुन्हां ! ( वाचू लागते ) 'आत्तांपर्यंत केलेल्या या साऱ्या नाटकाचं कारण म्हणजे मला तुझी परीक्षा पहायची होती. उषे, क्षमा कर मला, पण तुझ्या व देशमुखांच्या मैत्रीच्या शुद्धतेविषयीं या वीस दिवसांत माझं मन बरंच साशंक झाल होतं. त्यांत एका गृहस्थान--त्याच नांव मी सांगत नाहीं--बरीच भर घातल्यानें खूपच कलुषित झालं होतं माझ मन ! आणि म्हणूनच मला हे कारस्थान घडवून आणावं लागलं. तुझ्या सात्त्विक संतापाने! '

उषा--( मधेच एकदम ) इकड आण पाहूं तें पत्र ! ( तिच्या हातांतून पत्र घेऊन वाचू लागते. पत्र वाचताना आश्चर्य, उद्वेग, विषाद, संताप वगैरे निरनिराळे विकार तिच्या चेहऱ्यावर गर्दी करतात. पत्र वाचल्यावर पुन्हां उगीचच पत्र उलटे करून बघते ) परीक्षा--ह ऽ ऽ ऽ ! झाली खरी परीक्षा--पण तुमची ! माझी नव्हे ! ( पुन्हां एकदां उद्वेगाने पत्रावर दृष्टि टाकून शांतपणें पत्राच्या चिंध्या करू लागते. )

तारा--( आत्यंतिक आश्चर्यानें तिच्याकडे पहात ) उषे, काय करतेस तूं हें ! पत्राच्या चिंध्या ! मघांशीं त्याच्याकरितां अश्रु ढाळत होतीस--

उषा--( रागानें मधेच ) स्त्रियांचीं हृदयं म्हणजे खेळणीं समजतात कीं काय हे ! कां स्त्रियांना कांहींच भावना नसतात अशी यांची समजूत आहे ? आपल्या भावनेप्रमाणं व लहरीप्रमाण स्त्रियांविषयीं यांनीं वाटेल त्या अनुदारपणाच्या कल्पना कराव्यात, कल्पनेनं त्यांच्या शीलावरहि शिंतोडे उडवावेत आणि स्त्रियांनीं मात्र अगदीं मुकाट्यानं यांचा अन्याय सहन करून नम्रपणें याच्यापुढं मान लववावी, अशी तर यांची स्त्रीजातीविषयीं समजूत नाहीं !

तारा--( अद्याप गोंधळलेली ) मला नाहीं नीटसं कळल कशावर व्याख्यान दिलंस तें ! स्पष्ट बोल ना जरा !

उषा--स्पष्ट काय बोलूं ? ज्या गृहस्थाला आपल्या भावी पत्नीच्या शीलाविषयीं खात्री वाटत नाहीं, जो दुसऱ्यांनीं उठवलेल्या निंदेच्या

बावटळीवर आपलीं मतं बनवून आपल्या भावी पत्नीचा अपमान करण्यास कमी करीत नाहीं, त्याच्याशीं विवाह करणं न्याय्य ठरेल का ! तूंच सांग !

तारा——पण अशी शंका घेतल्याबद्दल त्यांनीं पश्चात्ताप नाहीं का व्यक्त केला ?

उषा——( तिरस्कारानें हंसून ) पश्चात्ताप ? हं ! तारे, तुला माहिती नाहीं. पुरुषांचा पश्चात्ताप पाण्यावरील बुडबुड्याप्रमाण असतो. क्षणांत हे पश्चात्ताप व्यक्त करतील तर दुसऱ्या क्षणीं तिचा पुन्हां अपमान करण्यास कमी करणार नाहींत. त्यांतल्या त्यांत नुसत्या लोकनिंदेवरून आपलीं मत बनविणाऱ्या प्रत्यप्रत्ययनेय बुद्धीच्या माणसाचा मला फार तिटकारा आहे. माफ कर मला तारे ! या बाबतींत माझं मत मीं ठाम बनवलं आहे ! कुणीहि तें बदलू शकणार नाहीं ! ( स्तब्धता ).

तारा——( कांहीं वेळानें ) मग काय उत्तर लिहिणार आहेस तूं त्यांना ! खालीं ते वाट पहात असतील उत्तराची ! नाहीं कां !

उषा——हो, खरंच ! उत्तर द्यायचं आहे त्यांना, नाहीं कां ? थांब हं ! आतां तीनचार ओळींतच देतें उत्तर त्यांना ! ( टेबलाजवळची खुर्ची जरा टेबलाजवळ सरकवून त्यावर बसते व पॅडमधील एक कागद फाडून त्यावर उत्तर लिहिण्यास सुरुवात करतें. तारा आरामखुर्चीवर बसते व कांहींशा आदरयुक्त अशा दृष्टीनें तिच्याकडे पाहूं लागते. थोड्याच वेळांत उषा पेन खालीं ठेवून नोटपेपर हातांत घेते. ) वाचून दाखवतें बर का तुला उत्तर ! अगदीं थोडक्यांतच लिहिले आहे. ( वाचते ) ' आपल्या पत्रांतील मजकूर वाचूनहि यापुढं आपली भेट केव्हांहि न घेण्याच्या माझ्या निश्चयांत बदल झाला नाहीं याबद्दल वाईट वाटतं. एक वर्षाच्या सहवासानतरहि ज्याला आपल्या भावी पत्नीच्या शीलाबद्दल खात्री वाटत नाहीं, आणि जो कुणाच्याही भुरट्या बातमीवर विश्वास ठेवून तिच्या गैरवर्तणुकीबद्दल शंका व्यक्त करूं शकतो, अशा माणसाशीं विवाह करण्याची माझी बिलकूल इच्छा नाहीं. आणि या दृष्टीनं आपण प्रयत्नहि करूं नये. ' ( नोटपेपर टेबलावर ठवते व त्याकडे पहाते ) कां ? पुरे ना येवढं ?

तारा——पण उषे, पूर्ण विचार करून लिहिलेलं आहेस ना पत्र ?

उषा---अगदीं पूर्ण ! ( टेबलावरील एक कोरें पाकीट काढून त्यांत पत्र घालते. ) स्त्रियांच्या हृदयाशीं निष्ठुरपणे खेळ खेळणाराला यापुढं कळलं पाहिजे, कीं त्यांनाहि स्वाभिमान आहेच. तेच दाखवायचं आहे मला ! ( पाकिटावर नांव लिहू लागते. तारा उठून तिच्या खुर्चीमागें उभी राहते.)

तारा---( आदराने तिच्याकडे पहात ) उषे,खरेच तुझ्याविषयीं वाटणारा आदर कितीतरी पटीनं वाढला आज! तुझ्यासारखी स्वाभिमानी वृत्तीची मुलगी माझी मैत्रिण आहे म्हणून मला किती अभिमान वाटतो म्हणून सांगूं !

उषा---( पेन खालीं ठेवून मागे वळत तिच्या दृष्टीला दृष्टि देऊन ) अय्या ! खरच ! मला हरभऱ्याच्या झाडावर चढविण्याचा प्रयत्न आहे वाटत तुझा हा ? बरीच आहेस कीं ग तारे तूं ! ( दोघीहि एकमेकीकडे पाहून हंसतात. दरवाज्यावर 'टकटक' ऐकूं येते. दोघींचेही लक्ष दरवाजाकडे जाते.)

उषा---कोण आहे ?

गोविंदा---( बाहेरूनच ) उत्तर मागितलय् साहेबांनीं !

उषा---अगबाई, गोविंदा आला वाटतं हं उत्तर न्यायला ! तारे, हें पाकीट देतेस का त्याच्याजवळ ? मी जरा पसारा आंवरतें टेबलावरचा !

( पाकीट तारेच्या हातात देतें. तारा दरवाजा उघडण्यास जाते. टेबल आंवरता आंवरता डोळ्यांत उभे राहिलेले अश्रु उषा पदराच्या टोकानें हळूंच पुसते--आणि पडदा पडतो. )

---

# ना ट क १२

### प्रवेश पहिला

( पुण्यांत डेक्कन जिमखान्यावरील बंगल्यांतील आधुनिक तऱ्हेनें शृंगारलेली एक खोली. वसंत ईझिचेअरवर मेकॉले वाचीत बसला आहे. टेबलाजवळच खुर्चीवर मालती कांहींतरी—डायरीच बहुतेक—वाचण्यांत गुंग झाली आहे. खोलींतलें घड्याळ पांच वाजून पधरा मिनिटे झाल्याचें सांगत आहे. )

मालतीः—( एकदम शांततेचा भग करीत ) इश्श, भाऊजी, हें हो काय ! कॉलेजात जाऊन हेच उद्योग करतां वाटतं !

वसंतः—( तिच्या उद्‌गारानें एकदम तिच्याकडे पहातो, पण तिच्या हातांत डायरी पाहिल्याबरोबर चपापतो ) वहिनी, वा छान ! माझी डायरी कां घेतलीस तूं ? कुठ मिळाली तुला ! बॅगमधील काढून घेतली असशील बहुतेक, होय ना !

मालतीः—इश्श, ! मी कशाला तुमची बॅग धुंडाळायला जाऊं ! टेबलावर तर पडली होती. म्हटलं बघू तरी भाऊजींनीं कॉलेजांत काय काय पराक्रम केलेत ते ! ( तोंडाला पदर लावून हंसते ).

वसतः—( गंभीरपणें ) पण वहिनी, वाचलीस कां ती डायरी अगोदर तू ? दुसऱ्याची खाजगी डायरी वाचूं नये एवढ कळत नाहीं तुला ?

मालतीः—( हसे आवरीत ) पण मी म्हणते, एवढी खाजगी होती तर ठेवावीच का वरती ? स्वतां अगदीं निष्काळजी रहायचं अन् दुसऱ्याला नांवं ठेवायचीं ! तुम्हीच जर नीट ट्रंकेत उचलून ठेवली असती तर मी ट्रंक धुंडाळायला नसते कांहीं गेले !

वसंतः—( पूर्वीचाच गंभीरपणा कायम ठेवण्याचा प्रयत्न करीत ) पण डायरी वाचायचं कारणच काय मुळीं तुला ? मी वरती ठेवीन नाहींतर

आणखी कुठंही ठेवीन ! पण तुला येवढ सुचलं नाहीं कीं, बुवा ही दुसऱ्याची खाजगी डायरी आहे, आपण वाचूं नये ! येवढ मनावर नियंत्रण नाहीं तुझं ! समज, तुझी न् दादाचीं पत्र मी वाचूं लागलो तर ! अं ऽ ! ( हंसूं लागतो ).

मालतीः—( मानेला झटका देत ) इश्श ! आमचीं पत्र कांहीं तुमच्या डायरीसारखीं अस्ताव्यस्त पडलेलीं नसतात, बर कां ? पण तें जाऊं द्या भाऊजी ! मला हें सांगा, ही सुमति केळकर कोण ?

वसंतः—( चपापून ) कोण ?

मालतीः—( हसत ) सुमति केळकर ! एफ. वाय. ए. फर्ग्युसन कॉलेज नंबर काय बरं तिचा ? ( डायरींत पाहूं लागते ).

वसंतः—( उठत ) वहिनी ती डायरी आण बघूं अगोदर इकडे !

मालतीः—(डायरी मागे लपवीत ) अं हंऽ ! पण मला अगोदर हें सांगा ना ! ही सुमति केळकर कोण ?

वसंतः—( जोरांत ) वहिनी, तुला डायरी द्यायची आहे कीं नाहीं !

मालतीः—अगोदर माझ्या प्रश्नाचं उत्तर ! मग डायरी द्यायची कीं नाहीं हा विचार ! सांगा ना, ही मुलगी कोण आहे ?

वसंतः—वहिनी, मी आतां दादाला हाक मारीन हं ऽ ! ( दरवाजा-कडे जात ) दादा, अरे दादा ऽऽ ( मालती एकदम जोरांत हंसूं लागते. वसंत आश्चर्यानें वळून पहातो. )

मालतीः—( हंसत ) इश्श ! मला धमकी देतां कीं काय भाऊजी ! केव्हांच बाहेर जायचं झालंय् ! मेकॉलेपुढे कांहीं शुद्ध असेल तर ना ?

वसंतः—( दीर्घ सुस्कारा सोडून ) हं ऽऽऽ ! म्हणून इतका जोर आलेला दिसतोय् तुला ! पण वहिनी, लक्षांत ठेव हं ! माझी खाजगी डायरी वाचते आहेस ! दादांना सांगेन बरं का मी सगळं ! हो ! आज खाजगी डायरीच वाचलीस, उद्यां माझं लग्न झाल्यावर माझीं खाजगी पत्रही वाचूं लागशील कीं !

मालतीः—(हंसत) बरं बरंऽ ! कळलं हं ऽ ! पण भाऊजी, मुख्य प्रश्न राहिलाच कीं ! ही केळकर कोण ?

वसंतः---( प्रश्न उडवून देण्याच्या हेतूनें गंभीर मुद्रेनें शेजारच्या स्टुला-वरचा मेकॉले उचलून ) कोण केळकर म्हणतेस ? मला नाहीं बुवा कांहीं माहिती ! ( मेकॉले डोळ्यासमोर धरतो, इतक्यांत मालती त्याच्या हातां-तला मेकॉले हिसकून घेऊन टेबलावर ठेवते. )

मालतीः---अशी टाळाटाळी नाहीं चालायची हं भाऊजी ! म्हणे माहिती नाहीं ! डायरींतलीं चांगलीं पंधरावीस पान अडविलीं आहेत कीं या मुलीन ! बरी माहिती नसेल !

वसंतः---( हंसत ) पण वहिनी, तुला करायची आहे काय तिची माहिती ? भेटायला कां जाणार आहेस तिला तू ?

मालतीः---इश्श, तस नाहीं कांहीं ! पण म्हटलं भाऊजीवर इतकी मोहिनी घालणारी मुलगी तरी कोण आहे याची माहिती असावी.

वसंतः---( हसत ) मोहिनी ? हं ! वेडी आहेस तू वहिनी ! माझ्यावर तिची मोहिनी पडली असं समजतेस कीं काय ? चूक आहे. अग मी एफ्. वाय्. ला कॉम्पोझिशन टयुटर नव्हतो कां ? अन् तीहि एफ्. वाय्.-मधेच होती. तेव्हां सहाजिकच तिची "एसे" ची वही माझ्याकडे तपा-सायला यायची ! म्हणून मला तिची माहिती ! समजलं ? उगीच नसत्या कांहींतरी शंका काढतेस झालं !

मालतीः---बऱ्या नसत्या शंका असतील हो ! बत्तीस मुलींच्या वह्या येत होत्या तुमच्याकडे तपासायला ! मग बाकींच्या मुलींचीं कुठं वर्णनं दिसत नाहींत हो ?

वसंतः---म्हणजे ? साऱ्या मुलींचीं वर्णन लिहिण्याकरितां मी डायरी केली आहे असं समजतेस कीं काय तूं ?

मालतीः--- मग हिचं एकटीचंच कां वर्णन ?

वसंतः---( काय उत्तर द्यावे हें न सुचून ) कां म्हणजे ? मला वाटलं म्हणून ! तूं कोण विचारणार ?

मालतीः---म्हणजे याचाच अर्थ हा कीं, तुमचं हिच्यावर प्रेम आहे.

वसंतः---( एकदम मोठ्याने हंसत ) प्रेम ? वहिनी, काव्याच्या वाता-वरणांत तूं अद्याप भराऱ्या मारते आहेस कीं काय ? जरा डोळे उघड !

आजूबाजूला बघ ! म्हणजे या व्यवहारी जगांत 'प्रेम' शब्द नुसत्या नांवाला शिल्लक आहे हें दिसून येईल. म्हणे प्रेम ! वेडी आहेस झाल तूं !

मालतीः—भाऊजी, बडी बडी वाक्यं तोंडावर फेंकून विषय उडवून देण्याचा प्रयत्न करूं नका हंऽ! तुमच त्या मुलीवर प्रेम नाही ना? मग मला या "पॅसेज–" चा अर्थ सांगाल कां ? २३ सप्टेंबरला लिहिलत तुम्ही ! (वाचते) 'आज फिरायला जात असतांना सुमति केळकर मैत्रिणीबरोबर हिलवर जात असलेली दिसली. किती सुंदर अन् प्रसफुल दिसते ती ! ते तिचे कुरळे केस, डोळ्यांत चमकणारी निळसर लहर, हंसतांना गालावर पडणारी खळी...

वसंतः—( मध्येंच ओरडून ) वहिनी, पुरे करतेस कीं नाहीं तूं ?

मालतीः—( हसत ) इश्श ! रागावलांत वाटतं भाऊजी ! पण थांबा ना ! १२ डिसेंबरला काय लिहिलत ऐका तरी ! ( वाचते ) 'आज निबंधाची वही घ्यायला सुमति आली होती. तिला तिच्या चुका समजावून देतांना हृदय कसे धडधडत होतें. बोलतांना कितीदां तरी अडखळलों मी ! कां व्हावे असे हें ?

वसंतः—( तिच्या हातांतून डायरी हिसकावून घेऊन ) वहिनी, खोलींतून बाहेर जा पाहूं आतां तू ! मला येवढ लेक्चर सपवायचंय् !

मालतीः—( हंसत ) केळकरशी बोलतांना हृदय धडधडते काय ? अन् असं कां व्हावं हें समजत नाहीं तुम्हांला, नाहीं ? मी सांगूं कां भाऊजी असं कां होतें तें ?

वसंतः—( हंसत ) अनुभवानं कां ?

मालतीः—( लाजून ) इश्श ! अनुभवाशिवाय कांहीं गोष्टी कल्पनेनं जाणतांच येत नाहींत वाटतं ?

वसंतः—म्हणजे ? प्रेमाचा तुला अनुभव नाहीं असं तुझं म्हणणं आहे ?

मालतीः—( गोंधळून ) असा कां माझ्या बोलण्याचा अर्थ घेतलांत भाऊजी ? मी इतकेंच म्हणणार होतें...( थांबते. गोंधळाच्या भरांत काय बोलणार होती हेंच विसरते. इतक्यांत बाहेरून 'साठे, अरे साठे, साठे आहे का घरांत ?' अशी आरोळी ऐकूं येते. वसंत गडबडीनें उठतो. )

वसंतः—आलों रेऽऽ! वहिनी, तीन कप चहा कर पाहूं झटकन्! लवकर हंऽ! मला पहिला 'शो' गांठायचा आहे. (पुन्हा बाहेर आरोळी) अरे थांबा ना थोडं!

वहिनीः—भाऊजी, तुम्ही नेहमीं एकटे एकटे सिनेमाला जातां हंऽ!

वसंतः—तुला आहेच कीं दादा सिनेमाला न्यायला! जा लवकर! झटपट कर हंऽ! आलो, आलोंऽ—(जातात) पडदा पडतो.

* * —

## प्रवेश दुसरा

(स्थळ—त्याच बंगल्यांतील दिवाणखाना. बाबासाहेब ईझिचेअरवर बसले आहेत. शेजारच्या खुर्चीवर मनोहर बसला आहे. टेबलावर उगीचच पुस्तकांची चाळवाचाळव करीत वसंत बसला आहे.)

बाबासाहेबः—तेव्हां मग त्या गोडबोल्यांच्या भाचीशी तुझं लग्न नक्की करून आलों. म्हटलं मुलगी सुशिक्षित आहे, सुस्वरूप आहे, अन् घराणही चागलं आहे. शिवाय गोडबोले माझे बालमित्र, तेव्हां त्याचा शब्दही मला मोडतां येईना. तेव्हां आतां मुहूर्त....

वसतः—(शक्यतों मनोविकार आवरण्याचा प्रयत्न करीत मधेंच) पण बाबा, मला हें स्थळ पसंत नाहीं.

बाबासाहेबः—(एकदम ईझिचेअरवर सरळ बसून वसंतकडे पहात) पसंत नाहीं? कां रे? मुलगी चांगली शिकलेली आहे अन् सुंदरही आहे; मग पसंत नसायला काय झाल! तुझ्या दादानंच मुलगी पसत केली आहे. त्याला विचार पाहिजे तर! काल मी याद्यासुद्धां करून आलो अन् आतां पसत नाहीं म्हणतोस तूं?

वसंतः—पण मला विचारल्याशिवाय तुम्ही हे स्थळ नक्की तरी कसं केलंत बाबा? मुलगी काळी आहे का गोरी आहे हें मीं पाहिलही नाहीं. अन् उगीच वाटेल त्या अनोळखी मुलीशीं लग्न करूं?

बाबासाहेबः—हात्तीच्या! येवढीच अडचण ना! मग आतां पाहून ये मुलगी! मला वाटलं तूं मुलगी पाहिलीस अन् तुला ती आवडली नाहीं

कीं काय ? अन् काय रे, तुला काय वाटतं, आम्हांला तुझी अगदींच काळजी नाहीं ? एखादी काळी अन् कुरूप मुलगी तुझ्या गळ्यांत बांधू ? अं ऽ ?

वसंतः---पण जिथं दोघांच्या जन्माचा प्रश्न त्या दोघांनाही तुम्ही विचाराबाहेर टाकलंत ना ? क्षमा करा बाबा, पण मला हा विवाह मुळींच पसंत नाहीं.

बाबासाहेब---( जरा शांतपणें ) हे पहा वसंत, आतां पूर्वीचा हट्टी-पणा सोडून दे जरा ! विवाह पसंत नसायला रे काय झालं ? सांग पाहूं. मुलगी चांगली नाहीं ?

वसंत...छे ! तिला पाहिलीही नाहीं मी अद्याप !

बाबासाहेब---मग घराणं पसंत नाहीं तुला ते ?

वसंत---अहं ! तसं कांहीं नाहीं !

बाबासाहेब---मग विवाह कां पसंत नाहीं ? आतां याद्या वगैरे करून सारं नक्की केलंय् अन् आतां त्यांना लग्न मोडलं म्हणून सांगू वाटतं ? मोठं चांगलंच दिसेल नाहीं ते ? लोक चांगलं शेण घालतील कीं तोंडात ?

वसंत---( गोंधळ लपविण्याचा प्रयत्न करीत ) बाबा, कसं सांगूं तुम्हांला ! पण या मुलीशी मला लग्न करतां येणार नाहीं हें नक्की !

बाबासाहेब---( जरा रागानें ) कां ? कारण काय ?

वसंत ( गोंधळून ) बाबा... ( सांगावं कीं नाहीं म्हणून गोंधळतो. पण अखेर धीर धरून ) बाबा, ... कॉलेजांतल्या एका मुलीशीं लग्न कर-ण्याचं मी नक्की ठरवलं आहे !

बाबासाहेब---( एकदम आश्चर्यानें ) काय ? खरं सांगतोस तूं ? ( वसंत कांहींच बोलत नाहीं ! एकदोन मिनिटें पूर्ण शांतता ).

बाबासाहेब---( आश्चर्याचा पहिला भर ओसरल्यावर ) अस्सं ! एकूण कॉलेजांत जाऊन तुम्ही हेही केलंत म्हणायचं ! ठीक आहे ! आपला मार्ग यापुढं मोकळा आहे आपणाला ! माझी कांहीं आडकाठी नाहीं त्याला ! मात्र यापुढं या घराची पायरी चढायची बंदी होईल !

मनोहर---वसंत, तुला कांहीं कळतं कां रे ? आतां बाबांनीं तिकडे

सार नक्की केलंय्, याद्यासुद्धां झाल्या. अन् आता लग्न मोडलं म्हणून सांगा यच वाटतं ? चागलीच बेअब्रू होईल कीं आपली !

वसंत---दादा, पण मी तरी काय करू त्याला ? लग्न ठरवतांना तुम्ही माझा जर विचार घेतला असतां तर इथपर्यंत पाळीच कशाला आली असती ? माझा तरी काय इलाज अहे त्याला आतां ?

मनोहर---( रागानें ) वसंत...

बाबासाहेब---( त्याला अडवून ) कशाला वाद घालतोस त्याच्याबरोबर मनोहर ! बी. ए. झालाय् तो ! थोडी जास्त अक्कल आली ना त्याला आतां ! शिवाय आपण दावेदार त्याचे ! एकादी काळी म्हैस गळ्यांत बांधली तर काय घ्या ? ( वसंतकडे वळून ) बरं आहे. सागतो मी त्यांना जाऊन लग्न मोडलंय म्हणून ! गाढवपणा केला आम्ही. निस्तरला पाहिजेच तो !

वसंत---बाबा, माझं ऐकून घेतां का तुम्ही थोडं !

बाबासाहेब---ऐकवलस तितकं पुरे नाहीं कां झालं अजून ? इतके दिवस अब्रूनं काढले अन् शेवटच्याच दिवसात... हं ऽ ! ( दीर्घ निःश्वास सोडतात ) मनोहर, गोडबोल्यांना लिहायच्या पत्राचा मसुदा तयार करून ठेव म्हणजे पोस्टानं पाठवू आपण ! माझ्या खोलींत आण लिहून ! केलंय् तें निस्तरलं पाहिजे ना ! ( बाबासाहेब जातात ).

मनोहर---किती मूर्ख आहेस रे तू, वसंत ? किती वाईट वाटल बाबांना तुझं बोलणं ऐकून ! डोकं थोडं शांत ठेवायचं कीं नाहीं ?

वसंत---दादा, अशा वेळींही डोकं शांत ठेवू म्हणतोस ? लग्न माझं, अन् मला त्याची दादही नाहीं ! अन् दादा, तूं कशी संमति दिलीस याला ?

मनोहर---माझं काय चुकलं रे यांत ? मुलगी चांगली, सुशिक्षित, सुस्वरूप अन् तुला पटण्यासारखी आहे. मग...

वसंत---( मध्येंच ) पण...

मनोहर---( हंसून, त्याला अडवून ) हं ! अद्याप ते वेळकर 'एपिसोड' तुझ्या डोक्यांत दिसतं आहे. किती वेडा आहेस रे वसत तू ! तुझं तिच्यावर प्रेम आहे म्हणतोस तूं, पण तुझी तिची ओळख तरी ? तिचा

स्वभाव, आवडी वगैरेबद्दल तुला कांहीं तरी माहिती ? म्हणजे तुझं प्रेम तिच्या गुणापेक्षा तिच्या सौंदर्यावरच बसल आहे असं नाहीं का ? अन् उद्यां हिच्यापेक्षा दुसरी सुंदर मुलगी भेटली तर हिच्यावरचं प्रेम उडून त्या दुसऱ्या मुलीवर बसणार नाहीं कशावरून ? म्हणजे तूं त्या कवीच्या गोष्टी-सारखी स्थिति आणलीस !

वसंत---कसली कवीची गोष्ट ?

मनोहर---एक कवि होते म्हणे ! यांचं दररोज एका मुलीवर प्रेम बसत असे ! दुसरे दिवशीं एकादी सुंदर मुलगी भेटली कीं उडालं आदल्या दिवशींच्या मुलीवरून प्रेम ! अशीच तुझ्या प्रेमाची स्थिति नाहीं तर काय ?

वसंत---म्हणजे दादा, माझं प्रेम तूं इतकं चंचल समजतोस ना ? हीच कां माझी परीक्षा केलीस ?

मनोहर---वसंत, तुला वडील भाऊ या नात्यानं एक गोष्ट सांगितली तर ऐकशील का ?

वसंत---सांग ना ! प्रस्तावना कशाला येवढी ?

मनोहर---मग हे प्रेमाचं 'फॅड' तूं डोक्यातून काढून टाक अन् मुका-ट्यान गोडबोल्यांच्या भाचीशीं लग्न कर ! बाबा किती रागावले पाहिलंस ना ? उगीच त्याच्याविरुद्ध जाण्यात काय अर्थ आहे ?

वसंत---दादा, किती अशक्य गोष्ट करायला सांगतोस रे ? माझं उत्तर मीं मघाशींच नाहीं का दिलं ? अन् दादा, मला हे सांग, हें लग्न जुळवलं तें माझ्या सुखाकरिता ना ? मग निष्प्रेम आयुष्य सुखाचं जाईल माझं !

मनोहर---पण या गोडबोल्यांच्या भाचीवर तुझं प्रेम कशावरून बस-णार नाहीं ?

वसंत---( हंसत ) प्रेम केव्हांही एकदांच करतां येतं हे विसरलास वाटतं ? मला वाटतं तुझ्याच कोणत्याशा गोष्टींत हे वाक्य आहे ना ?...

मनोहर---( हंसून ) पकडलस बुवा अगदीं मुद्यावर ! बरं ! तुझ्या-करितां म्हणून बाबाचं मन वळवण्याची खटपट करतो हं ! पण एकच वेळ ! पुन्हां नाहीं मी कधीं तुझ्या भानगडींत पडणार !

वसंत---( आनंदानें ) खरंच दादा, ऐकशील बाबा तुझं !

मनोहर---प्रयत्न करून पहातो बुवा! मात्र तूं एक कबूल केलं पाहिजेस!

वसंत---काय!

मनोहर---एकदां त्या मुलीला पाहून आलं पाहिजेस! खरंच पसंत नसली...

वसंत---( मधेच ) पण मी म्हणतो, उगीच फार्स कशाला? आतचां सांगतों कीं ती मुलगी पसंत नाहीं म्हणून!

मनोहर---तुला कळत नाहीं म्हणतो तें हेंच! अरे, तू जर मुलगी नापसंत केलीस तर लग्न मोडायला एक सबळ कारण नाहीं कां मिळणार? मग केव्हां? चारला जातोस? फोनमधून कळवूं त्याना तसं?

वसंत---तेवढं नाटक करीन पाहिजे तर! पण लग्न मोडलं हें नक्की हंऽ!

मनोहर---( हसत ) बघू बघू! जाऊन तर ये अगोदर!

( वसंत बाहेर जायला निघतो तो मालती आत येते. वसंताच्या चेहऱ्याकडे पाहून मालती हसूं लागते ).

मालती---( हलकेच ) एहेरे भाऊजीऽ!

वसंत---( ओरडून ) वहिनी ऽऽऽ!

मनोहर---( एकदम मागे वळून ) काय झालं रे?

वसंत---कांहीं नाहीं! ( तिघे हसूं लागतात )

पडदा पडतो.

* * *

## प्रवेश तिसरा

( स्थळ---सकाळचाच दिवाणखाना. संध्याकाळचे पांच वाजलेले. मालती टेबल साफ करण्यांत गुंतली आहे. इतक्यांत वसंत येतो. मालती एकदम दचकून मागे पहाते ).

मालती---( हंसून ) इश्श! काय दचकले पण मी! म्हटल येवढं पाय आपटीत कोण शिरलं?

वसंत---ए वहिनी, खरंच सांग कुणाचं कारस्थान आहे हें सारं?

मालती---कसलं कारस्थान? मला नाहीं बाई कांहीं माहीत! का?

चेहऱ्यावरचा आनद उतू चालला आहे अगदी ? दिली वाटतं मामंजींनीं संमति लग्न मोडायला ?

वसंत—वहिनी, किती लबाड आहेस ग ? कारस्थान करूनच्या करून पुन्हां आपण अगदीं नामानिराळी हं ऽ! वा ग वा! बरीच बनवायला शिकली आहेस कीं ?

मालती—( हंसून ) आज झालंय तरी काय भाऊजी तुम्हाला ? जाऊन आलांत ना गोडबोल्यांकडे ? केव्हांची वाट पहाताहेत तुमची ! पत्रसुद्धा लिहून ठेवलंय गोडबोल्यांना पाठवायच !

वसंत—वहिनी पुरे कर हं आता ! स्वतःला सगळ माहीत आहे अन् वरती पुन्हां साळसूदपणाचा आव ! एहेरे, हसतेस काय ?

मालती—इश्श ! हंसू नको काय रडू वाटतं ? काय बोलता आहांत याचा संदर्भ जर कळत नाहीं....

वसंत—वहिनी, तुला माहित नव्हतं गोडबोल्यांची भाची म्हणजे सुमति केळकरच ते ? गोडबोल्यांनीं सार सांगितलं मला ! तूच म्हणे दादाला सांगून हें लग्न जुळवून आणलस ! तिची अन् तुझी ग कुठली ओळख ? थट्टा नको हं आतां, गभीरपण उत्तर दे !

मालती—माझी मैत्रीण सुमित्रा केळकर माहीत आहे कां तुम्हाला भाऊजी ? ती नकटी अन् खूप गोरी आहे पहा ! एकदां आली होती आपल्याकडे ! तुम्ही नव्हतां वाटतं तेव्हां ! तिचीच तर ही बहीण !

वसंत—अन् परवां डायरी वाचतांना मारे अगदीं साळसूदपणे तिच्याविषयीं विचारीत होतास अं ! अन् माझी खासगी डायरी वाचायची पाहिजे नाहीं का ? सांगू का आतां दादाला ?

मालती—भाऊजी, बघा ह मग ! म्हटल डायरी वाचून बायको मिळवून दिलीय् तुम्हाला. पण भाऊजी, असं कसे हो म्हा पुरुष ? ज्या मुलीवर प्रेम तिच्याविषयीं काहींच माहिती नाहीं ? बरं विद्यार्थिनी होती तर ओळख तरी करून घ्यायची कीं नाहीं ? एहेरे, रडके भावजी !

वसंत—बरं बरं ! असूं दे जा मी रडका ! पण दादा कुठे गेलाय् ? ए दादा... ( मनोहर येतो ).

मनोहर—( टेबलावरचा पंखा घेऊन वारा घेत ) हुश्श ! काढली बुवा लग्न मोडायची परवानगी ! काय त्रास पडला पण ! आलास ना आतां तूं जाऊन ! पाठवतो तर मी गोडबोल्यांना पत्र !

वसंत—( आपल्याच नादांत ) दादा, खरंच सांग, कुणाच्या सुपीक डोक्यातून हा ' प्लॉट ' निघाला. अं ऽ !

मनोहर—ही काय बुवा भानगड आहे आणखी ? कसला 'प्लॉट' ? काय म्हणतो आहेस तूं ! ( मालतीकडे वळून ) काय म्हणतोय ग हा !

मालती—( हंसत ) मलाही तोच प्रश्न पडलाय् ! मघापासून असंच ' प्लॉट ' कारस्थान वगैरेबद्दल कांहीं बोलताहेत ! एडगर वॉलेसची कादंबरी वाचली असेल बहुतेक !

वसंत—आतां कां उगीच वेड पांघरतो आहेस दादा ? कळलं आहे मला सगळं ! पण मूळ कल्पना कुणाच्या डोक्यांतून निघाली, सांग ना !

मनोहर—मूळ कल्पना आपल्या डायरींतल्या पानामधून निघाली आहे बरं का महाराज ! डायरी अस्ताव्यस्त टाकतां आपण अन् परिणाम भोगावे लागतात मग !

वसंतः—पण दादा, तूं सकाळींच कां नाहीं सांगितलस मला हें ! बाबांना मी किती वाईट बोललों ! क्षमा मागितली पाहिजे मला त्यांची !

मनोहरः—वेड्या, त्यांना हे माहीत नव्हतं असं समजतोस कीं काय तूं ? अरे बाबा, आम्ही सगळेजण या कटांत सामील होतो. उगीच तुझ्या संमतीशिवाय तुझं लग्न ठरवायला आम्हाला वेड कां लागलंय ?

वसंतः—( आश्चर्यानें ) बाबांनाही माहीत होतं तर हें ! काय आवेश आणला होता पण त्यांनीं ! खरंच, मी अगदीं घाबरून गेलों ! नाटकच हें सारं तर !

मनोहरः—कसं छान रंगलं पण ! मला भीति वाटत होती कीं, कुठं मधेंच मला एकदम हसूं येऊन सारं बिंग फुटतं कीं काय ? पण झालं नाहीं तसं कांहीं !

मालतीः—बाकी त्यांतल्या नायकाची फार केंविलवाणी मनःस्थिति

झाली होती, नाही ? पण भाऊजी, आता तरी मुलींची वर्णनं डायरीत लिहीत जाऊं नका ! नाहीं तर ती सुमति धरील कान !

वसंत:—दादा, तुम्ही हिला बजावून ठेवा बरं का ! नाहीं तर आज डायरी वाचली, उद्या चोरून आमचं भाषण देखील ऐकायची ! तिला चांगली ताकीद देऊन ठेवा !

मालती:—( मानेला झटका देत ) असं का ! ( तिघेही हसतात. )

पडदा पडतो.

संपूर्ण